**कलाली – मराठी शब्दकोश** (कोश) – **डॉ. रामदास चवरे**

**Kalali-Marathi Shabdkosh** (Book) - **Dr. Ramdas Chaware**


२२०८, सी, आसावरी,
नांदेड सिटी, पुणे – ४११०६८
मो. – ८३०८९९८६७२
email-chawarerg2208@gmail.com

**प्रथम आवृत्ती :**
१ डिसेंबर २०२४

**अक्षरजुळणी** :
यशोदीप क्रिएशन्स, पुणे

**मुखपृष्ठ** :
निखिल लंभाते

**मुद्रितशोधन :**
डॉ. सायली आचार्य, नाशिक
प्रा. रूपाली अवचरे

**प्रकाशक :**
निखिल लंभाते, रूपाली अवचरे
**यशोदीप पब्लिकेशन्स,**
२१७ ब, जोरी निवास,
नारायण पेठ, पुणे – ३०.
संपर्क क्र. : ९०२८७३६००१,
९८५०८८४१७५,(०२०)४१२१७४४१

**मुद्रक :** समर्थ प्रोसेस, पुणे

**मूल्य :** ₹ ४५०/–


2208, C, Asawari,
Nanded City, Pune - 411068.
Mob. No.- 8308998672
email-chawarerg2208@gmail.com

**First Edition :**
1 December 2024

**Typing :**
Yashodeep Creations, Pune

**Cover :**
Nikhil Lambhate

**Proof Reader :**
Dr. Sayali Acharya, Nashik
Prof. Rupali Auchare

**Publisher :**
Nikhil Lambhate, Rupali Auchare
**Yashodeep Publications**
217 B, Jori Niwas,
Narayan Peth, Pune - 30.
Contact No. : 9028736001,
9850884175, (020) 41217441

**Printer** : Samarth Process, Pune

**Price** : ₹ 450/-

**ISBN : 978-93-90017-91-1**

# अर्पणपत्रिका

ज्यांच्या सौहार्दपूर्ण सहकार्याने
हा शब्दकोश पूर्ण झाला
ते माझ्या कुटुंबातील सुहृद
पत्नी प्रा. डॉ. सौ. सीमा
मुलगा प्रा. डॉ. चि. राजेश
सून प्रा. डॉ. सौ. वृषाली
यांना सस्नेह...

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

## कलाली भाषा

'भाषा यह भूमिपर प्रज्वलित पहली ज्योती है
भावो और विचारोंको खिलानेवाली प्रकृती है'

असे एका कवीने म्हटले आहे. यातून भाषेची मौलिकता नि महत्त्व प्रतीत होते. बोलीतला जीवनरस शोषून घेत प्रमाण भाषा ही समृद्ध व टवटवीत रूप धारण करते. ती वैचारिक व भावनिक आदानप्रदानाचे एक मौलिक माध्यम असते. 'कलाल' नामक जातीत बोलली जाणारी 'कलाली' बोली आहे. जी बोलली जाते ती भाषा. या सामान्य रूढीप्रमाणे तिला भाषा संबोधले जाते. ही कलाली भाषा महाराष्ट्रातल्या नागपूर, भंडारा, गोंदिया, वर्धा, चंद्रपूर, यवतमाळ, अमरावती, अकोला व वाशिम या जिल्ह्यांत बोलली जाते. इतर जातींत असतात तशा कलालांतही पोटजाती आहेत. मरठे, साव, झरिया, डहरवाल, चौकसे, मालवीय, रॉय, लाड डंड सेना, सक्सेना, सुर्यवंशी, शिवहरे, सोनकर, महाजन, डावरे, मराठा, जयस्वाल, कोसरे, जैन इत्यादी पोटजातींचा कलालांमध्ये समावेश होतो. येथे मरठे कलाल या जातीचा विचार अभिप्रेत आहे.

विदर्भातल्या आकोलखेड (जिल्हा अकोला) या गावात सुमारे पंधराशेच्या आसपास कलालांची लोकसंख्या आहे. वऱ्हाडातल्या वर्धा, अकोला, अमरावती या तीन जिल्ह्यांत त्यांची पाच हजारापर्यंत लोकसंख्या आहे. नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर या जिल्ह्यांसह ती एक लाखाच्या आसपास आहे.

उत्तर भारतात कलाली भाषेचा उगम संभवतो, कारण या भाषेत आधिक्याने हिंदी शब्द आढळतात. काही हिंदी शब्दांत बदल होऊन ते कलालीत आलेले आहेत. अवधी ही हिंदी भाषेची बोली मानली जाते. तिच्यातले शब्द कलालीत आढळतात.

छत्रपती संभाजी राजे यांना अटक केल्याच्या असुरी आनंदात औरंगजेब

तख्तावरून जमिनीवर येतो आणि अल्लाला कुर्निसात करतो, तेव्हा संभाजीसोबत कैद झालेला कवी कलश शीघ्र कविता करतो,

'राजन, तुव तपतेज निहारके तखत त्यजो अवरंग'

अर्थात 'हे राजा, तुझ्या तपश्चर्येचे तेज पाहून या औरंग्याने तख्त सोडले आहे.' यातील सर्व शब्द कलाली भाषेशी संबंधित तर काही जसेच्या तसे आलेले दिसतात. तप, तेज, निहारके, तखत, त्यजो हे सर्व शब्द अवधी बोलीतले असून ते जसेचे तसे कलालीमध्ये बोलले जातात. 'तुव' मध्ये बदल होऊन 'तोरो' हा शब्द कलाली भाषेत आलेला आहे. असे हिंदीतल्या कित्येक शब्दांत बदल होऊन ते कलालीत आलेले आहेत. पुढील कंसातील शब्द हिंदीतले आहेत. मखे (मुझे), तोखे (तुझे), आपुन (अपन), आयीती (आयी थी), आवय (आती), उप्पर (उपर), उठ्यो (उठा), कह्यो (कहा), कायखे (क्यो), गिऱ्यो (गिरा), घबरायो (घबराया), ओन्यांग (उधर), एन्यांग (इधर), घरने (घरमे), गिरजो (गिरेगा) बळो (बडा), बळी (बडी), गळगळ (गडगड), गळबळ (गडबड), तुकळा (तुकडा), टेकळी (टेकडी), बळई (बढई) इत्यादी. येथे हिंदीतील 'ड' चा कलालीत 'ळ' झालेला आहे. काही हिंदी शब्द कलालीत विस्तारशील होताना दिसतात. उदा. लुगाईन ('लुगाई' हिंदी) असे हे शब्दांतले साम्य आहे.

भाषा ही संस्कृतीचे अविभाज्य अंग असते. त्या दृष्टीने कलाली भाषेचे महत्त्व आहे. तिच्यातील काही आध्यात्मिक परंपरा सत्य, सदाचार, सामाजिक व राष्ट्रीय ऐक्य, परस्पर प्रेम व ग्रामीण/प्रादेशिक व्यवसायांचे संवर्धन करणाऱ्या आहेत. मौखिक परंपरेने जीवनदायी अनुभवांचे हस्तांतरण होते. कलालांमधली 'भुजली' ची परंपरा त्यापैकीच एक आहे. दिवाळीपेक्षा 'भुजली' (रक्षाबंधन) या सणाचे त्यांच्यात महत्त्व आहे. विविध कलाल जाती/पोटजातीमध्ये महाराष्ट्र, मध्यप्रदेश, राजस्थान, बिहार, छत्तीसगड, उत्तरप्रदेश, ओरिसा, बंगाल, पंजाब, दिल्ली, आंध्रप्रदेश, कर्नाटक या राज्यांमध्ये खूप उत्साहात भुजलीचा सण साजरा केला जातो.

महाराष्ट्रातील कलालांमध्ये दरवर्षी येणारा भुजलीचा सण आनंदात, वाजतगाजत संपन्न होतो. श्रावण महिन्यात नागपंचमीच्या दुसऱ्या दिवशी

बांबूच्या टोपलीत माती घालून त्यात गहू पेरतात. दररोज दहा दिवस त्यावर जलसिंचन करतात आणि रक्षाबंधनाच्या दिवशी संध्याकाळी समारंभपूर्व वाजत गाजत स्थलपरत्वे नाचगाण्याच्या उत्साहात जवळपासच्या जलाशयात भुजली (गव्हाची रोपे) धुऊन पुन्हा वाजतगाजत घरी परततात. संध्याकाळी एकमेकांच्या घरी जाऊन दसऱ्याच्या सोन्याप्रमाणे ज्येष्ठांच्या डोक्यावर भुजल्या ठेवून त्यांच्या चरणी नतमस्तक होऊन आशीर्वाद घेतात. सामाजिक सलोखा, स्नेहभाव भारतीय प्राचीन परंपरेतील नीतिमूल्यांचे संवर्धन करणारी ही परंपरा आजही जीवनोपयोगी आहे. बांबूपासून टोपली अर्थात नैसर्गिक घटकांपासून तयार करतात. त्यामुळे गरीब, मजूर यांच्या व्यवसायाला मोठ्या प्रमाणावर चालना मिळते. मोठ्या प्रमाणावर म्हणण्याचे कारण म्हणजे भारतातल्या विविध राज्यांत कलालांमध्ये हा सण संपन्न होतो. ओल्या मातीत गहू पेरल्यानंतर त्याची रोपे उगवणे यातून प्रजनन क्षमतेचे प्रतीक प्रतीत होते. महाराष्ट्रात बंजारा व लोदी याही जातींत हा सण हर्षाने उत्साहपूर्वक साजरा करतात.

या परंपरेत एक नैसर्गिक जीवनशैली सामावलेली आहे. गहू, माती, टोपली, जलाशय या सर्व घटकोपघटकांच्या समन्वयातून नैसर्गिक जीवनशैली वृद्धिंगत होते. विशेष म्हणजे हा अधिकतर महिलांचा सण आहे. मात्र पुरुषही तेवढ्याच उत्साहाने व आनंदाने त्यात सहभागी होतात. सद्‌भावना, सदाचार, मद्यपाननिषेध यांचे स्वयंभूपणे पालन केले जाते. 'गव्हाच्या रोपातील मुळात' औषधीयुक्त जीवनदायी गुणधर्म असल्याचे अनेक संशोधकांनी संशोधनांती सांगितले आहे. मधुमेहासारख्या आजारावर त्यांची उपयुक्तता मानली जाते. बांबूच्या बारीक काड्यांपासून तयार करण्यात येणाऱ्या टोपल्यांच्या निमित्ताने देशी हस्तकला व्यवसायाला प्रोत्साहन आणि कारागिरांना रोजगार मिळतो.

कलाली मराठी शब्दकोशात कलाली भाषेत बोलल्या जाणाऱ्या शब्दांचा समावेश करण्याचा प्रयत्न केलेला आहे. तरीही त्यात सर्व शब्द आलेच असतील असे नाही. तसेही विचारांती लक्षात येते की, कोणताही शब्दकोश परिपूर्ण नसतो. त्यात भाषेतील शब्दाचे अर्थ दिलेले असतात, हे सर्वज्ञात आहे. मात्र भाषा ही नित्य बदलती असते. स्थल, काल, परिस्थिती, नवनवीन

शोध इत्यादी कारणांनी भाषेत शब्दांचे अगामन नित्य सुरू असते. उदाहरणार्थ– मेळघाट (जि. अमरावती, विदर्भ) परिसरातील कोरकू या आदिवासी जमातीचे लोक इतर भौगोलिक, सांस्कृतिक, भाषिक परिसरात येतात तेव्हा तेथील भाषा बोलताना दिसतात. हा अमरावती जिल्ह्याचा भाग असल्याने त्यांचा मराठी भाषेशी संपर्क वाढतो. पूर्वी रेडिओ आणि आता टी.व्ही. मोबाईल, कॉलेज, कार असे कितीतरी शब्दांचा अवलंब आदिवासी जमात करताना दिसते. कलाली बोलीच्या बाबतीतही तेच घडत आहे. पूर्व विदर्भाच्या गोंदिया, भंडारा, नागपूर, चंद्रपूर, गडचिरोली या जिल्ह्यांतील आणि मध्यप्रदेशातील बैतूल, बालाघाट, इंदूर परिसरातील कलाल आधिक्याने हिंदी भाषेचा किंवा तिच्या बोलीचा अवलंब करतात. अशा वेळी कलालीची वास्तवता लोप पावते. पश्चिम विदर्भात वर्धा, अमरावती, यवतमाळ, अकोला, वाशिम, बुलढाणा इत्यादी जिल्ह्यांतील कलाल मराठी भाषा किंवा वऱ्हाडी बोली बोलताना दिसतात. अशा वेळी कलाली भाषा नकळत मागे पडते किंवा तिच्यात इतर भाषेतील शब्द डोकावतात. कलालीतील ‘बिहाव’ शब्दाचा अर्थ मराठीत लग्न होतो. कित्येकजण तोच वापरतात. म्हणून ते सहज बोलून जातात, ‘मी लगन लगावनखे चल्यो’ अर्थात मी लग्न लावायला चाललो. लगन हा ‘वऱ्हाडी’ तर ‘लग्न’ हा प्रमाण मराठी भाषेतील शब्द आहे. वऱ्हाडात वऱ्हाडीच्या संस्कारामुळे ‘कलालींमध्ये ‘वऱ्हाडी’ शब्द येतात. अर्थात कित्येकदा त्यातही बदल करून ते वापरले जातात. कलालीमध्ये मराठी भाषेतील ‘ड’ चा ‘ळ’ होतो. उदाहरणार्थ मोडका (मराठी), मोळको (कलाली), तोडणे (मराठी), तोळणे (कलाली), लाडू (मराठी), लाळू (कलाली), लोडणे (मराठी), लोळणा (कलाली), घडीभर (मराठी), घळीभर (कलाली), घडघड (मराठी), घळघळ (कलाली) कित्येकदा वऱ्हाडी शब्दांचा कलालीमध्ये अवलंब केला जातो, तेव्हा त्यात बदल होतो. उदाहरणार्थ मराठीतील नग्न, नागडा, नागवा, विवस्त्र इत्यादी शब्दांना वऱ्हाडीत ‘भोंगया’ म्हणतात, तर कलालीमध्ये ‘भोंगयो’ संबोधतात. बळई (कलाली), बढई (हिंदी), सुतार(मराठी). अशी ही एकाच शब्दाची विभिन्न भाषेत तीन रूपे आहेत. यावरून हे सिद्ध होते की कलाली ही मराठीपासून दूर, तर हिंदीच्या जवळ दिसते. मात्र हिंदी भाषेतील

शब्द व कलालीतील शब्द यांच्यात काहीसा रूपभेद दिसतो.

मराठी, हिंदीतील नाम, सर्वनाम, विशेषण यात बदल होऊन ते कलालीत वापरले जातात. उदाहरणार्थ, 'देश' ऐवजी 'देस', 'प्रदेश' ऐवजी 'परदेश' सर्वनामाला तर कलालीमध्ये पूर्णतः भिन्न शब्द आहेत. उदाहरणार्थ 'ते' (मराठी) 'वे' (हिंदी), 'ही' (कलाली), 'ती' (मराठी), 'वह'(हिंदी) 'वा' (कलाली), 'तो' (मराठी), 'वह'(हिंदी), 'हू'(कलाली).

कलालीत कित्येक शब्द हिंदी भाषेतील असल्याचे प्रतीत होते. उदा. खुन्नस, मतलब, जमाना, खिल्ली, दुजी, निहार, संसार, निहारणा, तजना, इत्यादी 'भेजा' (मेंदू, मराठी) सारखे वऱ्हाडीतील शब्द कलालीत जसेच्या तसे आले आहेत. तर काहीत वऱ्हाडी शब्दात बदल होऊन ते कलालीत आले आहेत. उदा. भेदरं (वऱ्हाडी), भेदरा(कलाली). भुलोनं (वऱ्हाडी), भुलविणे (मराठी), भुलोवनो (कलाली), यीन (वऱ्हाडी), येईन (मराठी), आऊन (कलाली), येल (वऱ्हाडी), वेल (मराठी), बेला (कलाली), वऱ्हून (वऱ्हाडी), वरून (मराठी), उपरसे (हिंदी), उप्परसे (कलाली), वाळी (वऱ्हाडी), सुतार (मराठी), बढई(हिंदी), बळई (कलाली) असे बदल होऊन कलालीत शब्दाचे आगमन होताना दिसते. काही इंग्रजी शब्द जसेच्या तसे येतात. अर्थात ते झाडी, अहिराणी, खानदेशी, कोकणी, कोहळी, चंदगडी, वाडवळी, मालवणी, पोवारी इत्यादी बोलींत व कित्येक प्रमाण भाषेतही वापरले जातात. उदा. कॉलेज, पेन, पेन्सील, गॅझेट, जी आर, टी.व्ही., कॉम्प्युटर इत्यादी. अर्थात या शब्दांच्या उच्चारात त्या त्या बोलीपरत्वे काहीसा बदल संभवतो. मात्र कित्येक शब्दांना मराठीसारख्या प्रमाणभाषेत प्रतिशब्द असूनही त्याचा वापर न करता इंग्रजीतील शब्दांचाच वापर केला जातो. उदा. संगणक हा कॉम्प्युटरला पर्यायी शब्द असूनही त्याच्याऐवजी कॉम्प्युटर हा शब्द आधिक्याने वापरला जातो. कलालीसारख्या महाराष्ट्रात बऱ्याच बोली बोलल्या जातात. त्यांच्यात इंग्रजी शब्दाला पर्यायी शब्द नसल्याने ते इंग्रजी शब्द जसाच्या तसाच स्वीकारतात.

विदर्भाच्या पूर्वभागात कलालांची बरीच वस्ती आहे. याला झाडीपट्टीचा भाग म्हणतात. येथील झाडी बोली सर्वश्रुत आहे. या परिसरात छत्तीसगडी,

तेलुगू याही भाषा बोलल्या जातात. त्यामुळे येथे कलाली बोली यातील काही शब्द आपसूकच स्वीकारते.

शब्द हे एकदा अंगवळणी पडले की ते तसेच वापरले जातात. तेथे जात, धर्म, पंथ, वर्ण, वर्ग यांचे जणू समस्तरीकरण झालेले असते. मराठी बोलणाऱ्यांनी 'प्लॉट' हा इंग्रजी शब्द स्वीकारला. त्याला मराठीमध्ये 'भूखंड' हा पर्यायी शब्द असूनसुद्धा सामान्य कलाली माणूस त्याला 'जमीनको तुकळा' तर शिक्षित व शहरवासी कलाली माणूस प्लॉट संबोधतो. कित्येकदा इतर भाषेतील शब्द मराठीत येतात, तेव्हा त्यात बराच बदल झालेला आहे. इतर भाषेतील नाम, सर्वनाम, क्रियापद यांत बदल होऊन ते कलालीत बोलले जातात. प्रत्येक भाषेतील जनसुमदाय बोलताना शब्दांचे उच्चार सोईनुसार अर्थात सहज, सोपे व सीमित करण्याचा प्रयत्न करतो. 'अग्निरथगमनागमनसंकेतदर्शकताम्रनिललोहपट्टिका' हा प्रमाण मराठीतील शिष्टसंमत शब्द सर्वसामान्य मराठी माणसांनी स्वीकारला नाही. त्याऐवजी 'Signal' या इंग्रजी शब्दाचा अवलंब करतात. कित्येक प्रादेशिक बोलीत सिग्नलचा सिंगल असा साधा प्रयोग करतात. कलालीतही 'सिंगल' संबोधतात. अर्थात हा सोईनुसार उच्चारण्याचा भाग आहे. याला ग्राम्य, अशुद्ध, अडाणी संबोधणे अश्लाघ्य ठरेल.

कित्येक भाषांमध्ये शब्दांची जी अनेकवचने होतात, तशी कलालीत होतीलच असे नाही. मराठीत समुद्र, ढग यांसारखे शब्द अनेकवचनात अपरिवर्तनीय आहेत. पण ते अपवाद आहेत. कलालीत अनेक शब्दांचे अनेकवचन होतानाही मूळ रूप बदलत नाही. उदा. जाता(दळण्याचे साधन), पाटा (वाटण्याचे साधन) सरोता (सराटा), चमचा, भांडा (भांडी), पावणा (पाहुणा), टुरा (मुलगा), टुरी (मुलगी) इत्यादी.

अशावेळी शब्दांची अनेक वचने क्रियापदावरून ओळखली जातात. उदा. 'ओखे दोय टुरा भईन' (त्याला दोन मुले झालीत), 'ओखे दोय टुरी भईन (भईन क्रि.) त्याला दोन मुली झाल्या. 'दोय पावणा आईन' (आईन क्रि.) (दोघे पाहुणे आले.) कलाली व तत्सम विविध बोलीत भाषांचा अवलंब करणारे जनसुमदाय बिनदिक्कतपणे अचूक शब्दाचा बोलताना प्रयोग

करतात. उदा. मोटार सायकल या शब्दाला वऱ्हाडी, कलाली भाषांत फटफटी संबोधतात. तो अयोग्य वाटत नाही. त्या वाहनाच्या आवाजावरून त्याला दिलेले ते नाम आहे. मोटार सायकल या दोन शब्दांचा एक केलेला 'फटफटी' हा शब्द योग्यच वाटतो. खरे तर ते वाहन मोटार नाही आणि सायकलही नाही.

भाषेमध्ये संस्कृतीचे अंतरंग नांदत असते. प्रत्येक संस्कृती ही महासागरातील एखाद्या बेटाप्रमाणे असते. बेटाच्या अवतीभोवती दूरवर पाणीच पाणी पसरलेले असते. बेट मात्र वेगळे असते. तशी संस्कृती असते. तिच्याही अवतीभवती सर्वदूरवर विभिन्न जनसागर विस्तारलेला असतो. मात्र संस्कृती आपले स्वत्व, पाथेय, लळिते जपत, जोपासत असते. सांस्कृतिक संकर वगैरे नंतरच्या गोष्टी आहेत. असा संकर जरी घडला, तरी संस्कृतीचे मूळ रूप असते ते असतेच. प्रत्येक संस्कृतीचे एक विशिष्ट अंत:स्थ गुह्य असते. ते केवळ तिचे आणि तिचेच असते. विविध संस्कृतींचा सूक्ष्म अभ्यास केल्यास ते लक्षात येते. कलाली संस्कृती व तिची भाषा यांचे एक मौलिक क्षेत्र आहे. ही भाषा बोलणारे, जगणारे तिचा अवलंब करतात. त्यात त्यांना मानसिक शांती व सुख लाभते. कलाली भाषांतर्गत विशिष्ट सांकेतिक शब्दांचे एक लघुक्षेत्र आहे. त्यात मुंडा, महूर, डल्ला, समदुरा इत्यादी शब्दांचा समावेश होतो.

**मुंडा–** हिरव्या लग्न मांडवात वधुवरांना पूजाविधी व सात फेरे घालण्यासाठी सालईच्या झाडाच्या ओल्या फांदीचा काठीसारख्या आकाराचा मांडवाच्या मध्यभागी जमिनीत उभा केलेला एक खांब. लग्नादि विधी आटोपल्यावर कित्येक दिवस तो खांब तसाच ठेवल्याने त्याला नवीन पालवी फुटते. तो हिरवा होतो. वधुवरांचा संसार असाच हिरवागार होवो, ही त्यामागची सद्भावना आहे.

**भऊर–** वधुवरांचे लग्न झाल्यानंतर त्यांनी मांडवातील मुंड्याभोवती जोडीने सात फेऱ्या घालणे.

**महूर–** लग्नसोहळ्यात वर-वधूसाठी शिंदीच्या झाडाच्या कोवळ्या पिवळ्या पानांचा सुंदर नक्षीदार तयार केलेले मुकुट.

**डल्ला–** लग्नसोहळा आटोपल्यानंतर वधूची वरासोबत पाठवणी करताना

विशिष्ट टोपलीत दिले जाणारे विविध गोडधोड पदार्थ.

**समुदरा–** विवाहसमारंभ पार पाडल्यानंतर (वर–वधू पक्षांकडील) विहिणींना परस्परांच्या घरी अत्यादरपूर्वक निमंत्रित करतात. त्यांचा वस्त्रप्रावरणे देऊन स्वागतसोहळा भोजनादि विधी सहर्षे पार पाडले जातात. या निमित्ताने दोन्ही कुटुंबांत सौहार्द निर्माण होते. ते आयुष्यभर तसेच राहावे, ही त्यामागची भावना.

शेवळी – कलाली संस्कृती आणि कृषी संस्कृती यांच्यात विलक्षण साम्य आहे. जे कलाल खेड्यात राहतात, त्यांची बहुतांश घरे गावात, पण एका कडेला असतात. गावाच्या मध्यभागी क्वचितच असतात. विदर्भातील अकोला, अमरावती इत्यादी जिल्ह्यांतील कित्येक खेड्यांत याची प्रचिती येते. यावरून कलाल हे जरा उशिराच विदर्भात आले. खेड्यात वास्तव्य म्हटल्यानंतर शेतमजुरी किंवा अल्प जमीन असली, तर शेती हेच उदरनिर्वाहाचे साधन असते. अल्पभूधारकांना बारोमास स्वत:च्या शेतात काम नसते. त्यामुळे ते मजुरीने इतरांच्या शेतात राबतात. म्हणजे कलालांचा संबंध ग्रामीण परिसरातील शेतीमातीशी येतो. त्यामुळे त्यांच्या बोलण्यात शेतीशी संबंधित असलेले अनेक शब्द येतात. उदा. बैलबंडीचे विविध भाग, बैलांच्या आजाराची विविध नावे, पिकावरील रोगराईची नावे, शेतकरी व शेतीत राबणाऱ्या मजुरांच्या जीवनाशी निगडित शब्द इत्यादी. त्यांपैकी ‘शेवळी’ हा शब्द होय. शेवळी म्हणजे लहान, गोल तोंडाची, अरुंद, गोलाकर व कमी खोल असलेली विहीर होय. तिला आड (मराठवाड्यात ग्रामीण भागात ‘चलमा’) म्हणतात. ‘शेवळी’ हा शब्द शेवडी रूपाने ज्ञानेश्वरीत ही आढळतो.

‘वरी चोखट मृगशेवडी। माजी धूतवस्त्रांची घडी।
तळवटी अमोडी। कुशांकुर।। – ज्ञा. ६, १८२

साधारणपणे खेड्यात उन्हाळ्यात पाण्याचे दुर्भिक्ष असते. ग्रामीण, आदिवासी भागात ही समस्या अधिक भेडसावते, कारण शेतशिवारातून वाहणाऱ्या नद्या, ओढे, निर्झर आटलेले असतात. तेव्हा साधारणत: कोरड्या नदीच्या किंवा ओढ्याच्या पात्रात लहान विहीर खोदतात. तिचे तोंड गोलाकार असून ती कमी खोल नि अरुंद असते. कधी कधी तिच्या भिंतीत पाय

ठेवण्यासाठी लहान लहान कोंडाळे केलेले असतात. त्यात पाय ठेवून शेवळीत उतरून तहानलेले स्त्री-पुरुष ओंजळीने पाणी प्राशन करतात. कधी तांब्याला दोरी बांधून (शिकाई तांब्याने) शेवळीतील पाणी काढतात. ते पाणी काही मिनरल वॉटर नसते. कधी कधी ते गढूळ असते. त्यात मेलेली बेडके, किडे आणि शेवाळ, तर कधी त्याला दुर्गंधी असते. ऐन रणरणत्या उन्हात तहानेने व्याकूळ झालेले शेतमजूर जणू नाक बंद करून गटागटा ते पाणी पिऊन आपला जीव वाचवितात. भुकेला कोंडा आणि निजेला धोंडा चालतो म्हणतात, तसे या पाण्याचे असते. हे पाणी या लोकांना जीवन देणारे अमृत ठरते. हे पाणी पिणाऱ्या लोकांचा एक मायेचा गोतावळा तयार होत असतो. तेथे जात, धर्म, वय, लिंग हे सारे गळून पडलेले असतात. समस्यांनी समदु:खी असलेल्या सर्वसामान्यांचे हे जीवाभावाचे भावनिक ऐक्य असते. हे सर्व जसे आनंदसोहळ्यात एकत्र जमतात, तसे दु:खद प्रसंगीही ऐक्य दाखवितात. हे सामाजिक ऐक्य राष्ट्रीय ऐक्याची नांदी ठरत असते.

भाषेत शब्द विविध प्रकारे वापरले जातात. त्यानुसार त्यांची रूपे बदलतात. काही शब्दांची मूळ एक जात असते. त्यांना प्रत्यय इत्यादी संस्कार झाले की, भाषेतील विनियोगानुसार त्यांची जात बदलते. म्हणून येथे मूळ जात देण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्या गटातील काही शब्दांना बदललेल्या विनियोगानुसार त्यांची जात नोंदविण्याचा प्रयत्न केलेला आहे. जसे 'वर' हे क्रियाविशेषण आहे. 'माडीवर' चढला, तर तो शब्दयोगी अव्यय होतो. विभक्ती प्रत्यय व शब्दयोगी अव्यय ही कलाली भाषेची वैशिष्ट्ये व वेगळेपण आहेत. इतर भाषांत ती तेवढी सापडणार नाहीत.

कलाली भाषेच्या उत्पत्तीचा काळ निश्चितपणे सांगता येत नसला, तरी तो खूप प्राचीन आहे. त्यात मौलिक जीवनमूल्ये कधी मुक्त, तर कधी प्रच्छन्न रूपात सामावलेली आहेत. मात्र ही भाषा अलीकडे लोप पावण्याच्या मार्गावर आहे.

'लीळाचरित्रा'त कलालांचा उल्लेख येतो. ''प्रधान तो रात्री भाटी पोतीतु होता तव प्रकासा भरले : कलाली उठली : तव प्रकासी घर धरले असे : तीया कालाळाते उठवीले : उठी उठी, आगी लागली'' तसेच ''तेथ कालळांच्या

घरी प्रधानु गाहान ठेविला : एके ठायी सामानस्त्रीएचां घरी ते पुरुख वसीनले.'' यावरून कलाल जात आठशे वर्षांपूर्वी होती.

जंजिरा किल्ल्यावर जवळजवळ दोन मोठ्या तोफा ठेवलेल्या आहेत. त्यांची निर्मिती दक्षिण आफ्रिकेतील हबशी जमातीच्या सिद्धीने सोळाव्या शतकात केली. कलालबांगडी असे एका तोफेवर अक्षरे कोरलेली आहेत. ही तोफ भारतातली सर्वात मोठी तोफ आहे. 'कलालबांगडी' या कोरलेल्या शब्दाच्या अर्थनिष्पत्तीबाबत संशोधकांत विविध मते आहेत.

कलाली भाषेत विपुल प्रमाणावर लोकगीते, वाक्प्रचार, म्हणी, उखाणे आहेत. ते विवाह व इतर समारंभात सादर केली जातात. ''दिवारीकी फुलझळी निकरी फुसकी, डुक्करने माऱ्यो.... खे ढुसकी.'' (दिवाळीची फुलझडी फुसकी निघाली. डुकराने *** ला ढुसकी मारली.) असा दिलखेचक उखाणा नवरदेव सादर करतो. नवरीही तोडीस तोड त्याच प्रकारातला उखाणा सांगते. 'अभारने बुढिको खाटला, ओकेने चान्नी सात, कारेडोम भसीने *** खे मारी लात.' (आकाशात बुढीचे खाटले असून त्यात सात चांदण्या आहेत. काळ्याशार म्हशीने *** ला लात मारली.) ग्रामीण परिसरातील हे रांगडे जीवन आहे. यातून रांगडा विनोद डोकावतो.

कलाली ही स्वतंत्र भाषा आहे. तिच्यात कित्येक लोकगीते, लोककथा, स्फुट काव्य यांची रेलचेल आहे. विशेषतः तिच्यातली लोकगीते गेयतेमुळे मनाला स्पर्शून जातात. त्यांच्यातला भाव आणि लय कलालेतरांनाही मोहित करतो. या गीतांमध्ये निखळ कलाली भाषेतील शब्दांबरोबर पारंपरिक जीवनलळिते ऊर्जस्वल रूपात संवेद्य ठरतात. विवाह व सणोत्सव प्रसंगी गायिल्या जाणाऱ्या गीतांतून कधी उत्फुल्ल भावबंध, तर कधी जीवनातील आक्रित आविष्कृत झालेले असते. ही लोकगीते असल्याने परंपरेने चालत आलेली असली तरी त्यात अधून मधून स्थलकालपरिस्थितीसापेक्ष नवनवीन शब्द व जीवनानुभव यांचा आविष्कार दिसतो. जीवनातील विलसितांबरोबर विविध विपरितावस्थाही तेवढ्याच जळजळीत शब्दांत त्यातून व्यक्त होतात. विविधता हा कलाली लोकगीतांचा विशेष ठरावा.

## भौगोलिक क्षेत्र

महाराष्ट्रात पुढील भौगोलिक क्षेत्रात कलाली भाषा बोलली जाते.

नागपूर जिल्ह्यात नागपूर, रामटेक, कारापाठा, पारशिवनी, महादुला, सकली, कोराडी, कामठी, भुखडा, मादरी, पंचाळा, कोथुर्ना, अमरनगर, जयताळा, वानाडोंगरी, हिंगणा, तळेगाव, करमाळा, दहेगाव, तिफला, खापरखेडा, खापा, सावनेर, गडेगाव इत्यादी.

भंडारा जिल्ह्यात भंडारा, मुंढरी, तुमसर, बलेगाव, बिरसीफाटा, लाखेगाव, सडक अर्जुनी, लाखनी, सोनी, आमगाव इत्यादी.

गोंदिया जिल्ह्यात गोंदिया, बोरी, चोपा, खातीटोला, हिरडामाली, दवनीवाडा, परसवाडा, चल्लुरी, मोहाडी, तिरोडा, बडेगाव, करडी, मुंढरी इत्यादी.

वर्धा शहर – यवतमाळ जिल्ह्यात यवतमाळ, पांढरकवडा, घाटंजी, घाटी, पोहर, युवती

वाशिम, चंद्रपूर, गडचिरोली

अमरावती जिल्ह्यात अमरावती अचलपूर, परतवाडा, शिंदी, पथ्रोट, अंजनगाव सुर्जी, मुह, सातेगाव, वरुड (कुलट) (इत्यादी)

अकोला जिल्ह्यात अकोला शहर, आकोट, आकोलखेड, अंबोडा, उमरा, पोपटखेळ इत्यादी

पुणे, मुंबई, औरंगाबाद, धुळे इत्यादी

## कलालीत सांगितली जाणारी मराठीतील लोककथा

उंट आणि कोल्हा एकमेकांचे मित्र होते. एके दिवशी कोल्ह्याने उंटाला म्हटले, ''मला भुईमुगाच्या शेंगा खाण्याची खूप आठवण आली. आपण दोघेजण शेंगाच्या शेतात जाऊ या.'' उंट म्हणाला, ''बरे आहे. खरंच जाऊ या. तू शेंगा खाशीन, मी भुईमुगाची झाडे खाईन.''

एके दिवशी पौर्णिमेच्या रात्री दोघेजण निघालेत. रस्त्यात नदी लागली. तिला पाणी जास्त होते. कोल्ह्याचा जीव लहान. त्याला पाण्यातून जाता येत नव्हते. म्हणून उंट खाली बसला. कोल्हा त्याच्या पाठीवर बसला. उंट

उठला, उभा राहिला. नदीतून चालू लागला. कोल्हा खुशीत होता. नदी ओलांडून झाली. तसा उंट खाली बसला. त्याच्या पाठीवरून कोल्हा खाली उतरला. दोघेजण चालत चालत भुईमुगाच्या शेतात पोचले. रात्र बरीच झाली होती. दूरवर चंद्र प्रकाश होता. रखवालदाराला झोप लागली होती. उंट भुईमुगाची झाडे तर कोल्हा त्याच्या शेंगा खात होता. खाता खाता कोल्ह्याचे पोट भरले. त्याने उंटाला म्हटले, 'माझे पोट भरले की मला जोरजोराने ओरडायची सवय आहे.' उंट म्हणाला, 'असे करू नको. जरासा थांब, अजून माझे खाऊन झालेले नाही. माझे पोट भरले नाही' कोल्ह्याने ऐकले नाही. तो जोरजोराने ओरडू लागला. त्याच्या आवाजाने रखवालदार उठला. हातात मोठी काठी घेऊन पळतच आला. उंटाला मारू लागला. कोल्हा पळून गेला. उंट बिचारा मार खाऊन खाऊन आदमुसा झाला. कसातरी आपला जीव वाचवून लंगडत लंगडत शेताच्या बाहेर निघाला.

उंट नदीपर्यंत आला. तेथे कोल्हा त्याची वाटच पाहत होता. उंट खाली बसला. कोल्हा उंटाच्या दुखणाऱ्या पाठीवर बसला. उंट उठला, हळू हळू चालत अर्ध्या नदीत आला अन् कोल्ह्याला म्हणाला, ''पाणी दिसले की मला बसावेसेच वाटते''. कोल्हा भलताच घाबरला नि म्हणाला, ''अरे तू बसशील तर माझे कसे होईल?'' उंट म्हणाला, ''मघा तू माझे ऐकले नाहीस तर आता मी कशाला तुझे ऐकू?'' उंट पाण्यात बसला. कोल्हा पाण्यात पडला आणि वाहून गेला. उंट उठून चालू लागला.

## मराठी लोककथेचे कलाली भाषेत भाषांतर

उंट अन् कोल्ह्या एकमेकके गळी होतीन, एक दिन कोल्ह्याने उटखे कह्यो, 'मखे भुईमुंगगे शेंगा खानकी लय याद आयी. आपुन दोयझन शेंगाके खेतने जाबोन.' उटने कह्यो 'बरो हय, खरंच जाबोन. तू शेंगा खाजो मी झाळको पाला खाऊन.'

एक दिन पुनवके रातखे दोहीजण निकलीन. रस्ताने नदी लगी. ओखे पानी जास्ती होतो. कोल्ह्याको जीव लायनो. पानीनेसे जाता आवत नोतो. कयखे उट खले बठ्यो, ओके पीठपर कोह्या बठ्यो, उट उठ्यो. थाळो रह्यो.

नदीनेसे चलनखे लग्यो. कोल्ह्या खुस होतो. नदी ओलांडखे भयी. उट खले बठ्यो, ओके पीठपरसे कोल्ह्या खले उतऱ्यो. दुहीजन चलत चलत भुइमुंगके खेतने पोवचीन. रात बरीच भई ती. दूरलग चंद्रको उजीळ होतो. सोकारीके जप लगी थी. उट भुईमुंगके झाळ त कोल्ह्या ओके शेंगा खात होतो. खाता खाता कोल्ह्याको लायनोसो पोट भऱ्यो. ओने उटखे कह्यो, 'मरो पोट भऱ्यो की मखे जोरजोरसे चिल्लावनकी सवय हय.' उटने कह्यो, 'असो करू नाको. जरासोक थांब. आजून मरो खायखे नही भयो. मरो पोट नही भऱ्यो.' कोल्ह्याने नही आयको. जोर-जोरसे चिल्लावन लग्यो. ओके अवाजसे सोकारी उठ्यो. हातने बळी काळी लेयखे भगतच आयो. उटखे बदळनखे लग्यो. कोल्ह्या भग गयो. उट बिचारो मार खायखायके अदमुसो भयो. कसोतरी आपलो जीव बच्यायखे लंगळत लंगळत खेत के बाहीर निकऱ्यो. नदीलग आयो. वहां कोल्ह्या ओकी बाटच देख रह्योतो. उट खले बठ्यो. कोल्ह्या ओके दुखरे पीठपर बठ्यो. उट उठ्यो. अरामसे चलत चलत अर्धे नदीने आयो, अन् कोल्ह्यासे कहोन लग्यो, 'मखेबी एक सवय हय, पानी दिख्यो की बठुसा लगय.' कोल्ह्या भल्लोच डारायो अन कहोन लग्यो, 'अरे तू बठजोस त मंग मरो कसो होयेन? बठू नोको!' उटने कह्यो, 'मंघाने तुने मरो आयक्यो नही त आता मी कायखे तोरो आयकू?' अन् उट पाणीने बठ गयो. कोल्ह्या पाणीने गिऱ्यो, बह्यखे गयो. उट उठ्यो, अन चलनखे लग्यो.

### कलाली लोकगीत

१. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलियाको तेल

२. कोण तोरी तेलू चढावय बारे दुलवा
कोण तोरी गा सवाधानी लेय

३. बईनी तोरी तेल चढावय बारे दुलवा
भटवा तोरो गा सवाधानी लेय

४. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलिया को तेल

५. फुफू तोरी तेल चढावय बारे दुलवा
फुफा तोरो गा सवाधानी लेय
६. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलिया को तेल
७. मामी तोरी तेल चढावय बारे दुलवा
मामा तोरी गा सवाधानी लेय
८. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलिया को तेल
९. पान खाता दात रंगे ओ ओठ रंगे
जिभली रंगे ओ केवडाके पान
१०. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलिया को तेल
११. भाभी तोरी तेल चढावय बारे दुलवा
भाई तोरो गा सवाधानी लेय
१२. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलिया को तेल
१३. आजी तोरी तेल चढावय बारे दुलवा
आबा तोरो गा सवाधानी लेय
१४. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलिया को तेल
१५. काकी तोरी तेल चढावय बारे दुलवा
काका तोरो गा सवाधानी लेय
१६. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलिया को तेल
१७. सुपारी खावय, पान चाबय ओ पान चाबय
राई, चंपा ओ तिलिया को तेल
१८. डोंगर डोंगर घानी चले व घानी चले
राई, चंपा ओ तिलिया को तेल

**मराठी भाषांतर**

१. गावागावांत तेलपाणी चालत आहे. मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

२. नवरदेवराजा तुला कोण बरे तेल लावत आहे. कोण बरं तुझी काळजी घेत आहे ?

३. तुझी बहीण तुला तेल लावत आहे आणि तुझे जावई तुझी काळजी घेत आहेत.

४. घराघरात तेलघाणी चालत आहे. मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

५. तुझी आत्या तुला तेल लावत आहे आणि मामा तुझी काळजी घेत आहेत.

६. घराघरात तेलघाणी चालत आहे. मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

७. तुझी मामी तुला तेल लावत आहे आणि तुझे मामा तुझी काळजी घेत आहेत.

८. घराघरांत तेलघाणी चालत आहे. मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

९. पान खाताना तुझे दात आणि ओठ रंगलेत. जीभ केवड्याच्या कोवळ्या पानाप्रमाणे (लालसर) दिसत आहे.

१०. घराघरात तेलघाणी चालत आहे. मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

११. तुझी वहिनी तुला तेल लावत आहे आणि तुझा भाऊ तुझी काळजी घेत आहे.

१२. घराघरात तेलघाणी चालत आहे. मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

१३. तुझी आजी तुला तेल लावत आहे आणि तुझे आजोबा तुझी काळजी घेत आहेत.

१४. घराघरात तेलघाणी चालत आहे. मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल

निघत आहे.

१५. तुझी काकी तुला तेल लावत आहे आणि तुझे काका तुझी काळजी घेत आहेत.

१६. घराघरात तेलघाणी चालत आहे. मोहरी टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

१७. तू पान खाताना सुपारी चावतोस, मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

१८. घराघरात तेलघाणी चालत आहे. मोहरी, टोळी आणि तिळाचे तेल निघत आहे.

**वाक्प्रचार**

| **कलाली** | **मराठी** |
|---|---|
| बोट मोळणो | व्यर्थ चरफडणे |
| तोंड मारणो | मध्येमध्ये बोलणे |
| खळा फोळणो | दोष देणे |
| तारा तोळणो | वेड्यासारखे बोलणे |
| करोन उसो भरोन | कराल तसे भराल |
| जसो अन उसो मन | आहार तशी बुद्धी |
| भरमको बास | खोटेपण, लबाडी |
| तोंडसुक लेय | अद्वातद्वा बोलणे |
| खानको खदाळ | नुसताच खादाड |
| पानीको भयाळ | पाण्याच्या रांजणासारखा |
| आंगधरणी | लठ्ठ होणे |
| गरा को ताईत | अतिशय प्रिय |
| अक्कलको कांदा | मूर्ख |
| भागूबाई | भित्रा |
| हात पिवरे करणो | विवाह करणे |
| लेनदेन चुकय नही | घेणे-देणे चुकत नाही |

| | |
|---|---|
| आयजीके जीवपर बायजी उदार | दुसऱ्याच्या जीवावर उदार होणे |
| मायदेव मोवसी लेव | चांगली वस्तू देऊन सुमार दर्जाची वस्तू घेणे |
| नगरको सगर | वैभवातून दैन्याकडे |
| गांड खजावनखे नखून नाय | गांड खाजवायला नख नाही (अतिशय दारिद्र्य) |
| उरो डोंगर पुरो पाय | अतिशय परिश्रम |
| बारा घाट को पानी पियो | अनुभव संपन्न, पोचलेला |
| उत्राको कुत्रा | अति माज असलेला |

**म्हणी**

* मायबहीन कोणकी, नकटी लुगाईन गुणकी – मायबहीन कोणाची, नकटी बायको गुणाची
* कामको ना काजको, दुस्मन अनाजको – फक्त खातो, कोणतेच काम करीत नाही.
* खान को खदाळ, पाणीको भदाळ –नुसता कुचकामी पाण्याचे मडके असून खूप खादाळ आहे.
* खायखायके गांडको गंगार – नुसताच खादाळ, कामधंदा काहीही न करणारा
* पायली भरी की सिग संडस – अतिरेक केला की आपत्ती येतेच
* सादो देव सुपारी खाय – साध्या माणसाला खाण्याची अडचण नसते. त्याचे खाणे साधे असते.
* गोरी गोरी पान धंदाकी घाण, कारी कारी मिटुक धंदा करे चुटूक चुटूक– दिसायला केवळ गोरीपान आहे, काम कोणतेच येत नाही. मात्र दिसायला काळी असून खूप काम करते, तात्पर्य, दिसण्यापेक्षा असणे महत्त्वाचे असते.
* पैसा की मेख, तमाशा देख – पैशामुळे खूप काही मिळू शकते.

* येळूमेळू बाप बेटा साळ – गोलमेल, बनवाबनवी, फसवाफसवी
* आबे लड्डू, जाबे लड्डू – नुसतेच येणे जाणे करणे
* उरो डोंगर पुरो पाय – खूप त्रासांनी यश मिळणे
* संबाल गबरू आपली आबरू – सज्जन माणसा, आपली अब्रू सांभाळ
* आपलो राखय झाकखे, दुसरे को देखय झुकके – आपले ठेवतो झाकून, दुसऱ्याचे पाहतो वाकून
* लाज नहाय लज्जाखे, तेल नाहाय भज्जाखे – बेशरम माणसाला कशाचीच लाज नसते
* हसी की फसी – हसली ती फसती
* हरबरा को खानो दात इचकनो, उंबिको खानो काळी कुचकानो – हरबरे खाण्याने दात खराब होतात. उंबी खाल्ल्याने ती दातात अडकल्याने बारीक काड्यांनी काढावी लागते. तात्पर्य, काहीच चांगले नाही.
* अळजीब खाय अन् पळजीब ललावत जाय – अर्धवट खायला मिळणे
* करनो उसो भरणो – कराल तसे भराल
* करय उसो भरय – जसे करतो तसे भरतो
* करोन उसो भरोन – कराल तसे भराल
* करोन त भरोन – कराल तर भराल
* करय हू भरय – करतो तो भरतो
* जेकेसे होय, ओनेच करने – ज्याच्याकडून होते, त्यानेच करावे
* जेको काम ओनेच करणे – ज्याचे काम त्यानेच करावे
* अपापाको माल हपापा – दुसऱ्याच्या वस्तू हडप करणे
* होतो को नो तो होय – असलेले नष्ट होते
* सामसुंदर बेटी चुलो फुकन बठी, उंदरामुंदरा बेटा, मुंडकाखे बांधय फेटा, कचेरिने जायखे बठ्यो – मुलगी कितीही सुंदर असली तरी तिला चूलच फुंकावी लागते अन् मुलगा काळा किंवा विद्रूप असला तरी डोक्याला फेटा बांधून कोर्टात जाऊन बसतो

## नामे

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| नोन | मीठ | कोंबळी | कोंबडी |
| आंगी | चोळी | झ्यांपर | पोलके |
| मोंगरी | मोगरी, कांडण्याचे | बायरी | फळा |
| | लाकडी यंत्र | | |
| पसा | ओंजळ | दरोजा | दरवाजा |
| उखर | उखळ | सुळा | अडकित्ता |
| पगळी | पगडी | जांब | पेरू |
| ककळी | काकडी | राज | गवंडी |
| येरू | वेळू | लाळा | नवरा |
| बटकी | दासी | तिल्ली | तीळ |
| बास | वास | जोंधरा | ज्वारी |
| बगार | वगार, म्हशीचे | पचा | धोतर |
| | स्त्रीलिंगी पिल्लू | | |
| बिलाई | मांजर | मामोजी | उंदीर |
| बिच्चू | विंचू | रायता | लोणचे |
| शिदोळ | गांडूळ | लेवळी | रेवडी |
| गुंज्या | करंजी | सुसरंजी | चिचुंद्री |

## सर्वनामे

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| मी | मी | तू | तू |
| हम | आम्ही | तुम | तुम्ही |
| आमारो | आमचा | तुमारो | तुमचा |
| ही | हे | ही | ते |

| | | | |
|---|---|---|---|
| मखे | मला | तोखे | तुला |
| आमाखे | आम्हाला | तुमाखे | तुम्हाला |
| वा | ती | यो | हा |
| या | ही | ही | हे |

**विशेषणे**

| **कलाली** | **मराठी** | **कलाली** | **मराठी** |
|---|---|---|---|
| ताजो | ताजा | लायनी | लहान |
| जुनो | जुना | बळो | मोठा |
| खट्टो | आंबट | बळी | मोठी |
| पुरो | पूर्ण | सरको | सरळ |
| उची/उचो | उंच | सरकोतीर | अगदी सरळ |
| खराब | वाईट | रूंदो | रुंद |
| अर्धो | अर्धा | हेकोळो | वाकडा |
| अरूंदो | अरुंद | घुट्टो | ठेंगणा |
| नवो | नवीन | बासी | शिळी |
| अलोनी | अळणी (मीठ न घातलेली) | बासो | शिळे |
| सफा | स्वच्छ | चोखट | चांगला |
| गोळ | गोळ | कळू | कडू |
| अरून | अरंद | निरून | अरुंद |
| खरो | खरा | खोटो | खोटा |
| फिक्की | फिकी | फिक्को | फिका |
| जवान | तरुण | मऱ्यो | मेला |
| फुटको | अंध | कोळलो | सुका, वाळलेला |
| बुड्ढा | वृद्ध | जितो | जिवंत |
| पयलो | पहिला | दुखी | दुःखी |

| | | | |
|---|---|---|---|
| खोटो | खोटा | कळक | कडक |
| हलको | हलका | पिसा | वेडा |
| जाळो | जाड | जाळो | थंडी |
| केरा | केळी | चांगलो | चांगला |
| सुकी | सुखी | सुखो | सुखी |

## क्रियापदे

| **कलाली** | **मराठी** | **कलाली** | **मराठी** |
|---|---|---|---|
| वाटनो | वाटणे | ना रवनो | नसणे |
| नही | नाही | हलावनो | हलविणे |
| पायजे | पाहिजे | शिकनो | शिकणे |
| आवनो | येणे | पिवनो | पिणे |
| होनो | होणे | मुरावनो | मुरविणे |
| बतावने | सांगणे | पखळनो | पाखडणे |
| देखणो | पाहणे | डरावने | घाबरणे |
| ओळनो | ओढने | रिचवनो | रिचविणे |
| आयकनो | ऐकणे | खानो | खाणे |
| पुसनो | विचारणे | जेवनो | जेवणे |
| भयो | झाले | हासनो | हसणे |
| धावनो | पळणे | पोवनो | पोहणे |
| अळावणो | अडविणे | हलावनो | हलविणे |
| रोवनो | गाडणे | करनो | करणे |
| दिखावनो | दाखविणे | भिजावनो | भिजविणे |
| धोवनो | धुणे | पिघलनो | वितळणे |
| जावनो | जाणे | रवनो | राहणे |
| पुसनो | विचारणे | गिरने | पडणे |
| पिनो | पिणे | लोटणो | लोटणे |
| फुग्यो | फुगला | रूस्यो | रुसला |

| | | | |
|---|---|---|---|
| मारनो | मारणे | कुदनो | कुदणे |
| शिकावनो | शिकविणे | पटावनो | पटविणे |
| भरनो | भरणे | निकारनो | काढणे |
| फुगणो | फुगणे | बतावनो | सांगणे |
| मिसरनो | मिसळणे | जरनो | जळणे |
| पुसनो | विचारणे | देखनो | पाहणे |
| नाहात | नाहीत | भगने | पळणे |
| जावनो | जाणे | अटावनो | आटवणे |

## नातेसंबंध

| **कलाली** | **मराठी** | **कलाली** | **मराठी** |
|---|---|---|---|
| माय | आई | सग्गी | सख्खी |
| टुरा | मुलगा | समदी | व्याही |
| टुरी | मुलगी | भाटो | जावई (मोठ्या |
| | | | बहिणीचा नवरा) |
| लाळा | नवरा | सग्गो | सख्खा |
| लुगाईन | बायको | देऊर | दीर |
| भाबी | वहिनी | ननद | नणंद |
| फुपू | आत्या (बापाची बहीण) | गळी | मित्र |
| समदीन | विहीन | गळीन | मैत्रीण |
| नातीन | नात | मोवसी | मावशी |
| मोवश्या | मावसा (आईच्या धाकट्या बहिणीचा पती) | चुलत सुसरो | बायकोचा काका |
| बळीमाय | वडिलांच्या थोरल्या भावाची बायको | भासा | भाचा |
| लायनो भाई | लहान भाऊ | फुपेसासू | बायकोची आत्या |

| | | | |
|---|---|---|---|
| कामगळी | कामगडी, कामावरचा माणूस | आजे सासू | बायकोचे आजोबा |
| बळोबाप | वडिलांचा मोठा भाऊ | मामसुसरो | बायकोचा मामा |
| बळोभाई | मोठा भाऊ | काके सासू | बायकोची काकी |
| बळोबाबा | मोठे वडील | फुपे सुसरो | बायकोच्या आत्याचा नवरा |
| जवाई | जावई | भासबहु | बहिणीच्या मुलाची बायको |
| सुसरो | सासरा | सारो | बायकोचा लहान भाऊ |
| घरवाली | बायको | देरानी | दिराची बायको |
| घरवालो | नवरा | आक्कळ सासू | अक्कड सासू |

## रंगांची नावे

| **कलाली** | **मराठी** | **कलाली** | **मराठी** |
|---|---|---|---|
| हिरवो | हिरवा | कारो | काळा |
| पांडरो/पांड्रो | पांढरा | भुरकट | भुरा |
| जांबरो | जांभळा | कथ्थो | काथाच्या रंगाचा |
| पोपटी | फिक्कट हिरवा | सावरो | सावळा |
| उदो | निळा | बदामी | फिक्कट पिवळा |
| सेंदरो | सेंदरी | राखोंडी | राखेसारखा |
| पिवरो | पिवळा | पिवरे | पिवळे |

## काळ/वेळ

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| पहेट | सकाळ | दिन | दिवस |
| दुफ्फर<br>संध्याकाय | दुपार<br>संध्याकाळ | मयना<br>औंदा | महिना<br>यावर्षी |
| अर्धोदिन | अर्धा दिवस | गुदस्ता | मागच्या वर्षी |
| पुरोदिन | पूर्ण दिवस | आंदी | आधी |
| बरस | वर्ष | पयले | प्रथम |
| परोके दिन | परवाच्या दिवशी | नरोके दिन | चवथ्या दिवशी |
| सकार | उद्या | अवस | अमावास्या |
| पुनव | पौर्णिमा | परो | परवा |

## ऋतू/दिनचक्र

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| उनारा | उन्हाळा | बरसात | पावसाळा |
| हिवारा | हिवाळा | झळी | झड |

## नक्षत्रे

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| मिरूग | मृग | रोयनी | रोहिणी |
| अर्दळा | आर्द्रा | बळो पूक | पुनर्वसू |
| लायनो पूक | पुष्य | असयका | आश्लेषा |
| मगा | मघा | पूरभा | पूर्वा |
| उत्रा | उत्तरा | हत्ती | हस्त |
| चितरा | चित्रा | सवाती | स्वाती |

## वार

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| सोम्मार | सोमवार | मंगरवार | मंगळवार |
| बुद्वार | बुधवार | बस्तरवार | गुरुवार |
| सुक्करवार | शुक्रवार | सन्वार | शनिवार |
| इतवार | रविवार | | |

## महिन्यांची नावे

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| चईत | चैत्र | बैसाक | वैशाख |
| जेस्टो | ज्येष्ठ | अखाळ | आषाढ |
| सरावन | श्रावण | भादवा | भाद्रपद |
| आस्विन | आश्विन | कारतिक | कार्तिक |
| मार्गसीस | मार्गशीर्ष | पूस | पौष |
| माग | माघ | फाग | फाल्गुन |

## शरीराचे अवयव

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| जीब | जीभ | गरा | गळा |
| आखी | डोळा | मुंडका | डोके |
| तरहात | तळहात | तरपाय | तळपाय |
| कलिजा | हृदय | ढोपर | कोपरा |
| करंगई | करंगळी | अंगठा | आंगठा |
| अळजीब | आडजीभ | कातळा | त्वचा |
| हड्डी | हाड | कुल्ला | नितंब |
| बोंबली | बेंबी | पोटरकी | पोटरी |
| गांड | गुदद्वार | आतळा | आतडी |
| फेंडा | नितंब | केसा | केस |

| | | | |
|---|---|---|---|
| भुवई | भिवई | पाप्नी | पापणी |
| थान | स्तन | पीठ | पाठ |
| होय | ओठ | टोंगरा | गुडघा |
| नक् | नख | पसा | ओंजळ |
| कपार | कपाळ | दातकुळी | हनुवटी |
| बगल | काख | बख्खा | खांदा |

## अंक

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| येक | एक | दोय | दोन |
| तीन | तीन | च्यार | चार |
| पाच | पाच | सय | सहा |
| सात | सात | आट | आठ |
| नव | नऊ | दस | दहा |
| बीस | वीस | पचास | पन्नास |
| सव् | शंभर | एकसौ एक | एकशे एक |

## मापे/अंतर

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| शटाक | छटाक | पावशेर | पावकिलो |
| शेर | अर्धा किलो | अदली | एक किलो |
| पायली | दोन किलो | कुळो | आठ पायल्या १६ किलो |
| वार | मीटर | हातभर | दीडफूट |
| मैल | १.६ कि.मी. | कोस | दोन मैल |
| धळा | दोन किलो | पासरी | ३ किलो |

| | | | |
|---|---|---|---|
| मन | भाजीपाल्याकरिता १० किलो धान्याकरिता ४० किलो | पांहरा | ५ किलो |
| खंडी | २० मन (४० किलोचा एक मन) | | |

पाण्याची खोली मोजताना एक पुरूस, दोन पुरूस, जवळचे व कमी अंतर मोजताना एक हित (९ इंच) दोन हित, (एक हात) थोडे जास्त अंतर असले तर पावले टाकून मोजतात.
काठी, बांबू, लाकूड यांची लांबी एक हात, दोन हात अशी मोजतात.

**कालवाचक**

| **कलाली** | **मराठी** | **कलाली** | **मराठी** |
|---|---|---|---|
| (प्र.पु.ए.व.) मी जाऊ | (प्र.पु.ए.व.) मी जातो | (प्र.पु.अ.व.) हाम जाते | (प्र.पु.अ.व.) आम्ही जातो |
| (द्वि.पु.ए.व.) तू बाचस | (द्वि.पु.ए.व.) तू वाचतोस | (द्वि.पु.अ.व.) तुम बाचो | (द्वि.पु.अ.व.) तुम्ही वाचा |
| (तृ.पु.ए.व.) हू खेलय | (तृ.पु.ए.व.) तो खेळतो | (तृ.पु.अ.व.) ही खेलत | (तृ.पु.अ.व.) ते खेळतात |
| (तृ.पु.ए.व.) स्त्रीलिंगी) | (तृ.पु.ए.व.) स्त्रीलिंगी) | (तृ.पु.अ.व.) स्त्रीलिंगी) | (तृ.पु.अ.व.) स्त्रीलिंगी) |
| (तृ.पु.ए.व.) वा हासय | (तृ.पु.ए.व.) ती हसते | (तृ.पु.अ.व.) ही हासत | (तृ.पु.अ.व.) त्या हसतात |
| (नपु.लिंगी) पाखरू उळय | (नपु.लिंगी) पाखरू उडते | (नपु.लिंगी) पाखरू उळत | (नपु.लिंगी) पाखरे उडतात |

## शेती, व्यवहार, वापरातील वस्तू

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| खेती | शेती | गारने | गाळणे |
| गोबर | शेण | बायरी | फळा |
| कारीमाती | काळी माती | हल्या | रेडा |
| पिवरी माती | पिवळी माती | एळका | एडका |
| गोरा | गोऱ्हा | मेंढरी | मेंढी |
| कारोळ | कालवड | अन्ना | पीक न उगवलेली रिक्त जागा |
| भसी | म्हैस | | |
| बगार | म्हशीचे स्त्रीलिंगी पिल्लू | कुतरा | कुत्रा |
| गोबरको खत | शेणखत | कुतरी | कुत्री |
| कुवा | विहीर | बोकळ्या | बोकड |
| पानी | पाणी | पायना | झोपाळा |
| कुदई | कुदळ, कुदळी | तिल्ली | तीळ |
| घंबिला | घमेले | इल्ली | अळी |
| पावळा | फावडे | हिरवो | हिरवा |
| बख्खर | वखर | पिवरो | पिवळा |
| इरा | विळा | उदी | निळी |
| तुत्या | वखराच्या फळाची माती काढणारी लोखंडी पट्टी | पन्हई | पादत्राणे |
| भरना | घागर | जोंधरा | ज्वारी |
| बाल्टी | बकेट | थाळी | उभी |
| खुरपा | विळी, लहान विळा | सुसरंजी | चिचुंद्री |
| गाळा | गाडी | बिलाई | मांजर |

| | | | |
|---|---|---|---|
| बैलगाळा | बैलगाडी | मामोजी | उंदीर |
| हरनी | हरिणी | हळ्या | कावळा |
| पाठ | बकरीचे स्त्रीलिंगी पिल्लू | बटकी | वाटी |
| बंदरा | वानर | दाय | डाळ |
| बजार | बाजार | ओवारनी | ओवाळणी |
| मिरूग<br>पेरय | मृग<br>पेरतो | कोस<br>पायली | दोन मैल<br>दोन किलो |
| दरोजा | दरवाजा | अदली | एक किलो |
| कवाळ | दरवाजा | शटाक | छटाक |
| खटुला | लहान खाट | दुफ्फर | दुपार |
| कुराळ | कुऱ्हाड | मयना | महिना |
| तोळने | तोडणे | मयना | मैना |
| गाळने | गाडने | जरतन | सर्पन |
| दुस्काळ | दुष्काळ | गराभर | गळाभर |
| अंगठा | आंगठा | गरालग | गळ्यापर्यंत |
| टोंगरा | गुडघा | तपन | ऊन |
| आखी | डोळा | तपने | तापने |
| फेंडा | नितंब | मामेसुसरो | बायकोचा मामा |
| बोंबली | बेंबी | आजेसुसरो | बायकोचा आजोबा |
| जीब | जीभ | फुपेसासू | बायकोची आत्या |
| टुरा | मुलगा | काके सासू | बायकोची काकू |
| टुरी | मुलगी | बळेबाबा | मोठे वडील |
| लाळा | नवरा | बळीमाय | मोठी आई |
| लुगाईन | बायको | पेहरने | नेसणे |
| भाटो | मोठ्या बहिणीचा नवरा | लैंगा | परपर |
| सारो | बायकोचा लहान भाऊ | इ्यांपर | पोलके |

| | | | |
|---|---|---|---|
| सारी | बायकोची लहान बहीण | आंगी | चोळी |
| बरस | वर्ष | नोन | मीठ |
| सकार | सकाळ | खाय | खातो |
| गुदस्ता | मागच्या वर्षी | फुपेसुसरो | बायकोच्या आतेचा पती |
| लाळी | नवरी | बाखरी | झाडू |
| पुरो | पूर्ण | गुंज्या | करंजी |
| पयले | प्रथम | येरू | वेळ, बांबू |
| आंदी | आधी | केरा | केळी |
| उनारा | उन्हाळा | भासबहू | बहिणीच्या मुलाची पत्नी |
| हिवारा | हिवाळा | ओवारनी | ओवाळणी |
| बरसात | पावसाळा | आषाळ | आषाढ |
| रोयनी | रोहिणी नक्षत्र | सरावन | श्रावण |
| पूक | पुनर्वसू नक्षत्र | पूस | पौष |
| पूरभा | पूर्वा नक्षत्र | चईत | चैत्र |
| सवाती | स्वाती नक्षत्र | बैसाक | वैशाख |
| अर्दळा | आर्द्रा नक्षत्र | जेस्टा | ज्येष्ठ |
| उत्रा | उत्तरा नक्षत्र | आस्विन | आश्विन |
| पूक | पुष्य नक्षत्र | मार्गसीरस | मार्गशीर्ष |
| चितरा | चित्रा नक्षत्र | माग | माघ |
| करंगई | करंगळी | फाग | फाल्गुन |
| पीट | पाठ | दांगळो | गोंधळ |
| बोंबली | बेंबी | दिठाई | दृष्ट लागली |
| पसा | ओंजळ | दिठ | दृष्ट |
| गारने | गाळणे | चोखट | चांगला |
| परसने | वाढणे | ओरख | ओळख |

| | | | |
|---|---|---|---|
| अवंदा | यावर्षी | कवतिक | कौतुक |
| पतराई | पत्रावळ | भल्लोच | भलकसा |
| थुंगा | स्त्री मजुरांचा जमाव | करनकटी | जादुटोणा करणारी |
| बरताव | स्वभाव | पयलो | पहिला |
| निरखने | न्याहळणे | घरकी | घरातली |
| संग | सोबत | रोव | गाड |
| जेवनो | उजवा | रोव | रड |
| इते | इकडे | अंबल | व्यसन |
| उते | तिकडे | लटलटी | थरथरा |
| सरसो | श्रेष्ठ | लबरलबर | खूप घाईने |
| चालनी | चाळणी | बळायो | वाढविले |
| डरावने | भिणे | लुकय | लपतो |
| निमता | विनंती | कळली | करडी |
| पतलो | पातळ | बळायो | मोठे केले |
| इतलोसो | इतकासा | शेकळा | शेकडा |
| सरावने | सारवने | लावलगाई | लावालावी |
| मयनासे | महिन्याने | सिकापर | शिंक्यावर |
| ढुक | डोकाव | पिपर | पिंपळ |
| मही | ताक | कंदा | कंद |
| केना | एक रानभाजी | मगज | गर |
| हेंगाळो | विद्रूप | आमाखे | आम्हाला |
| लगत | लागतात | हेंबाळो | मूर्ख |
| बुजगावना | बुजगावणे | सावटो | जमा करा |
| करकटलो | कळकट, घाणेरडा | बठय | बसतो |
| दई | दही | रकत | रक्त |

## इतर शब्द

| कलाली | मराठी | कलाली | मराठी |
|---|---|---|---|
| कुळता | शर्ट | तपन | ऊन |
| वटा | ओटा | हव | होय |
| कुप्पी | बाटली | भयो | झाले |
| सब | सर्व | फुपू | आत्या, बापाची बहीण |
| जाळो | थंडी | थक्यो | थकला |
| निसने | निवडणे | इते | इकडे |
| रंधावन | स्वयंपाक खोली | उते | तिकडे |
| भरना | घागर | इतेको | इकडचा |
| रकत | रक्त | कहा जाय? | कुठे जातोस? |
| गोटा | दगड | डरायो | घाबरला |
| खेतने | शेतात | सोवय | झोपतो |
| सरप | साप | बेपट | बोळ |
| बिच्चू | विंचू | चाबय | चावतो |
| बाग | वाघ | डावो | डावा |
| ओखे | त्याला | जाळो | लठ्ठ |
| लगय | लागते | दरय | दळतो |
| पिवय | पितो | चरय | चरतो |
| मरय | मरतो | रूतय | रुततो |
| उचो | उंच | ठेंगनो | ठेंगू |
| जेवनो | उजवा | उजर | उजळ |
| लंगळो | लंगडा | लंगळय | लंगडतो |
| अवस | अमावास्या | पुनव | पौर्णिमा |
| दिवारी | दिवाळी | सगर | पायवाट |
| जत्रा | यात्रा | इऱ्यो | विरला |
| सेंदरी | शेंदरी (रंग) | तरपाय | तळपाय |

| | | | |
|---|---|---|---|
| परो | परवा | तरहात | तळहात |
| सय | सहा | सरावन | श्रावण |
| रंडवा | विधवा | धुरा | शेताचा बांध |
| फसय | फसते | हासय | हसतो |
| देऊर | दिर | भोवजई | वहिनी |
| जोळा | जोडा | भाबी | वहिनी |
| चाबी | चावली | गदा | गाढव |
| सिंव | सिंह | पोरा | पोळा |
| उकळला | उकिरडा | रायता | लोणचे |
| कोणखे | कोणाला | कोणे | कोणी |
| नोन | मीठ | चखना | भाजी |

**वैशिष्ट्ये**

* कलाली ही एक वेगळी व वैशिष्ट्यसंपन्न भाषा आहे.
* तिचा अनेक भाषाभगिनींशी संबंध आहे.
* या भाषेतील समृद्ध लोकगीते, ही प्राचीन परंपरा व संस्कृतीचे जतन करतात.
* बागदेव, दुलादेव, भाकरदेव, महादेव, नारायण देव हे कलालांचे देव येथील विविध आदिम व आधुनिक संस्कृतीशी नाते सांगतात.
* कलाली गीतातून लोकमानसाबरोबर जीवन मूल्यांचेही दर्शन घडते.
* ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या दिवसेंदिवस कमी होत आहे.
* भविष्यात जागतिकीकरणाच्या झंझावातात कलाली भाषा नामशेष होण्याची भीती आहे.
* ह्या भाषेतून वाक्प्रचार, म्हणी व शिव्यांची रेलचेल दिसते.
* कलाली ही प्राचीन भाषा असली तरी तिने आधुनिकतेशी संवादी नाते जोडले आहे.
* ग्रामीण जीवनापेक्षा महानगरातून ती अधिक लोप पावत आहे.

## कोशात योजिलेली संक्षिप्त रूपे व अर्थ

(उ.अ.) उभयान्वयी अव्यय

(के.प्र.) केवलप्रयोगी अव्यय

(क्रि) क्रियापद

(क्रि.वि.) क्रियाविशेषण

(न.) नपुसकलिंगी

(ना.) नाम

(ना.न.) नाम, नपुसकलिंगी

शब्दयोगी नाम

(ना.+ श) (पु.) पुल्लिंगी

(भ.) भविष्यकाळ

(भा.वा.ना.) भाववाचक नाम

(भू.) भूतकाळ

(व.) वर्तमानकाळ

(वि.) विशेषण

(श.) शब्दयोगी

(स्त्री.) स्त्रीलिंगी

# अ

**अईन–** ऐन

**अकरमास्या –** अकरा महिने गर्भाशयात राहिल्यानंतर जन्मलेले बाळ.

**अकरी** (वि.)(स्त्री.)(वि.)– बदमाशी, नियत फिरली

**अकरी**(वि)(स्त्री)(वि.)–एक शिवी

**अकऱ्या**(वि)– एक शिवी

**अकळ**(वि)(स्त्री)– अकड, अभिमान, ताठा, दिमाख, तोरा

**अकळखे** (स्त्री)(वि)– अकडून, जास्त भाव खाऊन, दुष्ट माणूस अकडून वागतो.

**अकळणे** (क्रि.)– गारठणे, रुसणे

**अकळणो**(क्रि.)– रुसणे, भाव खाणे, गारठणे

**अकळ**(क्रि.)– रुसतो, फुगतो, भाव खातो, गारठतो.

**अकळाअकळी**(क्रिवि.)– रुसणे, फुगणे, रुसवाफुगवा

**अकळी**(क्रि.)(वि.)– गारठली, थंडीने गारठली, रुसली

**अकळीती** (क्रि.)(वि.)– अकडली होती, रुसली होती

**अकळेल**(क्रि.)(वि.)– ऐटबाज, गर्विष्ठ, अहंकारी ताठलेला

**अकळेल** (वि.)– उगीचच भाव खाणारा, मोठेपणा, मिरविणारा

**अकळोन** (क्रि.)– थंडीने गारठाल, उगीचच मोठेपणा मिरवाल

**अकळ्यो** (क्रि.) – रुसला, फुगला

**अकळ्यो** (क्रि.) – अकडला, थंडीने गारठला

**अकळ्योतो** (क्रि.)– अकडला होता, थंडीने गारठला होता.

**अकात** (क्रि.)(वि.)– आकांत, आक्रोश

**अकाती** (स्त्री.)(वि.)–खादाळ स्त्री

**अकात्या**(वि.)–खादाळ, बेसुमार खात सुटणारा

**अकात्यो** (वि.)–हपापलेला, हावरट

**अक्री**(स्त्री.)(वि.)–एक शिवी, बदमाशी

**अक्कलको कांदा** (वि.)– अति शहाणा, मूर्ख

**अखजी** (स्त्री.) (ना.)– अक्षयतृतीया, वैशाख शुद्ध तृतीया

**अखरपख** (ना.)(पु.)– सर्वपित्री

अमावास्या

**अखरय** (स्त्री.)- जड होते, त्रास होतो

**अखाळा**(ना.)(पु.)- आखाडा, कुस्ती करण्याची जागा

**अख्खी** (स्त्री.)(पु.)- सर्व, पूर्ण, उदा. पूर्ण रात्रभर पाऊस कोसळत होता.

**अख्खो** (पु.) (वि.)- पूर्ण, संपूर्ण, सर्व

**अंगठा** (पु.)(ना.)- आंगठा

**अंगठी** (ना.)(स्त्री.)- आंगठी, करंगळी, हाताचे सर्वात लहान बोट

**अगयपगय** (वि.)- भरपूर, खूप विपुल, पुष्कळ, मनासारखे

**अगळबंब** (वि.)- लठ्ठ, अगडबंब, आकारविहीन

**अगळबंब** (वि.)- नागडा, वस्त्रविहीन

**अगळमबगळम** (वि.)(स्त्री.)- निरर्थक, काहीतरीच

**अगाईत** (ना.न.)- लहान पिके

**अगाजत-** प्रसिद्धी पावतात, नावारूपाला येतात

**अगाजय** (क्रि.)- गाजावाजा करतो, नावारूपाला येतो.

**अगाजी** (क्रि.)- गाजावाजा झालेली, नावरूपाला आलेली

**अगाज्यो**(भू.)(क्रि.)(वि/स्त्री.)- गाजावाजा झाला, नावारूपाला आला.

**अगास** (ना.पु.)-आकाश, नभ

**अगासपायना** (ना.पु.)- आकाशपाळणा

**अगासपायना**(वि.)- तिरळा, तिरवा

**अघरपघर**(वि.)- अघळपघळ, यथेच्छ, मनसोक्त

**अचंबा**(पु.)(वि./भा.वा.ना.)- आश्चर्य, नवल, कुतूहल

**अच्यार** (ना.न.)- लोणचे

**अजमायी**(क्रि.)- अंदाजली

**अजमायो** (क्रि.)- अंदाजला

**अजमाव**(पु.)(क्रि.)- अंदाज घे

**अजमावनखे** (क्रि.)- अंदाज घ्यायला

**अजमावय** (क्रि.)- अंदाज घेतो

**अजरण** (न.)(क्रि.वि.)- अजीर्ण

**अजिजी**(वि.)- लाचारी, हाजीहाजी, गयावया

**अटकणे** (क्रि.)- अडकणे, लटकणे, सापडणे

**अटकय** (क्रि. वि.)- अडकते, अडकतो

**अटकी** (क्रि. भू.)- अडकली

**अटकोन** (क्रि.भ.)- अडकाल
**अटक्यो** (क्रि.)- अडकला
**अटप**(क्रि.)(स्त्री.)- आवर, उरक
**अटपी** (क्रि.भू.)(स्त्री.)- आटोपली, उरकली
**अटपटी**(वि.)- अर्थशून्य
**अटरय** (क्रि.)- आटतो, कमी होतो
**अटरनखे** (क्रि.)(वि.)- आटायला
**अटरणे** - आटणे, आक्रसणे, कमी होणे
**अटरी**(क्रि.भू.स्त्री.)- कमी झाली, आटली, धुतल्याने कापड आटले
**अटऱ्यो** (क्रि.भू.पु.) आटला, नवीन कापड काही वेळ पाण्यात ठेवल्याने आटले, कमी झाले.
**अटांगपटांग** (क्रि.वि.)- अनिर्बंध, व्यापक, मनमानी, मनमानी बोलणे
**अटारा** (पु.क्रि.वि.,भा.वा.ना.)- व्याप, पसारा
**अटारा** (पु.ना.)- माडी, माळा, सटरपटर वस्तू, सामान ठेवण्याची माडीवरील जागा.
**अठरय** (क्रि.)- टाळाटाळ करतो.
**अठ्ठर** (वि.)- कोणाचेही न ऐकणारा, कोणालाही न मानणारा बेमुरवत, असभ्य, उर्मट, हेकेखोर
**अदरक** (ना.पु.)- आर्द्रक
**अदलबदल** (क्रि.वि.)- अदलाबदल
**अदली** (स्त्री)- एक किलो
**अदिक** (वि.)- अधिक, जास्त
**अदिक का उनो** - कमी जास्त, कमी किंवा जास्त
**अदिकका**- अजून काय?
**अदिककी** (वि.)- जास्तीची, अतिरिक्त
**अदिकको** (पु.वि.)- जास्तीचा, अतिरिक्त
**अदिकमयना** (ना.)- अधिकमास, चांद्रवर्षात सुमारे दर अडीच ते तीन वर्षांनंतर येणारा तेरावा महिना
**अद्र-मुद्दाम** (क्रि.वि.)- जाणूनबुजून, हेतुपुरस्सर
**अद्रक** - आले
**अरुंदी** (स्त्री.)- अरुंद, सीमित
**अरुंदो** (वि.)- अरुंद, सीमित
**अर्दळा** (ना.पु.)- आर्दा नक्षत्र, एकूण सत्तावीस नक्षत्रांपैकी सहावे नक्षत्र, मृगशीर्ष व पुनर्वसु या दोन नक्षत्रांच्या मधले नक्षत्र.
**अधर** (पु.क्रि.वि.)- हळूहळू,

निसरड्या वाटेवरून हळूहळू पावले टाका

**अधर तरंगय** (पु.)- वरचेवर तरंगतो

**अधार** (पु.स्त्री.) - आधार, मदत, सहकार्य, हात देणे

**अधिकको** (वि.)- जास्तीचा, अतिरिक्त

**अनखीन** (वि.)- आणखी, अधिक, शिवाय

**अनपान, अनपाणी** (ना.)- अन्नपाणी

**अनारसा** (पु.)- अनारसे

**अन्नेर** (न.)- डाळिंब

**अपितर** (वि.)- विक्षिप्त

**अपेट** (वि.क्रि.वि.)- अडचण

**अपेटी** (वि.)- अडचणीचा

**अबे** (पु.के.प्र.)- अरे

**अभार** (ना.पु.)- आभाळ, आकाश

**अभारने** (अ.)- आकाशात

**अभारभर** – आकाशभर

**अभे** (क्रि.वि.)- आता

**अभेअभे**(क्रि.वि.)- आत्ताच

**अभेके** (क्रि.वि.)- आताचे

**अभेके अभे** (क्रि.वि.)- आत्ताच्या आता

**अभेलग** (अ.)(क्रि.वि.)- आतापर्यंत

**अभेसे** (अ.) (क्रि.वि.)- आतापासून

**अमीर** (पु.)(वि.)- श्रीमंत, संपत्तीमान

**अमुक** (वि.)- विवक्षित

**अमुकटमुक**(वि.)- अमुक अमुक, कोणी एक

**अयदी** (वि.)- आळशी, सुस्तावलेला, कामचुकार

**अयबान्या**(वि.)- वेंधळा, मंद बुद्धीचा, अविवेकी, बावळट

**अरधी**(वि.)- अर्धी

**अरधी रात**(वि.)- मध्यरात्र, अर्धी रात्र

**अरधे**(वि.)- अर्धे

**अरधेने**(वि.)- अर्ध्याने, अर्ध्यात

**अरधेनेसे** (अ.) अर्ध्यातून

**अरधेपर**(वि.)- अर्ध्यावर

**अरधेसे**(वि.)- अर्ध्याने

**अरधो** (वि.)- अर्धा

**अरधोपरधो**(वि.)- सुमारे अर्धे

**अरनपपई** (वि.)(ना. स्त्री.)- पपई

**अरबट** (वि.) उद्धट, उरमट, असभ्य

**अरबटचरबट** (वि.)- बेचव, काहीचे काही, निःसत्त्व

मारणार
**कुदय** (क्रि.)– उडी मारतो
**कुद** (क्रि.)(स्त्री.)– उडी मारली
**कुदीन** (क्रि.)– उड्या मारल्यात
**कुदो** (क्रि.)– उड्या मारा
**कुदोन** (क्रि.)(भ.)– उड्या माराल
**कुपजा** (ना.वि.)– स्त्रीला उद्देशून एक शिवी
**कुप्पी** (ना)– शिशी, बाटली, काचेची बाटली
**कुबळी** (ना.)– कुबडी, आधाराची काठी, पाठीला पोक आलेली स्त्री
**कुर्बूर–** कुरकूर, तक्रार
**कुयटली** (ना.वि.)– स्त्रीला उद्देशून एक शिवी, कुजलेली
**कुयटलो** (ना.वि./ क्रि.वि.)– पुरुषाला उद्देशून एक शिवी, कुजलेला
**कुरघोळी** (क्रि.वि.)– कुरघोडी, मात, विजय
**कुरबानी** (भा.वा.ना.)– कुर्बानी, बलिदान
**कुराळ** (ना.वि.)– मुलीला उद्देशून शिवीवजा शब्द, कुऱ्हाड, कुठार, लाकडे फोडण्याचे एक लोखंडी हत्यार
**कुरूकुरू** (क्रि.वि.)– वेगाने, लवकर
**कुरोळी** (ना.)– कुरडई, तेलात तळून खाण्याचा गव्हाच्या पिठाचा एक पदार्थ
**कुल्ला** (ना.)– नितंब, ढुंगण
**कुवा** (ना.)– विहीर/ मोठा आड
**कुवाने** (ना.)– विहिरीत
**कुवासा** (ना.वि.)– लग्नात वरासोबत वावरणारा त्याचा मदतनीस, सहकारी
**कुवासिन** (ना.)– लग्नात वधुसोबत वावरणारी, तिची सहकारी मुलगी
**कुशा** (ना.) – सब्बल, पहार, लोखंडाची लांब व जाड कांब
**कुळता** (ना.)– कुडता, सदरा, शर्ट, खमीज
**कूट** (वि.)– कांड, बारीक कर
**कूट** (ना.)– चुरा, स्वयंपाकात लागणाऱ्या खाण्याच्या वस्तू (शेंगदाणा कूट)
**केंडी** (क्रि.)– रोड झाली, प्रकृती ढासळली
**केना** (ना.)– एक रानभाजी, दुष्काळाच्या दिवसांत गरीब लोक या भाजीच्या जाडजूड भाकरी करून कसातरी

उदरनिर्वाह करतात.
**केन्यांग** (क्रि.वि.)– कुणाकडे
**केरा** (ना.)– केळ, केळी, कचरा
**केराके पाना** (ना.)– केळीची पाने
**केस बिचरय** (क्रि.)– केस विंचरतो, विंचरते
**केसर** – केशर, जाफरा, सामान्यतः काश्मीमध्ये उत्पादन होते.
**केसा** – केश
**कोई** (सर्व.)– कोणी
**कोईबी** – कोणीही, कोणीतरी
**कोईको** (स.)– कोणाचा
**कोकी** (वि.)– कोणाची
**कोको** (वि.)– कोणाचा, कोणाची, कोणाचे
**कोखे** (स.)– कोणाला
**कोणकणांग** (स.)– कोणीकडे
**कोणखे** (स.)– कोणाला
**कोणतो** (वि.)– कोणता
**कोणे** (स.)– कोणी
**कोनकी** (स.)(स्त्री.)– कोणाची
**कोनकेसे** – कोणाकडून
**कोनको** (स.)– कोनाचा
**कोनटा** – कोपरा
**कोनँग** (स.)– कोणीकडे
**कोने** – कोणी
**कोनोळा** (ना.)– कोनाडा, भिंतीत वस्तू ठेवण्याकरिता केलेली गोलाकार किंवा चौकोनी जागा
**कोपरबाही** (ना.)– स्त्रियांच्या बाहुतील एक दागिना, दंडातला चांदीचा एक दागिना
**कोंब** (ना.)– अंकुर, मोड
**कोंबट** (वि.)– कुबट, कुजकट
**कोंबळी** (ना.)(स्त्री.)– कोंबडी, एक पक्षी
**कोंबा** (ना.)– ठोसा, प्रहार
**कोम** (ना.)– अंकुर, कोंब, मोड
**कोमळा** (ना.)(पु.)– कोंबडा
**कोमळी** (ना.)– कोंबडी
**कोमायी** (क्रि.)– कोमेजली, निस्तेज झाली
**कोमायो** (क्रि.)(पु.)– कोमेजला, निस्तेज झाला
**कोमेज्यो** (क्रि.)– कोमजला, निस्तेज झाला
**कोय** (ना.)– कोळ, राख, आंब्याच्या फळातील आठी
**कोरनी** (ना.)– भिंतीतील कपाट
**कोरसा** (ना.)– कोळसा, विझलेला निखारा
**कोलती** (ना.)(स्त्री.)– कोलीत, विस्तव, निखारा
**कोलीत** (ना.)– विस्तव, निखारा

**कोल्हाटीन** (वि.)(स्त्री.)- स्त्रीला उद्देशून शिवी

**कोवरा** (वि.)- कोवळा, फळभाजीचा एक प्रकार

**कोवराके बुल्ल्या** (ना.) शिजवलेले कोहळे आणि गव्हाचे पीठ एकत्र शिजवून त्यात गूळ घालून घोटून त्याचे भज्याच्या आकाराचे गोळे तापलेल्या तेलातून तळणे.

**कोस** (वि.)- दोन मैल, ३.२० किलोमीटर, जागेत लांबी रुंदीच्या बाबतीत न्यूनता

**कोस** (ना.)- कोश, त्वचेवरील कोंडा

**कोसय** (क्रि.)- दोष देतो, बोलतो

**कोसी** (क्रि.)(स्त्री.)- दोष दिला

**कोळ** (ना.)- कोड, एक त्वचारोग

**कोळली** (क्रि.)- कोरडी, सुकी, वाळली

**कोळलो** (क्रि.)- कोरडा वाळला, शुष्क, अनार्द्र, पावसाळा कोरडा गेला.

***

# ख

**खऊट** (ना.)- कवठ, कौठ, एक फळ

**खऊट** (वि.)- खराब, वाईट, नासका

**खकरणे** (क्रि.)- खाकरणे, रागावणे, ओरडणे, संतापणे

**खकरय** (क्रि.) खाकरतो, घशातून चिकट द्रव(कफ) बाहेर काढतो

**खकरी** (क्रि.भू.)- खाकरली

**खकाना** (ना.)- धूळ, कचरा इत्यादींचा ढीग

**खकायी** (क्रि.)- रागावली, ओरडली

**खकायो** (क्रि.)- रागावला, ओरडला

**खकाव** (ना.)- रागाव, संताप, ओरड

**खकावणखे** (क्रि.वि.)- रागवायला, संतापायला

**खकावय** (क्रि.)- रागवतो, संतापतो, जोरात ओरडतो

**खचय** (क्रि.)- खचतो, पहाड खचतो, हिंमत हरतो

**खची** (क्रि.)(स्त्री.)- खचली, हरली

**खच्यो** (क्रि.)(पु.)- खल्या,

खाली आला, ढासळला
**खजाऊ** (क्रि.)– खाजवू
**खजाना** (ना.)– खजिना
**खजायो** (क्रि.)– खाजवला, खुमखुमी दाखविली
**खजावणे** (क्रि.)– खाजविणे, खुमखुमी दाखविणे
**खजावय** (क्रि.)–खाजवितो, खुमखुमी दाखवितो
**खटला** (ना.)– मोठे कुटुंब, बायको, फिर्याद, दावा, भांडण
**खटाई** (ना.)– आंबट, खरडपट्टी
**खट्टी** (वि.)– आंबट, नाराज
**खट्टू** – नाराज
**खट्टो** – आंबट, नाराज
**खंडणे** (क्रि.)– मोडकळीस येणे, तुटण्याच्या बेतात
**खंडय** (क्रि.)– तुटला
**खंडारा** (ना.)– पडके घर, उद्ध्वस्त घर, घरामागील रिक्त जागा
**खंडी** (ना.)– वीस मण, एक माप
**खंद** (क्रि.)– खोद, जमीन खोद
**खदकली** (वि.)– घाणेरडी, मळलेली, माखलेली
**खदकलीमादकली–** मळलीमुळली, खूप घाणेरडी
**खदकलो** – घाणेरडा, मळलेला
**खदखदय** (क्रि.)– खदखदते, शिजते
**खंदय** (क्रि.)– खोदतो
**खदान** (ना.)– खाण
**खदाळ** (वि.)– खादाळ
**खंदाळी** (ना.)– कापूस वेचण्यासाठी पाठीवर केलेली झोळी
**खंदो** (क्रि.)– खोदा, खणा
**खननखे** – खोदायला, खणायला
**खपकन** (क्रि.वि.)– लवकर, वेगाने
**खंबा** (ना.)– खांब, स्तंभ
**खंबा** (वि.)– मजबूत, तो खांबासारखा मजबूत आहे
**खबुतर** (ना.)– कबुतर
**खमक्या** (वि.)– खंबीर, पक्का, मजबूत, पुरून उरणारा
**खरकटी** (वि.)– घाणेरडी
**खरकटो** (ना.)– खरकटे, घाणेरडा, जेवल्यानंतर न धुतलेला हात, पोळी, भाजी, भात इत्यादींचा चाराचुरा
**खरचय** (क्रि.)– खर्च करतो
**खरची** (क्रि.भू.)– खर्च केली
**खरचीक** – महाग
**खरस** (क्रि.)– खर्च कर
**खरसय** – खर्च करतो

**खरसो** (क्रि.)– खर्च करा
**खरसोन** (क्रि.भ.)– खर्च कराल
**खरळ** – निर्भर्त्सना(क्रि.वि.), खरड, खरळ(ना.) बुडातील भाजी खरडून काढणे
**खरा** – खळे(ना.), कणसाची मळणी करण्याचे जागा
**खराब** (वि.)– वाईट, न पाहण्या–ऐकण्याजोगे
**खरूज** (ना.)– खाज, एक आजार
**खरे** (ना.)– खळे, कणसाची मळणी करण्याची जागा
**खरो** (वि.)– खरा
**खरोको खरो**– खऱ्याचे खरे
**खर्चय** (क्रि.)– खर्च करतो
**खर्पूस** (वि.)– खमंग, चांगले भाजलेले
**खलास** (क्रि.)– नष्ट
**खले** – खाली (शब्दयोगी अव्यय)
**खले** (क्रि.वि.) **उतरय** (क्रि.)– खाली उतरतो
**खलेउप्पर** (क्रि.वि.)– खालीवर, उलथापालथ
**खलेकी** (क्रि.वि.)– खालची
**खलेको** (क्रि.वि.)– खालचा
**खलेकोखले**– खालचा खाली
**खले** (क्रि.वि.) गिरजोस(क्रि.)– खाली पडशील
**खलेसे** (क्रि.वि.)– खालून
**खवळय** (क्रि.)– रागावतो
**खसणे** (क्रि.)– खचणे
**खसय** (क्रि.)– खचतो, ढासळतो
**खसय** (क्रि.)– हिंमत हरतो
**खसाखस** (क्रि.वि.)– खचाखच, दाबून
**खस्ता खाय** (क्रि.)– कष्ट करतो, त्रास सहन करतो
**खसी** (क्रि.)(स्त्री.)– खचली
**खसी** (क्रि.)(स्त्री.)– हिंमत हरली
**खसेन** (क्रि.)– हिंमत सोडेल
**खस्यो** (क्रि.)– खचला, हिंमत हरली
**खस्योतो** (क्रि.)– खचला होता, हिंमत हरली होती
**खळक** (ना.)– खडक, जमिनीचा कठीण भाग
**खळकू** (वि.)– किंमत नसलेला (एक पैसा– लक्षणेने–बेकिंमत) कवडी मोलाचा
**खळबळ** (क्रि.वि.)– खडबड
**खळलय** (क्रि.)– खरडतो
**खळला** (वि.)– न पिकणारे शेत
**खळली** (क्रि.)– खरडली
**खळलोन** (क्रि.)– खडसावणे, रागावणे
**खळाजंगी** (क्रि.वि.)– खडाजंगी,

जोराचे भांडण, संघर्ष

**खळी**(ना.)- बारीक दगड

**खळीसाकर**(ना.)- खडीसाखर

**खाक**(ना.)- राख, रक्षा, नष्ट

**खाजो** (क्रि.)- खाशील, भक्षण करशील, गिळंकृत करशील

**खाट** (ना.)- बाज, खाटले

**खाटकी** (वि.)- बाजेची, खाटेवरची

**खाटपर** (ना. शब्दयोगी)- बाजेवर, खाटेवर

**खाटीक** (ना.)- बकरे कापणारा, मांस विकणारा

**खाटने** - बाजेने

**खांडूक** (ना.)- फोड, गळू

**खाणोखुणो** (ना.)- खाणेखुणे, खानपान

**खाती** (ना.)- लोहार

**खातीपिती** (वि.)- वयात आलेली मुलगी

**खातोपितोघर** (वि.ना.)- सधन घर, श्रीमंत घर

**खानकोखदाळ** (वि.)- खाण्यात पटाईत, नुसता खादाळ

**खानोटा** (ना.)- खानदान

**खाय** (क्रि.)- खातो

**खायकुटाय** (वि.)- नुसतीच खादाळ

**खायखायके** (क्रि.वि.)- खाऊन खाऊन

**खायखे** (क्रि.वि.)- खाऊन

**खायगोबरी**- नुसतीच खादाळ, अधाशी

**खायगोबरो**- नुसताच खादाळ, अधाश्या

**खायगोबऱ्या**- खादाळ, खात सुटणारा, अधाशी, एक शिवी

**खायी**(वि.क्रि.)- खाल्ली, भक्षण केली.

**खायोका**(क्रि.)- खाल्ले का?

**खायोतो**(क्रि.)- खाल्ले होते, भक्षण केले होते.

**खावजो** (क्रि.)- खाशील, भक्षण करशील

**खावणसाठी** (क्रि.वि.)- खाण्यासाठी

**खावनखे** (क्रि.वि.)- खायला, भक्षण करायला

**खावबोन** (क्रि.)- खाऊया, खाणार

**खावय** (क्रि.)- खातो, भक्षण करतो

**खावून** (क्रि.वि.)- खाणार, भक्षण करणार(कृदन्त)

**खावटी** (ना.) पोटगी

**खावोन** (क्रि.) खाल, फस्त

कराल

**खासर** (ना.)– खटारा

**खिजय** (क्रि.)– चिडते, चिडतो, बाजू घेतो.

**खिजावणे** (क्रि.)– खिजविणे, चिडविणे

**खिजावय** (क्रि.)– चिडवितो

**खिजावू** (क्रि.वि.)– चिडवू

**खिजी** (क्रि.)– चिडली

**खिदळणे** (क्रि.)– अकारण हसणे, दात काढणे

**खिदळय** (क्रि.)– दात काढतो, अकारण जोरात हसतो

**खिदळ्या** (वि.)– अकारण हसणारा

**खिदळी** (क्रि.)– अकारण हसली

**खिदळोन** (क्रि.)– अकारण हसाल

**खिदळ्यो** (क्रि.)– अनावश्यक अकारण हसला

**खिदीखिदी** (क्रि.वि.)– फिदीफिदी, फिदफिदी हसली

**खिपली** (क्रि.)– खपली, जखमेवरची खपली

**खिरा** (ना.)–खिळा, लोखंडाची खुंटी

**खिरूस** (ना.)– खरवस, नुकत्याच व्यालेल्या गाईच्या किंवा म्हशीच्या दुधाचा पदार्थ

**खिसळी** (ना.)– खिचळी, डाळ व तांदूळ मिसळून शिजविणे, जेवणातील एक पदार्थ

**खुटन** (ना.)– नैवेद्य, पूजा

**खुटनो** (क्रि.)– कुळदैवताच्या पूजेप्रसंगी त्यांच्या नावे अग्नीत पदार्थ अर्पण करणे

**खुटी** (ना.)– खुंटी, खुंटली, झाडाची वाढ खुंटली

**खुटीपर** (ना.) खंटीवर

**खुणावय** (क्रि.)– निशाणी करतो, निशाणी करते

**खुपय** (क्रि.)– दुखते, वेदना होते, सलतो

**खुपी** (क्रि.)– दुखली, वेदना झाली, सलली

**खुरपने** (क्रि.)– निंदणे, गवत निंदणे

**खुरपय** (क्रि.)– निंदतो, निंदते

**खुरपा** (ना.)– लहान विळा, कोयता

**खुल्लमखुल्लो** (वि.)– मोकळाढाकळा, मनमोकळा, स्पष्ट, उघडे

**खुला** (ना.)– कैरीच्या वाळलेल्या फोडी

**खुल्यो** (क्रि.)– खुलला, फुलला,

शोभून दिसला, मोकळा झाला
**खुल्लो** (वि.)– मोकळा, उघडा, बंधनरहित.
**खुळय** (क्रि.)– खुडतो, तोडतो, तुकडे करतो
**खेटरा** (ना.)– जोडा, वहाणा, पादत्राणे
**खेत** (ना)– शेत, जमीन, पीक काढण्याची जमीन
**खेतने–** शेतात
**खेतनेको** (ना.) – शेतातला
**खेतनेसे** – शेतातून
**खेतलग** – शेतापर्यंत
**खेती** (ना.)– शेती, जमीन, पीक काढण्याची जमीन
**खेतीबाळी** (ना.)– शेतीवाडी, शेती व तत्सम वैभव
**खेल** (ना)– खेळ, क्रीडा, तमाशा
**खेलनेखे** (क्रि.वि.)– खेळायला
**खेलने** (क्रि.)– खेळणे, क्रीडा करणे
**खेलनेसे** – खेळल्याने
**खेळबोन** (क्रि.)– खेळूया, खेळणार
**खेलय** (क्रि.)– खेळतो, क्रीडा करतो
**खेली** (ना.)– खेळी
**खेलो** (क्रि.)– खेळा
**खेल्यो** (क्रि.)– खेळला
**खेळगा** (वि.)– म्हातारा, वृद्ध, अर्वाच्य शब्द
**खेळगी** (वि.)– म्हातारी स्त्री, अर्वाच्य शब्द
**खेळमा** (ना.)– खेडे, लहान गाव
**खेळा** (ना.)– खेडे, गाव, कमी लोकसंख्येचे ठिकाण
**खेळा** (ना.)– मूळ गाव, जेथून कलालांच्या विशिष्ट कुळाची/ गोत्राची उत्पत्ती झाली ते गाव
**खेळा** (ना.)– कलालांमध्ये भाटाजवळ गोत्र (गोत्र) सांगताना वापरला जाणारा शब्द
**खैर** (क्रि.)– चांगले, संकटातून वाचणे
**खैर** (ना.)– घरातील कोणाचे निधन झाले तर डोक्याचे केस देणे
**खोई** (क्रि.)– गमावली, हरवली, नाहिशी झाली.
**खोकलनखे** (क्रि.वि.)– खोकलायला
**खोकलय** (क्रि.)– खोकलतो
**खोकली** (क्रि.)– खोकलली
**खोट** (क्रि.)– कमी, दोष
**खोटाळ्या** (वि.)– खोटे बोलणारा
**खोटो** (ना.)– खोटा, खोटे

बोलणारा
**खोपळी** (ना.)– खोपडी, झोपडी
**खोपा** (ना.)– पक्ष्याचे घरटे
**खोय** – खोळ, आवरण, आच्छादन, गादीची खोळ
**खोयमोळी** (क्रि.वि.)–फजिती, सवय मोडणे
**खोरने** (क्रि.) – खरडणे
**खोरा** (ना.)– खोरे, नदीचे खोरे
**खोस** (ना)– खोव, कमरेला पिशवी खोवणे
**खोळ** (ना.)– वाईट सवय, दोष, खोड
**खोळा**–खोडा, अडथळा
**खोळय**(क्रि.)– खोडतो, पुसतो, नष्ट करतो
**खोळी** (क्रि.वि.)– खोडी, पुसून काढली, नाहीशी केली
**खोळ्यो** (क्रि.वि.)– खोडला, पुसला

***

# ग

**गंगार** (ना.)– गंगाळ, घंगाळ
**गंगोरीगाय** (ना.)– अळीसारखा एक कृमी, गोगलगाय
**गचकय** – मरतो, नष्ट होतो
**गचका** (ना.क्रि.वि.)– झटका, रस्ता, खराब असला की वाहनाला झटके बसतात
**गचकी** (क्रि.)– मेली, अंत झाला
**गचक्यो** (क्रि.)–निवर्तला, मेला
**गचागच** (क्रि. वि.)– खप, पटापट खाणे, पटापट घास गिळणे
**गच्च** (वि.)– दाट, विपुल, काठोकाठ
**गच्याटी** (क्रि.वि.)– गचांडी, हातात मान धरून खाली पाडणे
**गच्चू** (क्रि.वि.)– काढून टाकणे
**गंज** (ना.)– जंग
**गजकरण** (ना.)– गजकर्ण, एक त्वचारोग
**गजगज** (वि.)– खूप गर्दी, दाटी
**गंजुला** (ना.)– लहान, ढीग, रास, गंज
**गटायो** (क्रि.)– गिळले, गटविले आपलेसे केले, फसविले
**गटाव** (क्रि.)– गटव, हस्तगत

कर, आपलेसे कर
**गठोळा** (ना.)- गाठोडे, बोचके
**गंडलय** (क्रि.)- लवंडतो, इकडे तिकडे पडतो
**गड्डा** (ना.)- खड्डा, खोलगट भाग
**गड्डाने** - खड्ड्यात
**गंडिया** (वि.)- गांडू, निरुपयोगी, भित्रा, ढिला
**गंढार** (ना.)- ग्रामीण भागातील एक लोककला, पुरुषांनी स्त्रियांच्या भूमिकांसह रंजनाचा कार्यक्रम करणे, लळित, गंडार
**गंढाऱ्या** (ना.)- नाचगाण्याचे रंजनपर कार्यक्रम करणारा
**गढूर** (वि.)- गढूळ, ओंगळ, मातट, कलुषित
**गदा** (ना.)- गाढव, गर्दभ, ओझी वाहणारा एक प्राणी
**गदाभुकी** (वि.स्त्री.)- अक्कलशून्य, एक शिवी
**गधळा** (वि.)- गाढव, गर्दभ, मूर्ख, अक्कलशून्य
**गधा** (ना./वि.)- गाढव, मूर्ख, एक शिवी
**गधापरको** (ना./वि.)- गाढवावरचा, गाढवाच्या पाठीवरील, एक मूर्ख
**गधी** (ना./वि.)- गाढवी, गर्दभी, एक शिवी
**गंध्यानमाशी** (ना.)- गांधिल माशी, ही माशी चावल्या जागी गाठ येते.
**गनगोत** (ना.)- सोयरे, सोयरेधायरे, नातेवाईक, आप्त
**गबरू** (वि.)- चैनी माणूस, खुशालचंद
**गब्बर** (वि.)- श्रीमंत
**गबाळो** (वि.)- गबाळ्या, अव्यवस्थित, अस्वच्छ राहणारा
**गब्बू** (वि.)- लठ्ठ, गिड्डा, जाडजूडपण, ठेंगू
**गमय** (क्रि.)- गमते, करमते, रंजन होते, मनाला प्रसन्न वाटते.
**गमायो** (क्रि.)- गमावले, हरविले, घालविले
**गमायी** (क्रि.)- हरविली, हरली, फुकट घालविली
**गमायीती** (क्रि.)- गमावली होती, हरविली होती.
**गमायो** (क्रि.)- गमावला, हरविला, फुकट घालविला
**गमायोतो** (क्रि.)- गमावला होता, हरविला होता
**गमावनखे** (क्रि.)- गमवायला, हरवायला
**गमावय** (क्रि.)- गमावतो,

घालवितो, हरवितो
**गमी** (क्रि.)- हरवली, रमली, दिसेनाशी झाली
**गयना** (ना.)- दागिने, अलंकार
**गयबान्या** (वि.)- बावळट, मूर्ख, अशोभनीय
**गयलोगुंगलो** (वि.)- थकलेला, वृद्ध, गळलेला
**गयाठा** (ना.)- अनावश्यक वस्तू, अस्ताव्यस्त सामान, पसारा
**गयरा, गयरो** (वि.)- खोल, अथांग, गहिरा
**गयाठी** (क्रि.)- गळाठली, थकली, दमली, मागे पडली
**गयाठ्यो** (क्रि.)- गळाठला, थकला, दमला, मागे पडला.
**गयी** (क्रि.)- गेली, निघून गेली, नाहीशी झाली
**गयीती** (क्रि.)- गेली होती
**गयीन** (क्रि.)- गेलेत, नाहीसे झालेत, वारलेत
**गयो** (क्रि.)-गेला, नाहीसा झाला, अंत झाला
**गयोतो** (क्रि.)- गेला होता
**गर** (ना.)- गळ, मासे पकडण्याचे यंत्र, विहिरीत पडलेले भांडे काढण्याचे यंत्र
**गरगरय** (क्रि.वि.)- गोलाकार (फिरतो), भोवंड(येते)
**गरजय** (क्रि.)- मोठ्याने आवाज करतो, ओरडतो, गरजतो, आभाळ गरजते.
**गरजावोन** (क्रि.)- गरजाल, जोरात, ओरडाल
**गरजो** (क्रि.)- गरजा, ओरडा, जोरात आवाज काढा
**गरत** (क्रि.)- गळतात
**गरती** (क्रि. वि.)- गळती, पिवळ्या पानांची गळती सुरू झाली, ठिबकणी, डोळ्यात सारखे पाणी येणे, अभिषेक करण्याचे भांडे  (नाम)
**गरदी** (ना.)- गर्दी, दाटी, आरडाओरडा, अतिरेक
**गरय** (क्रि.)- गळते, सांडते, पाझरते, सांडते
**गरय** (क्रि.)- गळतो, पाझरतो
**गरसोई** (ना.)- गळसरी, स्त्रियांच्या गळ्यातील काळ्या मण्यांची माळ, स्त्रियांचे सौभाग्याचे लेणे.
**गरसोली** (ना.)- कठीण गळू, गलांड, मोठा फोड, बेंड
**गरा** (ना.)- गळा, कंठ, आवाज, स्वर
**गरा कापय** (क्रि.)- गळा कापतो,

विश्वासघात करतो, दगाबाजी करतो

**गराको** (ना.)– गळ्याचा, गळ्यातला, गळ्यातला दागिना, खूप जवळचा

**गराने अटक्यो** (क्रि.)– गळ्यात अडकला, घास गळ्यात अडकला

**गराबंद** (ना.)– गळाबंद, स्त्रियांच्या गळ्यातील एक मौल्यवान दागिना

**गरामपंचायत** (ना.)– ग्रामपंचायत, गावाची व्यवस्था पाहणारी सार्वजनिक सभा

**गरालग**– गळ्यापर्यंत

**गरासे** (ना.)– गळ्याने, गोड गळ्याने गातो

**गरी** (क्रि.)– गळली, पडली

**गरीन** (क्रि.)– गळलीत, पाने गळलीत, पडलीत

**गरीनतीन** (क्रि.)– गळले होते, पडले होते.

**गरीबगुर्दा** (ना.)– गरीब लोक, तळागाळातील लोक, दैन्यग्रस्त लोक, आम गरीब जनता

**गरेके** – गळ्याला

**गरेन** (क्रि.भ.)– गळणार, ठिबकणार, खाली सांडणार

**गरोन** (क्रि.)– गळाल, थकाल, अगतिक व्हाल

**गऱ्यो** (क्रि.)– गळला होता, पडला, थकला

**गऱ्योतो** (क्रि.)– गळला होता, पडला होता, थकला होता

**गलगला** (क्रि.वि.)– आरडाओरड, गोंधळ, गलबला, गलबलाट, कलकलाट

**गलतान** (क्रि.वि.)– थकलेला, रया गेलेला, लेचापेचा, कुचकामी

**गल्ला** (ना.)– ढीग, रास, संग्रह, पैश्यांचा ढीग

**गलोता** (ना.)– लहान बाळाच्या अंगातील वस्त्र

**गलंडय** (क्रि.)– कलंडतो, लवंडतो, इकडेतिकडे पडतो, कोलमडतो

**गवना** (ना.)– पूर्वी बालवयात विवाह होत होते. मुलीला ऋतुस्नान प्राप्त होईपर्यंत ती माहेरी राहत असे. ऋतुस्नान प्राप्त झाल्यानंतर रक्षाबंधनाच्या दिवशी समारंभ आयोजित करून तिला नवीन वस्त्र, दागिने अर्पण करून आनंदाने सासरी पाठवत असत. या सर्व विधीला 'गवना'

म्हणत.

**गवरी, गौरी** (ना.)– पाळीव प्राण्यांच्या विष्ठेपासून तयार केलेले जळण

**गवारी** (ना.)– गोवारी, एक आदिवासी जमात

**गह्याट्यो** (क्रि.)(पु.)– दमला, थकला, मागे पडला

**गह्याठी** (क्रि.)(स्त्री.)– ढासळली, दमली मागे पडली, प्रकृती ढासळली

**गळ** (क्रि.)– रूत

**गळगळय** (क्रि.)– गडगडतो, आभाळ गडगडते

**गळगा** (ना.)– गाडगे, एक मातीचे भांडे, मडक्यापेक्षा आकाराने लहान असलेले मातीचे भांडे

**गळचपी** (क्रि.वि.)– कोंडमारा, अगतिकता

**गळचप्पी** (क्रि.वि.)– मान पकडून जोरात लोटणे, गळा धरून पाडणे

**गळबळ्या** (वि.)– गडबड करणारा, घाई करणारा, धांदरट

**गळ्या** (क्रि.)–रुतते, बोचते

**गळसयी** (ना.)– स्त्रियांच्या गळ्यातील दागिना, स्त्रियांचे सौभाग्याचे लेणे

**गळी** (ना.)– मित्र, गडी, सवंगडी, सोबती, गढी, लहान भुईकोट किल्ला

**गळीगळी** (ना.)– मित्रमित्र

**गळीन** (क्रि.)– गळली, गळलीत

**गळीन** (ना.)– मैत्रीण

**गळू** (ना.)– गडवा, पाणी ठेवण्याचे एक भांडे, तांब्या

**गळूभर**– गडवाभर, तांब्याभर

**गळ्यागळ्या** – दाट मैत्री

**गळ्यो** (क्रि.)– रुतला, गळला, गाडला गेला

**गांगोरीगाय** (ना.)– गोगलगाय, एक अळीसारखा किडा

**गांजरा** (ना.)– गाजर, जमिनीत वाढणारे एक फळ

**गाजाबाजा –** गाजावाजा

**गाठा**– टरफलासहित ओल्या हरभऱ्याचा दाणा

**गाठी**– माळ, पोत

**गांडक्या** (वि.)– गांडू, कुचकामी माणूस

**गांड** (ना.)– गुदद्वार

**गांडभर** (वि.)– अति, खूप

**गांडू** – कुचकामी माणूस

**गाभन, गामन** – गरोदर, गर्भवती, गर्भार

**गायसंग वासरू**(ना.)– दुसऱ्यांदा

लग्न करताना पहिल्या नवऱ्यापासून झालेले मूल सोबत घेऊन येणारी स्त्री

**गायी** (क्रि.)- गायिली, गाणी गायिली

**गायो** (क्रि.)- गायिले

**गार** (वि.क्रि.)- थंड बर्फाचा तुकडा, गारगोटी, मैला, काळेबेरे, गाळ, चाळणीने गाळ

**गारय** (क्रि.)- गाळतो, भरतो

**गारा** (ना.क्रि.वि.)- चिखल, भिजवलेली माती, माती, पाणी एकत्र होणे, पार थकलेला, गलथान

**गारी** (क्रि.वि.)- गाळली, तुरडाळ गाळली, शिवी

**गारी** (क्रि.)- शिवी

**गाऱ्यो** (क्रि.)- गाळला, भरला

**गालगुलच्या** (ना.)- गालगुच्चा, हळूच गाल धरून ओढणे, बाळाचा लाड करताना गालाला हळूच चिमटा घेणे

**गालफुगी** (ना.)- गालगुंड, एक आजार, रागावलेली

**गालीगलोच** (नामसाधित क्रि. वि.) शिवीगाळ

**गाव** (ना.)- खेडे

**गावकी** (ना.)- गावाची

**गावगाय** (वि.)- भटकभवानी, भटकणारी स्त्री

**गावगाळा** (ना.)- गावगाडा, गावाची लहान-मोठी सर्व तऱ्हेची कामे

**गावणे** (क्रि.)- सापडणे, आढळणे, गाणे, गाणी गाणे

**गावणे** (क्रि.)- गाणे

**गावबोन** (क्रि.)- गाऊया, गाणार

**गावभर** - सर्व गावात, पूर्ण गावात

**गावय** (क्रि.)- गातो, गाते

**गावरान** (वि.)- गावाला लागून असलेली जमीन, देशी

**गावरानी** (वि.)- रायवळ, निकृष्ट, रायवळ आंबा

**गावो** (क्रि.)- गा, गाणी गा

**गावोना** (क्रि.)- गा, गाना

**गिदाळ** (ग.)- गृध्र, गिधाड पक्षी, एक मांसाहारी पक्षी

**गिदाळी** (वि.)- घाणेरडी, अस्वच्छ

**गिदाळो** (क्रि.)- घाणेरडा, अस्वच्छ

**गिर** (क्रि.)- पड, खाली पड,नीज

**गिनती** (क्रि.वि.)- मोजदाद

**गिरजो, गिरजोस** - पडशील, निराधार होऊन खाली येशील, कमी होशील.

**गिरनखे** (क्रि. वि.)– पडायला, खाली यायला

**गिरय** (क्रि.)– पडतो, खाली येतो, आधार तुटतो, किंमत कमी होते

**गिरागिरी** (क्रि. वि./ना.)– पडापडी, आपटाआपटी

**गिरायी** (क्रि.)– पाडली, आपटली, खाली आणली, कमी केली

**गिरायो** (क्रि.)– पाडले, खाली आणले

**गिरावय** (क्रि.)– पाडतो, खाली आणतो, निराधार करतो

**गिरावो** (क्रि.)– पाडा, खाली पाडा

**गिरी** (क्रि.)– पडली, पराभूत झाली

**गिरू** (क्रि.)– पडू, खाली येऊ, पराभूत होऊ

**गिरोन** (क्रि.)– पडाल, खाली याल

**गिऱ्यो** (क्रि.)– पडला, खाली आला, मागे आला

**गिऱ्योती** (क्रि.)– पडला होतो, मागे आला होता

**गिऱ्हान** (क्रि.वि.)– उतरती कळा, अवनत दशा, मागे येणे, प्रगती खुंटणे, ग्रहण, चंद्र किंवा चंद्र यांच्यामध्ये अन्य ग्रहण येणे

**गिलावा** (ना.)– लिंपण

**गुचका** (ना.)– गुच्छ, घोस, झुबका

**गुंजा** (ना.)– करंजी, तेलात तळलेला एक गोड पदार्थ

**गुठलई गुठली** (ना.)– आंब्याची कोय, आंब्याचे बी, आंब्याच्या फळातील बाठी, आठोळी

**गुंडाऊ** (क्रि.वि.)– गुंडाळून ठेवतो.

**गुंडाऊ** (ना.)– दोऱ्याची गुंडी, पराभूत करतो

**गुंडायी** (क्रि.)– गुंडाळली, पराभूत केली

**गुंडाव** (क्रि.)– गुंडाळ, आटोप, पूर्ण कर, पराभूत कर

**गुंडावय** (क्रि.)– गुंडाळतो

**गुंडावू** (ना.)– गुंडाळी

**गुंडी** (ना.)– बटण

**गुतय** (क्रि.)– गुंततो, अडकून पडतो, कामात व्यग्र होतो

**गुती** (क्रि.)– गुंतली, अडकून पडली

**गुत्यो** (क्रि.)– गुंतला, व्यग्र झाला

**गुथ** (ना.)– गुंत

**गुथणे** – गुंतणे

**गुथी** (क्रि.वि.)– गुंतली, गुंतून

पडली, अडकली

**गुथ्यो** (क्रि.)– गुंतला, अडकून पडला

**गुदमरय** (क्रि.)– गुदमरतो, दम कोंडतो, श्वासावरोध होतो.

**गुदस्ता** (क्रि.वि.)– मागच्या वर्षी, गेलेल्या वर्षात

**गुदुकल्या** (ना.)– गुद्‌गुल्या

**गुद्दा** (ना.)– बुक्की, ठोसा

**गुफा** (ना.)– गुंफा, गुहा, डोंगर/ पहाड कोरून राहण्यायोग्य केलेली जागा

**गुमसूम** (क्रि.वि.)– निःशब्द

**गुमान** (वि.)– गर्व, अभिमान

**गुयनी** (ना.)– गुळणी

**गुयला** (ना.)– चूळ, गुळणा

**गुरगुरय** (क्रि.)– गुरगुरतो

**गुरमी** (क्रि.वि.)– गुर्मी, मस्ती, गर्व, अहंकार

**गुर्रावय** (क्रि.)– गुरगुरतो, रागाने पण कमी आवाजात ओरडतो, रागाने कर्कश आवाज काढतो

**गुराळ** (ना.)– गुऱ्हाळ, उसापासून गूळ तयार करण्याचा कारखाना

**गुल** (ना.)– दिव्याची काजळी, चिलमीतील तंबाखूची राख

**गुलसे** (ना.)– गुलाने, चिलमीतील तंबाखूच्या गुलाने

**गुल्लर, गुल्लेर** (ना.)– गोफण, गलोल, गलोली

**गुळचट** (वि.)– गोड, गोडसर, लळा निर्माण करणारा

**गुळला** (ना.)– चूळ, गुळणी

**गुळुगुळु** (क्रि.वि.)– प्रेमाणे बोलणे, गोड गोड बोलणे

**गूर** (ना.)– गूळ, आटवलेला उसाचा रस

**गेचोळी** (ना.)– गोचडी, गोचीड

**गेंदा** (ना.)– तुरा, झुबका, गुच्छ

**गेलचोदी** (वि.)– निर्बुद्ध असलेली, एक शिवी

**गेलचोद्या** (वि.)– निर्बुद्ध असलेला, एक शिवी

**गोंजारय** (क्रि.)– मायेने अंगावरून हात फिरवितो

**गोंजारी** (क्रि.)– मायेने अंगावरून हात फिरविला

**गोटा** (ना.)– दगड

**गोंदया** (क्रि.)– गोंदतो

**गोदरी** (ना.)– ग्रामीण परिसरातील मलविसर्जनाची जागा

**गोद्री** (ना.)– हगणदारी, गावाबाहेर शौच्याची जागा

**गोधळी** (ना.)– गोधडी, वाकळ

**गोना** (ना.)– पोते, थैला

**गोबर** (ना.)– शेण, गाय, म्हैस

इत्यादी प्राण्यांची विष्ठा, अक्कलशून्य(वि.)

**गोबी** (ना.)- कोबी, एक फळभाजी

**गोमतीर** (ना.)- गोमूत्र

**गोमतेर** (ना.)- गोमूत्र, गाईचे मूत्र

**गोरा** (ना.)- गाईचे वासरू, गोऱ्हा

**गोरीपान** (वि.)- खूप गोरी

**गोरीपान्सी** (वि.)- किंचित गोरी

**गोरीभरार** (वि.)- अति गोरी, गोरीपान

**गोरो** (वि.)- गोरा, गौर वर्णाचा

**गोलगुटूक** (वि.)- गोल गोल, अगदी गोल

**गोलगोटा** (वि.)- लबाड, वाटोळा दगड

**गोवय** (क्रि.)- फसवितो, दगाबाजी करतो, गुंतवितो

**गोसाई** (ना./वि.)- गोसावी, विरक्त, निरपेक्ष वृत्तीचा, एक सन्मानीय पदवी

**गोळ** (वि.)- गोड, मधुर

**गोळगरा** (वि.ना.)- गोड आवाज, गोड गळा

**गौना** (ना.)- मधुचंद्र

***

# घ

**घट** (वि.नाम.) कमी, पात्र, भांडे, नवरात्रात घट मांडून दुर्गा देवीची पूजा करण्याचा पारंपरिक प्रकार

**घटय** (क्रि.)- कमी होते, कमी होतो

**घटी** (क्रि.)- कमी झाली, घटली

**घड्याय** (ना.)- घड्याळ, रात्रंदिवस वेळ समजणारे एक यंत्र

**घनगळी** (वि.)- गोलाकार, लोखंडी रिंग

**घनघन** (क्रि.वि.)- कुरकूर, कुरबूर, तक्रारीच्या सुरात बालणे

**घनाना** (ना.)- अस्ताव्यस्त पसारा, पाहिल्यावर उबग आणणाऱ्या वस्तू

**घनानी** (वि.)- नेहमी अकारण रागावून बोलणारी, कामाचा उरक नसलेली स्त्री.

**घनान्या** (वि.)- नेहमी अकारण रागावून बोलणारा, कामाचा उरक नसलेला आळशी माणूस

**घबराई** (क्रि.)- घाबरली, भीती वाटली

**घबरावय** (क्रि.)- घाबरतो, भितो, भयभीत होतो

**घबराई** (क्रि.)- घाबरली, भयभीत झाली, भ्याली

**घबरायो** (क्रि.)- घाबरला, भ्याला, भयभीत झाला.

**घबरावय** (क्रि.)- घाबरतो, भितो, भयभीत होतो

**घबरी** (क्रि.)- घाबरली, भ्याली, भयभीत झाली

**घंबिला**- घमेले, लोखंडी पाटी

**घम** (वि.)- एकदम शांत, निःशब्द, अबोल, स्तब्ध, कसलीही हालचाल न करणारा

**घमेला** (ना.)- घमेले, लोखंडी पाटी

**घमोरी** (ना.)- घामाने अंगावर येणारे पुरळ

**घम्म** (वि.)- एकदम शांत, हेतुपुरस्सर शांत

**घरकी** (वि.)- बायको, पत्नी, गृहिणी, घरातील, आपल्यातली, जवळची

**घरके** - घरातले, आपले, निकटवर्तीय, कुटुंबातले

**घरको**- घरातला, आपला, कुटुंबातला

**घरकोंबळा**- नेहमी घरात राहणारा, घरकोंबडा

**घरकोभेदी, घरभेदी** (वि.)- घरातली माहिती दुसऱ्याला सांगणारा, दगाबाज, बदमाश, विश्वासघातकी, फितूर, गोपनीय गोष्ट बाहेर सांगणारा, घरात भांडणे लावणारा

**घरकोल्ह्या** (वि.)- नुसता घरात बसणारा, नुसता घरात बसून खाणारा

**घरकोल्ही** (वि.)- नुसती घरात राहणारी, नुसती घरात बसून खाणारी, राहणारी

**घरकोंड्या** (वि.)- नुसता घरात राहणारा, कामचुकार

**घर गरय** (क्रि.)- घर गळते, पाझरते

**घरडुहारी** (वि.)- घर लुटणारी, घराचा सत्यानाश करणारी, घरातल्या वस्तू लंपास करणारी

**घरधस** (क्रि.)- घरात बळजबरीने प्रवेश कर

**घरधसी** (वि.)- घरात जबरदस्तीने प्रवेश केला, दुसऱ्याच्या घरात निर्लज्जपणे जाऊन राहणारी

**घरधसीन** (क्रि.)- घरात जबरदस्तीने प्रवेश केला (अ.व.)

**घरधस्यो** (क्रि.)- घरात बळजबरीने प्रवेशला

**घरने–** घरात, घराच्या आत
**घरनेकी** (ना.वि.)– घरातली, आपल्यातली, अति जवळची, आपली
**घरनेको** (ना.वि.)– घरातला, आपल्याला, अति जवळचा
**घरफेरनो** (ना.)– कवेलुचे घर, पावसाळ्यात गळायला नको म्हणून आधीच दुरूस्त करणे.
**घरफोळी** (वि.)– घर फोडणारी स्त्री, एका घराची दोन घरे करणारी स्त्री, कौटुंबिक दुरावा निर्माण करणारी
**घरफोळ्या** (वि.)– घर फोडणारा, चोर, दरोडेखोर, एका घराची दोन घरे करणारा, दगाबाज
**घरभेदी** (वि.)– घरातली महत्त्वाची गुप्त माहिती दुसऱ्यास सांगणारा, दगाबाज
**घरबठ्या** (वि.)– नुसता घरात बसणारा, आळशी, कामचुकार
**घरबठे** (वि.)– घरबसल्या, घरात बसले
**घरभेद्या** (वि.) घरातली माहिती दुसऱ्याला सांगणारा, घर फोडणारा
**घरसे–** घरातून, घरापासून
**घर सोळ** (क्रि.)– घरसोड, निघून जा, दूर जा
**घरोबा** (ना.)– जवळीक, आपुलकी, सान्निध्य, आपलेपणा
**घसरणे–** निसरड्या जागेवरून खाली येणे, पडणे, तोल जाणे
**घसरणे–** चळणे, चुकीचे वागणे, असभ्य कृत्य करणे
**घसरय** (क्रि.)– घसरतो, घसरते, चळतो, चुकतो
**घसरा** (ना.)– लागणे, किंचित जखम होणे, ओरखडा, त्रास, नुकसान
**घसरी** (क्रि.)– घसरली, चळली, मूळ वैचारिकता सोडली, निसरड्या वाटेवर घसरली, वाम मार्गाला लागली
**घसरोन** (क्रि.)– घसराल, निसरड्या वाटेवर घसराल, वाम मार्गाला लागाल, वाईट गोष्टी कराल
**घसऱ्यो** (क्रि.)– घसरला, पाय घसरला, वाम मार्गाला लागला, चळला, कुकर्माला लागला
**घसोटा** (वि.)– चांगले, संबंध, जवळचे संबंध
**घळय** (क्रि.)– घडतो, आकार घेतो, नावारूपाला येतो, प्रगती

करतो

**घळी** (क्रि.)- घडली, व्यवस्थितपणा, वेळ, आकाराला आली

**घाट** (ना./क्रि.वि.)- चर्चा, विचारविनिमय, चमच फिरव

**घाटा** (क्रि.वि.)- नुकसान, ज्वारी पिठात पाणी टाकून शिजविल्यावर तयार झालेला पदार्थ

**घाम नही फुटय**(वि.)- मख्ख, सुस्त, दया, करुणा काहीही नसलेला, कठोर, काहीही परिणाम न होणारा.

**घामाझोक्कर** (क्रि.वि.)- घामाघूम, घामाने चिंब

**घीव** (ना.)- तूप, लोणी तापल्यानंतर त्याचे रूपांतर

**घुगरी** (ना.)- सळ, भिजविलेली कडधान्ये शिजवून केलेला तिखट मिठाचा स्वादिष्ट पदार्थ

**घुंगुळला** (क्रि.)- भ्रमर, भृंग, भुंग

**घुट** (ना.)- घोट, चूळ, पाण्याचा घोट घेणे.

**घुटमरणे** (क्रि.), घुटमळणे, अडखळणे, रेंगाळणे

**घुटमरय** (क्रि.)- घुटमळतो

**घुटमऱ्यो** (क्रि.)- घुटमळला

**घुटय** (क्रि.)- कोंडतो, गुदमरतो

**घुट्टा** (वि.)- ठेंगू, कमी उंचीचा

**घुट्टी** (वि.)- ठेंगणी, खुजी, कमी उंचीची

**घुट्ट** (वि.)- ठेंगणा, कमी उंचीचा, ठेंगू, खुजा

**घुरघुर** (क्रि.वि.)- गुरगुर, गुरगुर करीत अंगावर येणे

**घुरट** (वि.)- कुजट वासाचा, उग्रट

**घुरणे** (क्रि.)- रागाने पाहणे, रागावणे

**घरुटला** (वि.)- अत्यंत रागीट, क्रोधिष्ट

**घुरटलो** (वि.)- कुजट वास असलेल, उग्र वास असलेला

**घुरटलो** (वि.)- अत्यंत रागीट

**घुर्रावणे** (क्रि.)- गुरकावणे

**घुर्रावय** (क्रि.)- गुरकावतो

**घोंगळा** (ना.)- घोंगडे, कांबळे

**घोंगळी** (ना.)- लहान घोंगडे

**घोंगाणा** (ना.)- गर्दी

**घोंगाणा** (ना.)- किड्यांचा कर्कश आवाज

**घोटय** (क्रि.)- घोटतो, लुबाडतो

**घोटय** (क्रि.)- मळतो, ढवळतो

**घोटी** (क्रि.)- फिरवली, वरणात पळी फिरवली

**घोटी** (वि.)- स्वार्थी

**घोटी** (ना.क्रि.)- लहान आंबा, फिरविला, भाजीत चमचा फिरविला

**घोटू** (वि.क्रि.)- स्वार्थी, घोटतो, वरणात चमचा फिरवितो.

**घोट्या** (वि.)- स्वार्थी, लुबाडणारा

**घोय** (ना.)- घोळ, लुगड्याचा, साडीचा किंवा धोतराचा घोळ

**घोयका** (ना.)- दाटी, गर्दी, समुदाय

**घोयखोस** (वि.)- घोळ खोच

**घोयखोसी** (वि.)- भांडण, शारीरिक पातळीवरील संघर्ष, हाणामारी

**घोयना** (ना.)- घोळ, लुगड्याचा घोळ

**घोयना** (वि.)-घोळणा, विविध कच्चा भाजीपाला खाण्यासाठी एकत्र करणे, सलाद, कोशिंबीर

**घोयसय** (क्रि.)- कुस्तीत जिरवितो, खोडकी मोडतो, घोळसतो

**घोयसी** (क्रि.)- घोळसली, लोळवली

**घोयसो** (क्रि.)- कुचला, लोळवा

**घोयस्यो** (क्रि.)- घोळसला, लोळविला, कुचलला

**घोर** (क्रि.वि.)- घोळ, गोंधळ, घोटाळा, गडबड, घोर

**घोरत** (क्रि.)- घोरतात, झोपेत घर्ऽ घर्र असा आवाज करतात

**घोरय** (क्रि.)- घोरतो, घोरते, झोपेत घर्ऽघर्र आवाज करतो

**घोरी** (क्रि.)- घोरली, झोपेत घर्ऽ घर्र अवाज केला

**घोळा** (ना.वि.)- घोडा, ज्यावर बसता येते असा चतुष्पाद प्राणी, वयाने वाढलेला असा अविवाहित मुलगा

**घोळी** (ना.वि.)- घोडी, बसता येते अशी चतुष्पाद(मादी) प्राणी, वयाने वाढलेली अविवाहित मुलगी

**घोळोशी** (ना.)- घडवंची, लाकडी तीन किंवा चार पायी स्टूल

***

# च

**चईत** (ना.)– चैत्र, हिंदू वर्षाचा पहिला महिना

**चऊतकोर** (वि.)– एक कोर, भाकरीचा एक चतुर्थांश भाग

**चकणा** (वि.)– तिरळा, काना

**चकनाचूर** (क्रि.वि.)– नष्ट, नायनाट, बारीक बारीक तुकडे, उद्ध्वस्त, नष्ट

**चकने** (वि.)– तिरळे, तिरळ्या डोळ्यांचे, भूल पडणे, दिशाभूल होणे

**चकमक** (क्रि.वि.)– चमकदार, नीटनेटका, डोळ्यांत भरण्यासारखा, भांडण, बोलाचाल, संघर्ष

**चकय** (क्रि.)– दिशाभूल होतो, भूल पडते, फसतो

**चकरायो** (क्रि.)– चकित झाला, स्तंभित झाला

**चकली** (क्रि.)– फसली, चकित झाली, तळलेला चक्राकार खाद्यपदार्थ

**चकवा** (ना./क्रि.) भूल, भुताने भुलविणे

**चकरायो** – आश्चर्यचकित झाला, स्तंभित झाला.

**चकरायी** (क्रि.)– आश्चर्यचकित झाली, स्तंभित झाली

**चकावनखे** (क्रि.वि.)– चकवायला, भुलवायला

**चकावने** (क्रि.)– चकविणे

**चकावय** (क्रि.)– चकवितो, भुलवितो

**चकायी** (क्रि.)– फसली, भुलली, दिशाभूल झाली

**चकी** (क्रि.)– फसली, भुलली

**चक्यो** (क्रि.)– दिशाभूल झाला, भुलला, फसला

**चखना** (ना.)– भाजी, शाक, भोजनाच्या ताटातील एक महत्त्वाचा खाद्यपदार्थ

**चघळणे** (क्रि.)– तोंडात घोळणे, चोखणे

**चघळय** (क्रि.)– चघळतो, तोंडात घोळतो, चोखतो

**चंचई** (ना.)– चंची, सुपारी, कात, लवंग, चुन्याची डबी, तंबाखू इत्यादी साहित्य ठेवायची कप्प्यांची लहान पिशवी

**चठ्ठा** – वण, डाग, चट्टा, नायटा

**चड्डी** (ना.)– गुडघ्यापर्यंत आखूड विजार

**चद्दर** (ना.)– चादर, पलंगपोस

**चंद्री** (क्रि.वि.)- एकटक पाहणे, एकसारखी नजर

**चपकय** (क्रि.)- भितो, चपकतो, दचकतो, दबतो, वाकडा होतो

**चपकायो** (क्रि.)- घाबरविला

**चपकायो** (क्रि.)- चपकविला, वाकडा केला

**चपकी** (क्रि.)- चपकली

**चंपी** (ना)- टोळी, टोळीचे तेलघाणीत तेल काढतात

**चबरचबर** (क्रि.वि.)- मध्ये मध्ये बोलणे, अति बोलणे, वटवट करणे

**चबरय** (क्रि.)- मध्येच बोलतो, अकारण बोलतो

**चबरा** (वि.)- मध्ये मध्ये बोलणारा, अनावश्यक बोलणारा

**चबरी** (वि.)- मध्ये मध्ये बोलणारी, अति बोलणारी

**चबरो** (वि.)- मध्ये मध्ये बोलणारा, अनावश्यक बोलणारा

**चबऱ्या** (वि.)- मध्ये मध्ये बोलणारा, अनावश्यक बोलणारा

**चबाऊ** (वि.)- चावतो, दाताखाली रगडतो

**चबायी** (क्रि.)- चावली, दाताखाली रगडली

**चबायो** (क्रि.)- चावला, दाताखाली रगडला

**चंबार** (ना.)- चांभार, चर्मकार

**चबाव** (क्रि.)- चाव, चर्वण कर

**चबावणखे** (क्रि.वि.)- चावायला, चर्वण करायला, दुःख द्यायला

**चबावणे** (क्रि.)- चावणे, चर्वण करणे

**चबावणो** (क्रि.)- चावावे, चर्वण करावे

**चबावय** (क्रि.)-चावतो, दाखाखाली रगडतो

**चबायो** (क्रि.)- चावला, दुःखी केले.

**चरक्या** (क्रि.)- भित्रा,

**चरकय** (कि.)- भितो, घाबरतो

**चर्बी** (ना.)- चरबी, मेंद, वसा

**चळयो** (क्रि.)- चढला, झाडावर चढला, वाम मार्गाला लागला

**चयतन** (ना.)- चैतन्य, जीव, मन

**चरक्यो** (क्रि.)- घाबरला, दचकला, भांबावला

**चरचर** (वि.)- एक आवाज, चुरचुर, तीव्र वेदना, खडबडीत, खरखरीत

**चरय** (क्रि.)- चरतो, खूप खातो
**चरा** (ना.)- तडा, रेषा, ओरखडा
**चराट** (ना.)- दोर, चऱ्हाट, जाड दोरी
**चरायो** (क्रि.)- चारला, खाऊ घातले, बनविले, भूलविले, दिशाभूल केली
**चरी** (क्रि)- चरली, खूप खाल्ले
**चरीन** (क्रि.)- चरलेत, खूप खाल्ले
**चरू** (ना.)- गडवा, लोटा, तांब्या, गडू
**चरू** (क्रि.)- चरतो, मोकाट खात सुटतो
**चरोन** (क्रि.)- चराल, खूप खाल
**चऱ्यो** (क्रि.)- खूप खाल्ले, चरला
**चलती** (क्रि.वि.)- चालती, बोलबाला, चालणारी
**चलय** (क्रि.)- चालतो, निघतो, चालू लागला
**चलवादी** (वि.)- वाह्यात, भांडकुदळ, एक शिवी
**चलवादेवानकी** (वि.)- एक शिवी (मुलीला/ स्त्रीला उद्देशून)
**चली** (क्रि.)- चालली, निघाली
**चलीन** (क्रि.)- चाललेत, निघालेत
**चले** (क्रि.)- चालले, निघाले, चालले
**चलो** (क्रि.)- चला, निघा, जा, उठा
**चल्यो** (क्रि.)- चालला, निघाला, जाऊ लागला
**चव** (ना.)- आस्वाद
**चवखे** - चवीला, (चव-नाम)
**चवचाल** (वि.)- फाजील, बदमाश, असभ्य, अशिष्ट, चावट
**चवचिंदी** (वि.)- अनागोंदी, अंधाधुंदी, बेबंदशाही
**चवथेसे** (वि.)- चवथ्या वेळी, चवथ्यांदा
**चवथो** (वि.)- चवथा, चवथा क्रमांक
**चवना** (ना.)- नखरा, मिजास, व्यसन
**चवरी की भाजी** (ना.)- चवळीची भाजी
**चवरी** (ना.)- लग्न विधीत पूजा करण्यासाठी हिरव्या मांडवात तयार केलेला मातीचा लहान ओटा
**चवळो** (वि.)- रुंद, विस्तीर्ण, अधिक रुंदीचा

**चव्हाटा** (ना.)- रस्ता
**चव्हाटापर** - रस्त्यावर, चारचौघांसमोर, भररस्त्यावर
**चहागारणी** (ना.)- चहागाळणी
**चळ** - उंच भाग, चढण, चढ, झाडावर चढ
**चळणखे** (क्रि.)- चढायला, झाडावर चढायला गेला
**चळय** (क्रि.)- चळतो, बहकतो, वाम मार्गाला लागतो
**चळवाचळवी** (क्रि.वि.)- चढवाचढवी, उत्तेजन देणे
**चळाव** (क्रि.)- चढव, झाडावर चढव, डोक्यावर घे (उपरोधाने)
**चळी** (क्रि.)- चढली, बहकली, कुमार्गाला लागली
**चळोन** (क्रि.)- चढाल, झाडावर चढाल, वाममार्गाला लागला
**चाऊर** (ना.)- तांदूळ, एक धान्याचा प्रकार
**चाखय** (क्रि.)- चाखतो, आस्वाद घेतो, चोखतो
**चांगलो** (वि.)- चांगला, उत्तम
**चांगलोचुंगलो** (वि.)- चांगले, उत्तम, छान
**चाटय** (क्रि.)- चाटतो, चाखतो, आस्वादतो
**चाटी** (ना.)- टक्कल, केसविहीन डोके, चाटली, जिभेने चाटली
**चाटू** (ना.)- लाकडी मोठा चमचा, जिभेने चाटता
**चाटेल** (वि.)- लबाड, खोटा, चाटलेला, उष्टा
**चादळली** (ना/वि.)- यत्किंचित, किंमतशून्य, एक शिवी
**चापलुसी** (क्रि.वि.)- गोंडा घोळणे, मागेमागे फिरणे, हाजी हाजी करणे
**चानकी** (ना.)- लहान भाकर
**चांनी** (ना.)- चांदणी
**चान्नी** (ना.)- चांदणी, तारका
**चांनीरात/चान्नीरात** (ना.)- चांदणी रात्र, शुक्ल पक्षातील रात्र
**चान्नेने** (ना.)- चांदण्यात, चंद्र प्रकाशात
**चान्नो** (ना.)- चंद्रप्रकाश
**चाब** (क्रि.)- चाव, चावा घे, दंश कर, शोषण कर, त्रास दे
**चाबजो** (क्रि.)- चावशील, चावा घेशील, शोषण करशील, त्रास देशील
**चाबय** (क्रि.)- चावतो, चावा घेतो, त्रास देतो, लुटतो
**चाबरी** (वि.)- चावणारी, शोषण करणारी, लुटणारी

**चाबरो** (वि.)– चावणारा, शोषण करणारा, लुटणारा

**चांबल** (वि.)– थोडेसे ओले, अर्धवट वाळलेले

**चांबळा** (ना.) चर्म, चामडे, कातडे

**चाबाचाबी** (क्रि.वि.)– चावाचावी, एकमेकांना चावणे

**चाबी** (क्रि.)– चावली, संपत्ती लुटली, शोषण केले.

**चाबू** (क्रि.)– चावतो, दंश करतो, शोषण करतो

**चाब्यो** (क्रि.)– चावला, शोषण केले, लुटले

**चाळ** (ना.)– चाड, गरज, शरम

**चाळ्यो** (क्रि)– चाळला, पाहिला, वाचला

**चाट मारय** (क्रि.)– बनवितो, खोटे बोलतो

**चार इसा** (वि.)– ऐंशी, चार वेळा वीस, ग्रामीण भागातील मोजण्याची एक पद्धत

**चारकेचार** (वि.)– चारही, चौघेही

**चारपायी** (ना.)– खाट, बाज

**चारबी** – चारही

**चारी कनांग** (वि.)– चार बाजला, चार दिशांना

**चालनी** (ना.)– चाळणी, गाळणी

**चावरीबावरी** (क्रि.)– घाबरली, कावरीबावरी

**चावरोबावरो** (वि.)– कावराबावरा, घाबरलेला

**चावळी** (ना.)– चावडी, गावाच्या सार्वजनिक कामकाजाचे स्थळ (पूर्वी त्याला खूप महत्त्व होते.)

**चासणी** (ना.)– चाचणी, साखरेचा पाक, तपासणी, परीक्षा

**चिकट** (वि.)– कंजूष, कृपण, चिकटणारा

**चिच** (ना.)– चिंच, एक आंबट फळ

**चिचोनी** (ना.)चिंचोनी, चिंचवणी, जेवणातील एक पदार्थ, चिंचेचे आंबट गोड पाणी

**चिचोरी** – अर्धा चिंचोका

**चिचोरा** (ना.)– चिंचोका, चिंचेची बी

**चित** (ना.)– चित्त, लक्ष, मन, ध्यान, अंतःकरण

**चितकबरो** (वि.)– विविध रंगाचा, एखाद्या प्राण्याचा रंग

**चितरा** (ना.)– चित्र नक्षत्र, सत्तावीस नक्षांपैकी चवदावे

नक्षत्र
**चितारय** (क्रि.)- चित्रित करतो, चित्र काढतो, तयार करतो
**चितारी** (क्रि.)- चित्रित केली
**चितारो** (क्रि.)- चित्रित करा
**चिताऱ्यो** (क्रि.)-चित्रित केले, रेखाटले
**चित्रा** (ना.)- चित्र, तसवीर
**चिथावय** (क्रि.)- चिथवितो, उत्तेजन देतो, पेटवितो
**चिनभीन** (क्रि.वि.)- अस्वस्थ, विचलित, सुचेनासे होणे
**चिपकनो** (क्रि.)- चिपकणे
**चिपकी** (क्रि.)- चिपकली
**चिपळ** (ना.)- डोळ्यांच्या काठावरील, पापणीवरील मळ
**चिमटा** (ना.)-चिमोटा, पकड, सांडस, झोंबेल असे बोलणे
**चिमटा** (ना.)- पकड, सांडस
**चिमजणो** (क्रि.)- कोमेजणे
**चिमणखे**- कोमेजायला
**चिमय** (क्रि.)- कोमेजतो, निस्तेज होतो
**चिमी** (क्रि.)- कोमेजली, निस्तेज झाली, रया गेली
**चिमूटभर** (वि.)- दोन बोटात मावेल एवढे, अगदी थोडे
**चिम्यो** (क्रि.)- कोमेजला, निस्तेज झाला, रया गेली
**चिरणखे** (क्रि.वि.)- चिरायला, कापायला
**चिरय** (क्रि.)- चिरतो, कापतो, फाडतो
**चिरा** (क्रि.)- चिरला, कापला, फाडला
**चिरी** (क्रि.)- चिरली कापली, फाडली
**चिरिकचिरिक** (क्रि.वि.)- पुढेपुढे, बोलण्यात पुढे पुढे
**चिरोटा** (ना.)- कागदाचा तुकडा
**चिल्लायी** (क्रि.)- ओरडली, आक्रोशली
**चिल्लायो** (क्रि.)-ओरडला, आक्रोशला
**चिल्लाव** (क्रि.वि.)- ओरड, आक्रोश कर
**चिल्लावत** - ओरडतात, आक्रोशतात
**चिल्लावनखे** - ओरडायला, आक्रोशायला
**चिल्लावय** (क्रि.वि.)- ओरडतो, आक्रोशतो
**चिल्लावो** (क्रि.)- ओरडा, आक्रोश कर
**चिवळय** (क्रि.)- चिवडतो, अकारण इकडेतिकडे करतो

**चिवय** (क्रि.)- एक भाजी, बारीक पानांची भाजी
**चिळकी** (वि.)- थोड्याने चिडणारी
**चिळको** (वि.)- थोड्याने चिडणारा, चिडखोर
**चिळक्यो** (क्रि.)- चिडला
**चिळचिळ** (क्रि.वि.)- चिडचिड, कुरकूर
**चिळचिळा** - चिडचिड्या, चिडणारा
**चिळणखे** (क्रि.वि.)- रागवायला, चिडायला
**चिळय** (क्रि.)-चिडतो, रागावतो
**चिळा** (ना.)- चिमणा, एक लहान पक्षी(नर)
**चिळाचिळी** (क्रि.वि.)- चिमणाचिमणी, चिडाचिडी, एकमेकांवर चिडणे
**चिळी** (क्रि.)- चिमणी(मादी), चिडली, रागावली
**चिळू** (क्रि.वि.)- चिडू, रागावू
**चिळोन** (क्रि.)- चिडाल, रागवाल
**चुकय** (क्रि.)- चुकतो, नको ते करतो.
**चुकी** (क्रि.)- चुकली, नको ते केले
**चुकीती** (क्रि.)- चुकली होती
**चुकू** (क्रि.)-चुकतो, मी चुकतो
**चुकू नोको** (क्रि.)- चुकू नको
**चुकोन** (क्रि.)- चुकाल, नको ते कराल
**चुगली** (क्रि.वि.)- लावालावी, चहाडी, इकडेच तिकडे सांगत सुटणे
**चुनखळी** (ना.)- चुनखडी
**चुंभय** (ना.)- चुंबळ
**चुरणे** (क्रि.)- चोळणे, रगडणे
**चुरय** (क्रि.)- रगडतो, चोळतो
**चुरा** (ना.)- भुगा, बारीक तुकडे, जर्जर स्थिती
**चुलेने** (ना.)- चुलीत
**चुलेने गयो** - चुलीत गेला
**चुलेपर** - चुलीवर
**चुलो** (ना.)- चूल, स्वयंपाक करण्याचे साधन
**चुळनखे** (क्रि.वि.)- शिजायला
**चुळय** (क्रि.)- शिजते, रांधले जाते, उकडते
**चुळा** (ना.)- चुडा, बांगड्या, हिरव्या बांगड्या, स्त्रियांच्या सौभाग्याचे प्रतीक
**चुळायो** (क्रि.)- शिजविले, शिजविला
**चुळाव** (क्रि.)- शिजव,

शिजायला ठेव, उकड

**चुळावनखे** (क्रि.वि.)- शिजवायला, शिजविण्यासाठी

**चुळावय** (क्रि.)- शिजविते, उकडते

**चुळी** (क्रि.)- शिजली, उकडली, भाजी शिजली

**चुळेन** (क्रि.)- शिजणार, डाळ शिजणार

**चुळेल** (वि.ना.)- शिजलेली, डाळ शिजलेली आहे, हडळ, स्त्री रूपातील दुष्ट पिशाच

**चुळ्यो** (क्रि.)- शिजला

**चुळ्योतो** (क्रि.)- शिजला होता

**चून** (ना.)- बेसन, पिठले, जेवणातील पारंपरिक एक पदार्थ

**चून** (ना.)- बेसनवडी, एक खाद्यप्रकार

**चेकोन्या** (क्रि.वि.)- जिभेने/ डोळ्याने वेडावणे, वाकडे तोंड करणे.

**चेक्यो** (क्रि.)- चकला, फसला, भुलला

**चेंगरय** (क्रि.)- चेंगरतो, दबतो

**चेतय** (क्रि.)- भडकतो, पेटतो, चेततो, भावना उत्तेजित होतात

**चेतावय** (क्रि.)- चेतवितो, पेटवितो, भावना भडकवितो

**चेती** (क्रि.)- पेटली, भडकली, भावना अनावर झाली

**चेतो** (वि.)- जागी, न झोपलेली

**चेत्यो** (क्रि.)- पेटला, भडकला, उत्तेजित झाला

**चेंदामेंदा** (क्रि.वि.)- चुराडा, ठेचा

**चेंद्यो** (क्रि.)-चेंगरला, दबला

**चेव** (वि.)- जाग, जागृत

**चैत** (ना.)- चैत्र, हिंदू वर्षाचा पहिला महिना

**चोक** (वि.)- खरा, चोख, चांगले, शुद्ध, प्रामाणिक

**चोक** (वि.)- चोख, तोंडाने आंबा चोखणे

**चोखट** (वि.)- चांगला, छान, उत्तम, शुद्ध

**चोखणखे** (क्रि.)- चोखायला, चोखण्यासाठी

**चोखय** (क्रि.)- चोखतो, जिभेने शोषतो

**चोखारने** (क्रि.)- स्वच्छ करणे, निवडणे, तांदूळ निवडणे

**चोखी** (क्रि.)- चोखली

**चोख्यो** (क्रि.)- चोखला

**चोटाय** (वि.)- लबाड, चोर, चोरणारा

**चोट्टिको** (वि.)- एक शिवी

**चोट्टो** (वि.)- चोर

**चोपळा** (वि.) - चोपडा, निसरडा, गुळगुळीत, लबाड

**चोंबळा** (वि.सा.ना.)- मध्येमध्ये बोलणारा, अकारण वटवट करणारा, लावालावी करणारा

**चोंबळी** - लावालावी करणारी, मध्ये मध्ये बोलणारी

**चोयना** (ना.)- पायजामा, विजार, चोळणा

**चोयो** - चोळला, मलम चोळला

**चोरखे** - चोरून

**चोरनखे** - चोरायला, लुटायला

**चोरीकी** - चोरीची, लुटलेली

**चोरीको** - चोरीचा

**चोरीन** - चोरले, लुटले

**चोवय** (क्रि.)- चोळतो, तेल चोळतो

**चौफुली** (ना.) - चौफुला, चार रस्ते मिळतात ते ठिकाण

**चौरी** (ना.)- लग्नात वधुवरांनी पाय ठेवण्याचा लहान पाट

**च्याट मारय** (क्रि.) - बनवितो, खोटे बोलतो

**च्याटेल** (वि.) - लबाड

**च्यार** (वि.) - चार, चार वाजले

***

# छ

**छकळा** (ना.)- छकडा, लहान बैलगाडी, रेंगीपेक्षा मोठी बैलगाडी

**छक्कापंजा** (क्रि.वि.)- बनवाबनवी, लबाडी, लुच्चेगिरी

**छटाकी** (वि.)- अगदी लहान, इवलीशी

**छतपर** - गच्चीवर, घराच्या वर

**छत** (ना.)- गच्ची

**छदाम** (वि.ना.)- किमतीने पैशाच्या एक चतुर्थांश असलेले नाणे

**छन्नी** (स्त्री.सं.ना.)- छिन्नी, दगड कोरण्याचे एक टोकदार लोखंडी हत्यार

**छमेली** (वि.)- थाटमाट करून स्वत:ला मिरविणारी, नखरेल मुलगी/स्त्री

**छाकटी** (वि.)- धूर्त, लबाड, बनवाबनवी करणारी, फाजील हुशार

**छाकटो** (वि.)- धूर्त, लबाड, बनवाबनवी करणारा, लुबाडणारा

**छाकटोपन** (वि.)- स्वार्थीपणा, धूर्तपणा, लबाडी

**छाटणो** (क्रि.)– तोडणे, कमी करणे, तुकडे करणे, निवड करणे

**छाटय** (क्रि.)– तोडतो, कमी करते, तुकडे करतो, निवड करतो

**छाटी** (क्रि.)– तोडली, काटेरी फांदी तोडली, निवड केली

**छाटो** (क्रि.)– तोडा, तोडा व कापा, काटेरी फांदी तोडा, निवड करा

**छानछबेली** (वि.ना.) – नट्टाबट्टा करून मिरवणारी, अक्कडबाज युवती/स्त्री

**छानने** – गाळणे,

**छिनने** – हिसकावून घेणे, काढून घेणे

**छिन** – काढ, हिसकावून घे

**छिनाई** (क्रि.)– हिरावून घेतली, हिसकावून घेतली

**छिनाल** (वि.)– एक शिवी, बदफैली, व्यभिचारी

**छिनाली** (ना.भाववाचक नाम)– कूकर्म, व्यभिचारी, जारकर्म

**छिनावय** (क्रि.)– हिसकावून घेतो, हिरावून घेतो

**छुछा** (ना.)– करणी, जादूटोणा, जारणमारण, अघोर विद्या

**छुपो रूस्तम** (वि.)– धूर्त, अतिलबाड, बनवाबनवी करण्यात माहीर

**जख्खळ** (वि.)– जर्जर, अति जीर्ण

**जंगणे** (क्रि.)– गंजणे, मळ चढणे

**जगने** (क्रि.)– जगात, पृथ्वीवर

**जगने** – जिवंत राहणे

**जगनो** (क्रि.)– जगणे, जिवंत राहणे

**जगनो लगय** (क्रि.)– जगावे लागते

**जगय** (क्रि.)– जगतो, जिवंत राहतो

**जंगय** (क्रि.)– गंजते

**जंगलजेठ्या** (वि.)– अडाणी, केवळ मजुरी करणारा

**जगरा** (ना.)– रोडगे भाजण्यासाठी पेटविलेल्या गवऱ्यांचा ढीग

**जगा** – जवळ, समीप

**जगापर** – जागेवर, स्थिर

**जंग्यो** (क्रि.)– गंजला, मळ चढला

**जत्रा** (ना.)– यात्रा, मेळा

**जतायखे** (क्रि.वि.)– तंबी देऊन आगाऊ समज देऊन, परखड शब्दांत सांगून

**जताव** (क्रि.वि.)– सूचना, तंबी

**जंदय** (क्रि.)– प्रसवते, विते, जन्म

देते

**जंदी** (क्रि.)- व्याली, जन्म दिला, प्रसवती

**जनपतखाना** (ना.)- अमर्याद कुटुंब, कुटुंबातील अतिरिक्त संख्या

**जनमन** (ना.)- लोकांचे मन, समाजाचे मन

**जनय** (क्रि.)- व्याते, जन्म देते, प्रसवते

**जनवार** (ना.)- जनावर, प्राणी, मानवेतर पशू

**जनी** (क्रि.)- जन्म दिला, व्याली, प्रसवली, बाळंतीण झाली

**जप लगी** (क्रि.)- झोप लागली, डोळा लागला, झोपली

**जपकी** (क्रि.वि.)- ज्या वेळेची, जेव्हाची

**जपकोतब** (क्रि.वि.)- जेव्हाचे तेव्हा, ज्या वेळचे त्याच वेळी

**जब्बर** (वि.)- उर्मट, धीट, धैर्यवान, बलाढ्य

**जबरदस्तीने** (क्रि.वि.)- बळजबरीने, आवेशाने, बळजोरीने

**जबरी** (क्रि.वि.)- जबरदस्ती, बळजोरी

**जबलग** (क्रि.वि.)- जेथपर्यंत, जोपर्यंत

**जबळा** (ना.)- जबडा, तोंड, जाभाड

**जबान** (ना.)- वाणी, शब्द, बोलणे

**जमदार** - जमादार

**जमनखे** (धातुसाधित क्रि.वि.)- जमायला, जुळायला, चांगले काम जमायला हवे

**जमय** (क्रि.)- जमते, जुळते

**जमायी** (क्रि.)- जमविली, व्यवस्थित केली, जुळविली

**जमायो** (क्रि.ना.)- जमविले, व्यवस्थित केले, पूर्ण केले

**जमाव** (क्रि.)- समुदाय, जनसमुदाय, जमव, पूर्ण कर, व्यवस्थित कर

**जमावो** (क्रि.)- व्यवस्थित करा, जमवा, एकत्रित करा.

**जमेन** (क्रि.)- जमणार, जुळेल, यशस्वी होईल

**जमेनच** (क्रि.)- जमणारच, जुळणारच

**जयताळी** (वि.)- जळणारी, मत्सर करणारी, द्वेष करणारी

**जयताळो** (वि.)- जळणारा, मत्सर करणारा

**जयंती** (ना.)- जयवंती (स्त्री

नाम), यशस्वी स्त्री

**जरके** (क्रि.वि.)- जळून, नष्ट होऊन, द्वेष करून काय होते

**जरके खाक भयो** (क्रि.वि.)- जळून खाक झाला

**जरठ** (वि.)- रठ, निबर, कठीण

**जरतन** (ना.)- सरपण, जळण, इंधन

**जरने** (क्रि.)- जळणे, जळफळणे, पेटणे

**जरफर** (क्रि.वि.)- जळफळ, तडतडाट, संतप्त, क्रोधाधीन

**जरय** (क्रि.)- जळतो, जळफळतो, संतापतो, पेटतो, द्वेष करतो

**जरस** (क्रि.)- जळफळतोस, जळतोस, तो मला जळतो

**जरा** (वि.)- थोडा, थोडी, सीमित

**जराभी** (वि.)- थोडीशी

**जरायी** (क्रि.)- जाळली

**जरायो** (क्रि.)- जाळला

**जराव** (क्रि.)- जाळ, दहन कर

**जरावनखे** (क्रि.वि.)- जाळायला, दहन करायला

**जरावय** (क्रि.)- जाळतो, दहन करतो

**जरावो** (क्रि.)- जाळा, दहन करा

**जरासकसे** (वि/क्रि.वि.)- थोड्याने, थोडक्यात

**जरासिक** (वि.)- थोडीशी, अल्पशी, सीमित

**जरासी** (वि)- थोडीश, अल्पशी, सीमित

**जरासेकसे** (वि.)- थोड्याने, थोडक्यात

**जरासो** (वि.)- थोडासा, सीमित

**जरासोक** (वि.)- थोडेसे, थोडासा

**जरी** (ना)- कलाबतूने विणलेले वस्त्र

**जरी** (क्रि.)- जळली

**जऱ्यो** (क्रि.)- जळाला

**जलम** (ना.)- जन्म, जनन, संभव, निर्मिती, उत्पत्ती

**जलमने** (क्रि.)- जन्माला येणे

**जलमय** (क्रि.)- जन्मतो, संभवतो

**जलमी** (क्रि.)- जन्मली, जन्माला आली

**जल्मी** (क्रि.)- जन्मली, जन्माला आली

**जल्म्यो** (क्रि.)- जन्मला, जन्माला आला

**जव** (ना.)- एक प्रकारचे धान्य

**जवको दाणा** (ना.)- जवाचा दाणा

**जवाई** (ना.)- जावाई, दामाद

**जवारी** (ना.)- ज्वारी, जोंधळा, एक धान्याचा प्रकार

**जसोदा** (विशेष ना.)- यशोदा, स्त्रीवाचक नाम

**जहांवहां** (क्रि.वि.)- जेथे तेथे

**जहांसे** (क्रि.वि.)- जेथून

**जा** (क्रि.)- निघ, चालता हो

**जाऊ** (क्रि.)- जातो, निघतो

**जागतो पायरा** (क्रि.)- जागता पहारा, डोळ्यात तेल घालून रखवाली

**जागय** (क्रि.)- जागतो, सतर्क राहतो

**जांग** (ना.)- जांघ, मांडी

**जाजो** (क्रि.)- जाशील, गमन करशील

**जाणो** (क्रि.)- जाणे, निघणे

**जातलग** (क्रि.वि.)- जाईपर्यंत

**जातवान** (वि.)- अस्सल घरंदाज, जातिवंत, खरा

**जातसे** (स.)- स्वत: जातीने

**जातापर** (ना. शब्दयोगी)- जात्यावर, जात्यावर दळणे, जात्याच्या वर पदार्थ ठेवला आहे

**जातापरकी** (ना.श.)- जात्यावरची गाणी

**जानले** (क्रि.)- समजून, ओळखून घे, लक्षात घे

**जानो** (क्रि.)- समजा, ओळखा, लक्षात घ्या, ध्यानात घ्या

**जानोसा** (ना.)- जानवसा, विवाहप्रसंगी वधू किंवा वरपक्षाच्या गावात एखाद्या जागी तात्पुरते थांबण्याचा निवारा

**जांब** (ना.)- पेरू, एक फळ

**जाबोन** (क्रि.)- जाऊ या

**जांभोरा** (वि.)- जांभळा

**जांभूर** (ना.)- जांभूळ, एक गोड, आंबट, तुरट असे फळ

**जाय** (क्रि.)- जाते, जातो

**जायखे आयी** (क्रि.)- जाऊन आली

**जायखे आयो** (क्रि.)- जाऊन आला

**जायखे देख** (क्रि.)- जाऊन पाहा

**जायगीर** (ना.)- जहागीर, जाहगीर

**जायफय** (ना.)- जायफळ

**जाय रई** (क्रि.)- जाऊन राहिली, जात आहे

**जाय रह्यो** (क्रि.)- जात आहे

**जाय रहयोतो** (क्रि.)- जात होतो

**जायी** (ना.)- जाळी, जाईची वेल

**जारा** (ना.)- जाळे, मासे

पकडण्याचे जाळे, कोळ्याने जाळे विणले

**जावबोन** (क्रि.)- जाऊ या

**जावोन** (क्रि.)- जाल

**जावोना** (क्रि.)- जाना, निघा ना

**जासोंद** (ना.)- जास्वंद, एक फुलझाड

**जाळो** (वि.)- जाड, लठ्ठ, थंडी

**जाळोजुळो** (वि.)- खूप लठ्ठ, पुष्ट, स्थूल

**जिकय** (क्रि.)- जिंकतो, विजयी होतो, यशस्वी होतो

**जिकी** (क्रि.)- जिंकली, यशस्वी झाली, विजयी झाली

**जिक्यो** (क्रि.)- जिंकला, यशस्वी झाला, विजयी झाला

**जिगर** (ना.)- हृदय, प्राण, शरीराचा मुख्य अवयव

**जिगर** - अपत्य, जीवश्च कंठश्च

**जिगरको तुकळा** (ना.)- काळजाचा भाग, जीवश्च कंठश्च, अपत्य

**जितनखे** (क्रि.)- जिंकायला, जिंकण्यासाठी विजयी होण्यासाठी

**जितबोन** (क्रि.)- जिंकूया, जिंकणार

**जितय** (क्रि.)- जिंकतो, विजयी होतो

**जिती** (क्रि.)- जिंकली, विजयी झाली, यशस्वी झाली

**जितेन** (क्रि.)- जिंकणार, विजयी होणार

**जितोन** (क्रि.)- जिंकणार, विजयी होणार

**जित्यो** (क्रि.)- जिंकला, विजयी झाला

**जिंदगी** (ना.)- संसार

**जिणगाणी** (ना.)- जगणे, उदरनिर्वाह

**जिनगी** (ना.)- संसार, जिंदगी

**जिन्नस** (ना.)- एखादी वस्तू

**जिरय** (क्रि.)- जिरतो, पचतो, मुरतो, थकतो

**जिरा** (ना.)- जिरे, मसाल्याचा पदार्थ

**जिरी** (क्रि.)- जिरली, पचली, मुरली, थकली

**जिऱ्यो** (क्रि.)- जिरला, मुरला, पचला

**जीब/जीबली** (ना.)- जीभ, जिव्हा

**जीव घुटय** (ना.क्रि.)- जीव गुदमरतो, जीव घाबरतो, दम कोंडतो

**जीवपर आवय** - नको वाटते,

कंटाळा येतो

**जुगाळ** (क्रि.वि.)- साधनसामग्री वस्तू इ.ची परिस्थितीनुरूप एनकेन प्रकारे जुळवाजुळव

**जुता** (ना.)- पायात घालण्याचा जोडा

**जुनो** (वि.)- जुना, प्राचीन, पुराणा

**जुवा** (ना.)- ऊ, केसातील सूक्ष्म जंतू

**जुवारिन, जुवारी** (वि.)- जिच्या डोक्यात खूप उवा झाल्या असतील अशी स्त्री

**जुवारी, जुवाऱ्या** (ना.)- जुगार खेळणारा, जुगारात रमणारा

**जुळा** - जुडा, बुचडा, अंबाडा, केसांचा अंबाडा

**चूर** (ना.)- ताप, ज्वर, अंग तापणे

**जूरसे** - तापाने, ज्वराने

**जेई** (क्रि.)- जेवली, भोजन घेतलेली

**जेठ** (ना.)- नवऱ्याचा मोठा भाऊ

**जेठानी** (ना.)- नवऱ्याच्या मोठ्या भावाची पत्नी

**जेयले** (क्रि.)- जेवून घे, भोजन करून घे

**जेय लेई** (क्रि.)- जेवून घेतले, जेवली

**जेयीती** (क्रि.)- जेवली होती

**जेयो** (क्रि.)- जेवला, भोजन केले

**जेयोका** (क्रि.)- जेवला का? भोजन केले का?

**जेवणखे** (क्रि.वि.धातुसाधित)- जेवायला, भोजन करायला

**जेवणो** (वि.)- उजवा, सरस, सरळ

**जेवनो** (ना.)- जेवण, भोजन

**जेवनो लगय** (क्रि.)- जेवावे लागते, भोजन करावे लागते

**जेवोन** (क्रि.)- जेवाल, भोजन कराल

**जेस्टा** (ना.)- ज्येष्ठ, हिंदू वर्षाचा तिसरा महिना

**जोंधरा** (ना.)- ज्वारी, एक धान्याचा प्रकार

**जोर** (ना.)- ताकद, शक्ती, दम, जुलूम

**जोरसे** (क्रि.)- मोठ्याने

**जोरजोरसे** (क्रि.वि.)- जोरजोराने

**जोरू** (ना.)- बायको, पत्नी

**जोरसे** (क्रि.वि.)- अधिक ताकदिने, जोराने

**जो होनको हू भयो** - जे व्हायचे ते झाले

**जो** (सर्वनाम) **होन** (क्रि.) **को हू**

(सर्वनाम) **भेया** (क्रि.)– जे व्हायचे ते होते.

***

# झ

**झक मारय** (क्रि.)– निष्फळ काम करतो

**झकोला** (ना.)– धक्का, अकस्मात लोटणे, हिंदोळा

**झक्क** – लख्ख, झकास

**झक्कास** – झकास, उत्तम, उत्कृष्ट, अप्रतिम

**झक्की** (वि.)– लहरी, छांदिष्ट, मनात येईल तसे वागणारा करणारा

**झगळणखे** (क्रि.वि.)– भांडायला, लढायला

**झगळणे** (क्रि.)– झगडणे, भांडणे, लढणे, संघर्ष करणे

**झगळय** (क्रि.)– झगडतो, भांडतो

**झगळा** (ना.धातुसाधित नाम)– भांडण, तंटा, बाचाबाची

**झगळी** (क्रि.)– भांडली, लढली

**झगा** (शब्दयोगी)– पाशी, जवळ, समीप, मुलीचे एक वस्त्र

**झटकय** (क्रि.)– झटकतो, झाडतो, दूर सारतो, नाकारतो

**झटकी** (क्रि.)– झटकली, झाडली, टाळली

**झटको** (क्रि.)– झटका, झाडा, स्वच्छ करा, टाळा, नाकारा

**झटक्यो** (क्रि.)– झटकले, झाडले, स्वच्छ केले, झटकला, नाकारले

**झननन** – जोराचा विशिष्ट आवाज

**झनाना** – जोराचा आवाज

**झपझप, झपाझप** – जोरजोरात, वेगाने, जोराने

**झपाटी** (वि.)– मोठी, अवाढव्य, विस्तारशील

**झपाटी** (क्रि.)– पछाडली, झपाटली

**झपाटो** (वि.)– मोठा, अवाढव्य, विस्तारशील, पछाडा

**झरय** (क्रि.)– झरते, गळते, पाझरते, क्षीण होते

**झलकय** (क्रि.)– चमकते, सांडते, हेलावते, प्रकट होते, थोडासा दिसते, दिसतो

**झळखणे** (क्रि.)– प्रकाशणे, चकाकणे

**झळजोस** (क्रि.)– रोड होशील, झडशील, वजन कमी होईल

**झळप** (ना.)– झडप, झेप, उड्डाण

**झळय** (क्रि.)– झडतो, रोडावतो,

कमी होतो

**झळी** (ना/क्रि.)- झड, पावसाची झड, रिपरिप, सतत कोसाळणारा पाऊस, रोडावली, रोड झाली, झडली

**झळोन** (क्रि.)- रोड व्हाल, शरीर कमी होईल

**झळ्यो** (क्रि.)- झडला, रोडावला, बारीक बारीक झाला

**झाकट** (ना.)- दिवस उजडण्यापूर्वीची वेळ, रात्र संपण्यापूर्वीची वेळ

**झाकटणे** (ना.)- खूप झकाळी, भल्या पहाटे

**झाकय** (क्रि.)- झाकतो, आच्छादन टाकतो, दुसऱ्यास दिसू नये याची काळजी घेतो

**झाकी** (क्रि.)- झाकली, आच्छादिली

**झाकेन** - झाकणार, आच्छादन टाकणार

**झाकेल** (वि.)- झाकलेले, आच्छादित, लपविलेले

**झाकोन** (क्रि.)- झाकाल, लपवाल

**झाक्यो** - झाकले, आच्छादन टाकले, लपविले

**झांज** (ना.)- मोठा टाळ एक वाद्य

**झांजी** (ना.)- पऱ्हाटीची चटईसारखी वीण (विशेषत: ग्रामीण भागात दिसून येणारी)

**झापनखे** (क्रि.वि.)- झापायला, रागवायला, खरडपट्टी काढायला

**झापने** (क्रि.)- रागावणे, खरडपट्टी काढणे

**झापय** (क्रि.)- रागावतो, रागावून बोलतो

**झापी** - रागावली, रागावून बोलली

**झापरी** (वि.)- अस्ताव्यस्त केस असलेली, बावळट अजागळ

**झांबल झांबल** (क्रि.वि.)- नुसताच शोधाशोध करणारा, अर्थशून्य खटाटोप

**झांबलय** (क्रि.)- नुसताच शोधाशोध करतो, निरर्थक शोधाशोध करतो, अडखडतो

**झामरट** (वि.)- बावळट, मूर्ख, कुचकामी

**झांबल्या** (वि.)- अडाणी, अकारण शोधाशोध करणारा

**झांबळझुंबळ** (वि.)- अव्यवस्थित, अस्ताव्यस्त

**झावझाव** (क्रि.वि.)- अंधुक, धुसर, अस्पष्ट, डोळ्याने कमी दिसणे

**झावरझावर** (क्रि.वि.)- अंधुक, धुसर, अस्पष्ट, डोळ्याने कमी दिसणे

**झावा** (वि.)- झाव, झळ, उष्णता

**झाळ** (ना.)- झाड, वृक्ष, स्वच्छ कर

**झाळकी** (नामसाधित विशेषण)- झाडाची, झाडाविषयीची

**झाळको** (ना.सा.वि.)- झाडाचा

**झाळखे** - झाडाला

**झाळपट** - झाडावर

**झाळपुरकी** (वि.)- झाडावरची, मूर्ख, एक शिवी

**झाळपरको** (वि.)- झाडावरचा, मूर्ख, झाडावरचा मुंज्या, एक शिवी

**झाडपाला** (ना.)- झाडाचा पाला

**झाळपी** (वि.)- झाडीपट्टीतली, एक शिवी, अडाणी, मूर्ख, मागास स्त्री, एक शिवी

**झाळप्या** (वि.)- झाडप्या, झाडीपट्टीतील, मागासलेला, मध्यप्रदेशाच्या जंगलमय भागातला

**झाळय** (क्रि.)- झाडतो, स्वच्छ करतो

**झाळले** (क्रि.)- झाडून घे, झाड, स्वच्छ कर

**झाळी** (क्रि.)- झाडली, स्वच्छ केली

**झाळी** (ना.)- झाडी, झाडांचा समुदाय, झाडीपट्टी, झाडांची दाटी, खूप झाडे असणे, विशिष्ट प्रदेश, झाडली

**झाळोन** (क्रि.वि.)- झाडाल, झाडून काढाल, स्वच्छ कराल

**झाळोन** (ना.)- दाट झाडी

**झाळ्यो** (क्रि.)- झाडले, त्याने झाडले, खरडपट्टी काढली, रागावून ओरडला

**झिंगय** - कैफ चढतो, धुंद होतो

**झिंगा** (ना.)- माशाचा एक प्रकार

**झिज** (धातुसाधित नाम.)- कमी होणे, घर्षणाने कमी होणे, घासणे

**झिजय** (क्रि.)- घर्षण होते, क्षीण होतो, कमी होतो, झिजतो

**झिंजय** (क्रि.)- झिजतो

**झिजय** (क्रि.)- कमी होतो, क्षीण होतो

**झिंजझिंजखे** - झिजून झिजून, झिजून झिजून वस्तू बारीक झाली

**झिंजी** (क्रि.)- झिजली

**झिंज्यो** (क्रि.)- झिजला, क्षीण झाला

**झिणझिणी** (क्रि.)- वेदना होणे, दाताला वेदना होणे
**झिन्नी** (वि.)- बारीक
**झिपतर** (ना.)- अस्ताव्यस्त केस, न विंचरलेले केस
**झिपरी** (वि.)- अस्ताव्यस्त केस असलेली, अजागळ, गबाळी, केस न विंचरलेली
**झिपळली** (वि.)- अस्ताव्यस्त केसांची
**झिपुटा झिपोटा** - शेपटा, केसांचा शेपटा
**झिरपणे** (क्रि.)- पाझरणे, थेंब थेंब गळणे, थेंब थेंब झरणे
**झिरपय** (क्रि.)- पाझरते, गळते, पाणी पाझरते
**झिरा** (ना.)- पाण्याचा उगम, झरा, बारीक धार, इवलासा प्रवाह
**झिलपी** (ना.)- ढपली, धलपी, लाकडाचा तुकडा
**झिलमिल** (क्रि.)- चमकणे
**झूक** (क्रि.)- वाक, नम्र हो, लीन हो
**झुकनखे** (क्रि.वि.)- वाकायला, झुकायला, लीन व्हायला
**झुकने** (क्रि.)- लवणे, वाकणे, लीन होणे
**झुकय** (क्रि.)- झुकतो, वाकतो, लीन होतो
**झुकी** (क्रि.)- वाकली, झुकली, लीन झाली
**झुक्यो** (क्रि.)- झुकला, वाकला, लीन झाला
**झुंगारा** (क्रि.वि.)- गुंगारा, झुकांडी, नजर चुकवून काढलेला पळ
**झुमकाको दोळका** (ना.)- दोडक्याचा एक प्रकार, फळभाजीचा एक प्रकार
**झुरझुरखे** (क्रि.वि.)- झुरून झुरून, चिंताग्रस्त होऊन, दुःखाने क्षीण होऊन
**झुरनखे** (क्रि.वि.)- झुरायला
**झुरतो** (क्रि.)- दुःखाने क्षीण होतो
**झुरय** (ना.)- झुरळ, एक किडा, बागुरडा
**झुरी** (क्रि.)- झुरली, दुःखाने क्षीण झाली
**झुरोन** (क्रि.)- झुराल, खंत कराल, दुःखाने क्षीण व्हाल
**झुऱ्यो** (क्रि.)- झुरला, दुःखाने क्षीण झाला
**झुलना** (ना.)- झोपाळा, हिंदोळा, झुला, पाळणा
**झुलय** (क्रि.)- झोका घेतो, डुलतो

**झुला** (ना.)- झोपाळा, हिंदोळा, पाळणा

**झुलायी** (क्रि.वि.)- झुलविले, ताटळकत ठेवले

**झुलावय** (क्रि.)- झुलवितो, झुलविते, ताटळकत ठेवतो

**झुळपी** (वि.)- एक शिवी, मागासलेली स्त्री

**झुळूप** (ना.)- झुडूप, खुरटे झाड, माळरानावरील खुरटे झाड

**झेलजो** (क्रि.)- झेलशील, लाड पुरवशील, डोक्यावर घेशील, पडताना पकडशील

**झेलत** (क्रि.)- झेलतात, पकडतात, डोक्यावर घेतात, उगीच लाडावतात

**झेलनखे** (क्रि.)- झेलायला, झेलण्यासाठी, पकडण्यासाठी, डोक्यावर घ्यायला

**झेलबोन** (क्रि.)- झेलूयात, वरचेवर पकडूयात

**झेलय** (क्रि.)- झेलतो, पडणारी वस्तू किंवा पदार्थ पकडतो

**झेली** (क्रि.)- झेलली, पडणारी वस्तू पकडली, वाचवली, लाडावून ठेवली

**झेल्यो** (क्रि.)- झेलला, पकडला, वरचेवर पकडला, लाड पुरविला

**झोपळी** (ना.)- झोपडी, पर्णकुटी, खोपटी, गरिबाच्या निवाऱ्याची जागा

**झोंबय** (क्रि.)- झोंबतो, अतिशय बिलगतो

**झोंबी** (क्रि.ना.)- झोंबली, लिगडली, मस्ती केली, बिलगली

**झोयना** (ना.)- लोंबती पिशवी, पिशवी

**झोयी** - झोळी, पिशवी, लोंबती पिशवी

**झोरा** (क्रि.)- मोठी पिशवी, वस्तू, धान्य इत्यादी ठेवण्याची पिशवी

**झोरी** (ना.)- झोळी, भिक्षेची झोळी

**झोल** (क्रि.)- घाबरणे, लोंबता भाग

**झोल खाणे** (क्रि.)- पड खाणे, माघार घेणे, पराभूत होणे

**झोलना** (ना.)- लोंबती पिशवी

**झोळी** (क्रि.)- मारली, पिटाई केली, धुतली, धुलाई केली

**झोळ** (क्रि.)- भार, पिटाई कर, बदड, चोप दे, ठोक

**झोळ** (ना.)- जोराचा पाऊस

**झोळनखे** (क्रि.वि)– मारायला, ठोकायला, प्रहार करायला, चोप द्यायला, पिटाई करायला

**झोळणे** (क्रि.)– झोडणे, बडविणे, मारणे

**झोळपा** (ना.)– झोडपा, रट्टा, प्रहार, आघात, चोप

**झोळय** (क्रि.)– झोडतो, मारतो, चोपतो, प्रहार करतो

**झोळाझोळी** (क्रि.वि.)– झोडाझोड, मारामारी, ठोकाठोकी

**झोळी** (क्रि.)– झोडली, मारली

**झोळू** (क्रि.)– झोडू, मारू, चोपू, पिटाई करू, धुऊन काढू

**झोळ्या** – मारले, पिटाई केली, चोपले

**झ्यक्क** (वि.)– लख्ख, डोळे दिपविणारा

**झ्यंजट** (ना.)– उचापत, नसती उठाठेव, अंगलट येणारे

**झ्यलक** (वि.)– चलाखी, हुशारी

**झ्यापय** – झापतो, झटकतो, रागावून ओरतो

**झ्यांपर** (ना.)– पोलके, ब्लाऊज, झंपर, स्त्रियांच्या अंगातील चोळीसारखे वस्त्र

**झ्यापरी** – बावळट, अस्ताव्यस्त केस असलेली

**झ्यामरट** (वि.)– अस्ताव्यस्त, अव्यवस्थित, मूर्ख

**झ्याल्लर** (ना.)– झालर, रंगीबेरंगी कापडाच्या छतास बांधलेल्या चुण्या

**झ्याव** (ना.)– उन्हाची आच, उष्ण वारे

***

# ट

**टकमक** (क्रि.वि.)– एकसारखे पाहणे, एकटक पाहणे, आश्चर्यचकित होऊन

**टकरमकर** (क्रि.वि.)– रागाने पाहणे, क्रोधाने पाहणे

**टकराघो** (वि.)– बोलण्यात चतुर, गोड बोलणारा, पोपटासारखा बोलणारा

**टकरी** (क्रि.)– लागली, भिडली

**टक्कर** (क्रि.)– डोक्यावर डोके आदळणे

**टंगळमंगळ** (क्रि.वि.)– टाळाटाळ, चुकवाचुकव, हयगय, अळमटळम

**टचकन** (क्रि.वि.)– एकदम तडकाफडकी, एकदम टोचणे,

विचार न करता खुपसणे

**टपक** (ना.)– गळती

**टपक** – एकदम, एकदम ये, अकस्मात ये

**टपकय** (क्रि.वि.)– एकदम येतो

**टपकस** (क्रि.)– गळतो, पडतो, एकदम येतो

**टपकी** (क्रि.)– गळली, एकदम आली

**टपकीन** (क्रि.)– गळलेत, एकदम आलेत, अकस्मात आलेत

**टपक्यो** (क्रि.)– टपकला, थेंब पडला, अकस्मात प्रकटला

**टपऱ्या** (वि.)– किंमतहीन माणूस, अर्थशून्य, व्यक्ती, मूल्यहीन, कुचकाम्या

**टप्पर** (ना.)– पत्रा, लोखंडाची पातळ वस्तू

**टमटम** (क्रि.)– विशिष्ट आवाज, ठासून भरणे, खूप भरणे, फुगणे

**टमरेट** (ना.)– पत्र्याचा लहान डबा, खेड्यात शौचास जाताना पाणी नेण्याचे एक साधन

**टमरेल** (ना.)– पत्रा किंवा प्लॅस्टिकचा डबा

**टमाटम** (ना.)– ठासून, खूप, जोराचा आवाज, अपानवायू गुदद्वारातून सुटताना झालेला आवाज

**टम्प** (वि.)– खूप, अतिजेवल्याने टम्म पोट फुगणे

**टरकपरक** (क्रि.वि.)– घाईघाईने, झटपट, उर्मटपणे बोलणे

**टरकय** (क्रि.)– गुपचूप निघून जातो, पातळ शौच करतो

**टरकनखे** (क्रि.)– निघून जायला, निघून जायला हवे

**टरकली, टरकी** (क्रि.)– लगेच निघून गेली, पातळ शौच केली, घाबरली

**टरको** (क्रि.)– त्वरित निघून जा, काळे तोंड करा, थांबू नका

**टरकोन** (क्रि.वि.)– त्वरित निघून जाल, नाहीसे व्हाल

**टरटर** (क्रि.वि.)– वेगाने, भरभर, अपानवायू, गुदद्वारातून निघतानाचा आवाज

**टरक्यो** (क्रि.)– फाटला, पातळ शौच केली, पळाला, निसटला, लगेच निघून गेला, घाबरला

**टराटर** (वि.)– टरटर, टरटर असा आवाज

**टर्रेल** (वि.)– मुजोर, वाचाळ, तोंडाळ, सारखा वटवट करणारा

**टराटरा** (वि.)– टरटर, विशिष्ट आवाज

**टर्रायो** (क्रि.)– वाद घातला, तोंडातोंडी आला, उर्मटपणे ओरडला, गुरकावला, उलट उत्तर दिले

**टरारा** (ना.)– विशिष्ट जोराचा आवाज

**टर्राई** (क्रि.)– गुरगुरली, कुरकुरली, तोंडातोंडी आली

**टर्रावय** (क्रि.)– गुरगुरतो, वाद घालतो, तोंडातोंडी येतो

**टवकारणे** (क्रि.)– डोळे वटारून पाहणे

**टवरी** (ना.)– मातीची पणती, मातीचे निरांजन

**टवाल** (ना.)– टॉवेल, आंघोळीनंतर अंग पुसण्याचा जाडसर कापडाचा पंचा

**टाई** (ना.)– टाळी, दोन्ही तळहात एकमेकांवर मारल्याने होणारा आवाज

**टापरटापर** (क्रि.वि.)– सारखे बोलणे, वटवटणे

**टाय** (ना.)– टाळ, झांजेसारखे पण तिच्याहून लहान असे वाद्य

**टारू** (ना.)– टाळू, डोक्यावरील पुढचा भाग

**टाला** – ट्रॅक्टरची ट्रॉली

**टालमटुलम** (क्रि.वि.)– लोटपाट, कसेतरी काम उरकणे

**टिकन लगय** (क्रि.)– टिकावे लागते, तग धरावी लागते, धैर्य राखावे लागते

**टिकय** (क्रि.)– टिकतो, निभावतो, तग धरतो, टिकाव धरून राहतो

**टिकाव** –निभाव (भाववाचक नाम)– सांभाळ,

**टिकी** (क्रि.)– टिकली, तग धरला, टिकाव धरून राहिली

**टिक्का** (ना.)– टिळा, कपाळावर टिळा लावणे

**टिक्की** (ना.)– टिकली, लहान टिळा

**टिकोन** (क्रि.)– टिकाल, तग धरून राहाल

**टिक्यो** (क्रि.)– टिकला, तग धरला, टिकाव धरून राहिला, निभावून नेले

**टिचरी** (क्रि.)– तडा गेला, तडकली, भेग पडली, फट पडली

**टिचऱ्यो** – तडा गेला, शब्द बदलविला

**टिचाई** (क्रि.)– तडा गेला

**टिचेल** (वि.)– श्रीमंत, परिस्थितीने संपन्न, तडा गेलेला,

टिचलेला

**टिच्यो** (क्रि.)- तडा गेला, टिचला, तडकला

**टिपूस** (ना.)- टिप्पूस, थेंब

**टिमकी** (वि.)- लहान नगारा, एक चामड्याचे वाद्य

**टिल्लू** (वि.)- लहान, इवलासा, खुजा

**टुकणी** (क्रि.)- एखाद्या वस्तूच्या प्राप्तीकरिता तिष्ठत बसणे

**टुमना** (ना.)- तगादा, सारखे बोलत राहणे

**टुरा** (ना.)- मुलगा, लेक

**टुरी** (ना.)- मुलगी, कन्या, लेक

**टेकनी** (भा.ना.)- आधार, मदत, सहकार्य

**टेकय** (भा.ना.)- टेकतो, आधार घेतो, अंग टाकतो

**टेकळा** (ना.)- टेकळी, टेकडे, माथा, उंचवटा

**टेकी** (क्रि.)- अंग टाकले, आधार घेतला

**टेकेल** (क्रि.वि.)- टेकलेले, आधाराने बसलेले, भिडलेले, क्षितिजावर आभाळ पृथ्वीला टेकलेले दिसते

**टेकोन** (क्रि.वि.)- टेकाल, एकसारखे बसल्याने पाठ दुखेल तर भिंतीला टेकाल, आधार घ्याल, झोपाल, विश्रांती घ्याल

**टेक्यो** (ना.)- टेकला, आधार घेतला

**टेंपा** (ना.)- लाकडाची जाड व लहान काठी

**टेस** (ना.)- चव, स्वाद, आस्वाद, रुची, गोडी

**टेस** - गर्व, अहंकार

**टोक** (क्रि.)- हटक, अडव, रोख

**टोक** (ना.)- कडा, उंचीवरचा भाग

**टोकय** - हटकतो, ऐकवितो, अडवितो

**टोंगरा** (ना.)- गुडघा, टोंगळा

**टोंगराभर** - टोंगळाभर, टोंगळ्याएवढी, गुडघ्याएवढी

***

# ठ

**ठग** (ना.वि.)- ठक, फसविणारा, फसव्या, लबाड
**ठगणे** (क्रि.)- फसणे
**ठगाई** (क्रि.)- फसविली, बनविली, ठकविली
**ठगायो** (क्रि.)- फसविले, ठकविले
**ठगावनखे** (क्रि.वि)- फसवायला, ठकवायला
**ठगावय** (क्रि.)- फसवितो, ठकवितो
**ठगावू** (क्रि.वि)- फसवू, ठकवू
**ठगी** (क्रि.)- फसली, बनली
**ठगीन** (क्रि.)- फसलेत, ठकलेत, बनले
**ठगो** (क्रि.)- फसा, बना, ठका
**ठगोन** (क्रि.)- फसाल, ठकाल, फसाल
**ठग्यो** (क्रि.)- फसला, ठगला, फसला
**ठणकय** (क्रि.)- वेदना होतात, ठसठसते
**ठमकणे** (क्रि.)- नखऱ्याने चालणे, मिरविणे
**ठमकत** (क्रि.वि.)- मिरवत ठाकत
**ठमकनखे** (क्रि.वि)- मिरवायला, नखरे करायला, ठाकायला
**ठमकी** (वि.)- मिरवणारी, नखऱ्याने चालणारी, डौलात चालणारी, ठाकणारी
**ठमकी** (वि.)- ठेंगू स्त्री
**ठरी** (क्रि.)- ठरली, निश्चित झाली
**ठऱ्यो** (क्रि.)- ठरला, ठरले
**ठऱ्योतो** (क्रि.)- ठरले होते, लग्न ठरले होते
**ठसठस** (ना.)- ठणक, वेदना, पायात ठणक असणे
**ठसठसय** (क्रि.)- ठसठसते, आतून सारखे दुखते, जखम आतून सतत ठसठसते, ठणकते
**ठसठसी** - ठसठसली, जखम ठसठसली
**ठसठसी** (वि.)- डोळ्यांत भरणारी
**ठस्स** (क्रि.)- मंदबुद्धी असलेला, मंदबुद्धी असणे
**ठसाठस** (वि.)- ठासून, खूप
**ठाकणे** (क्रि.)- नट्टापट्टा करून उभे राहणे, मिरवणे
**ठाकनखे** (क्रि.वि.)- ठाकायला, मिरवायला
**ठाकय** (क्रि.)- मिरवतो, उभा राहतो
**ठाकी** (क्रि.)- मिरवली,

मिरवणारी, उभी राहिली
**ठाकुरकी** (वि.)- प्रतिष्ठा, मान, सन्मान, मोठेपणा
**ठिय्या** (ना.)- निश्चित जागा
**ठिसूर** (वि.)- ठिसूळ, लवकर मोडणारे, कमकुवत
**ठुणी** (वि.)- लाकडाचा लहान खांब
**ठुनी** (ना.)- आखूड डेळ, लाकडाचा लहान खांब
**ठुमकणखे** (क्रि.वि.)- ठेक्यावर नाचायला, मिरवायला, मिरवत मिरवत चालायला
**ठुमकय** (क्रि.)- नाचते, मिरवते, नखऱ्याने चालते
**ठुमकी** (ना.स्त्री.)- लहानगी मुलगी, नखऱ्यात नाचली
**ठुशी** (ना.स्त्री.)- सोन्याची पोत, माळ, स्त्रियांच्या गळ्यातील दागिना, लहान तुकडा
**ठुसका** (वि.पु.)- ठेंगणा, खुजा, कमी उंचीचा
**ठुसकी** (वि.स्त्री.)- लहान, ठेंगू, खुजी, बारीक
**ठुसको** (वि.)- ठेंगू, खुजा
**ठेंगणी** (वि.)- उंचीला कमी, खुजी
**ठेंगणो** (वि.)- उंचीला कमी, खुजा, ठेंगू
**ठेचय** (क्रि.)- ठेचतो, ठोकतो, अद्दल घडवितो, चेचतो
**ठेचा** (ना.)- खर्डा, मिरच्यांची चटणी, जिरवा, मुरवा
**ठेपन** (ना.)- अडकण, अडवण, पक्के वेष्टण, झाकण, पक्के झाकण, पक्के आच्छादन
**ठेपी** (ना.)- पक्के झाकण, बूच, पक्के वेष्टण
**ठेंबला** (ना.)- शेतात कापलेल्या गव्हाच्या झाडांची पेंडी
**ठेला** (ना.)- ट्रक, पानठेला, पानाचे दुकान
**ठेव** (ना.)- मांड, जमा, साठा, निधी
**ठेवनखे** (क्रि.वि.)- ठेवण्यासाठी
**ठेवन लगय** (क्रि.)- ठेवावे लागते
**ठेस** (ना.)- ठेच, ठोकर, अद्दल, पुढच्याला ठेच मागचा शहाणा
**ठोकठाकखे** (क्रि.)- मारून झोडून, ठोकून ठाकून, ठोकून ठाकून व्यवस्थित करणे
**ठोकय** (क्रि.)- मारतो, झोडतो
**ठोकरंय** (क्रि.)- ठोकरतो, झिडकारतो, तुच्छ लेखतो
**ठोकाठोकी** (ना.)- मारामारी, शारीरिक पातळीवरील संघर्ष

**ठोकी** (क्रि.)- मारली, पिटाई केली, झोडली

**ठोकून** (क्रि.वि.)- मारेल, मारणार, ठोकणार

**ठोक्यो** (क्रि.)- ठोकले, मारले, पिटाई केली

**ठोंबरा** (ना.)- पोळ्याच्या सणाला बैलांसाठी भिजवलेली ज्वारी कांडून व शिजवून तयार केलेला पदार्थ, पूर्वी दैन्यग्रस्त लोक भात म्हणून ठोंबरा खात

**ठोंब्या** (वि.)- कुचकामी, आळशी, निर्बुद्ध

**ठोसर** (वि.)- जाड

**ठोसऱ्या** (वि.)- एक शिवी

***

## ड

**डकरणे** (क्रि.)- जोरात ओरडणे, रागाने ओरडणे

**डकरय** (क्रि.पु.स्त्री.)- ओरडतो, जोराने ओरडतो

**डकरले** (क्रि.पु.स्त्री.)- ओरडून घे

**डकरी** (क्रि.स्त्री.)- ओरडली, जोराने ओरडली

**डकरोन** (क्रि.)- ओरडाल

**डकऱ्या** (वि.पु.)- जोरजोरात ओरडणारा, क्रूर

**डकऱ्यो** (क्रि.पु.)- ओरडला

**डकार** (ना.)- ढेकर, जास्त जेवल्याने पोटातील वायू वर आल्यावर मुखावाटे होणारा कर्कश आवाज

**डकेट** (वि.)- धैर्यवान, शक्तिमान, मजबूत यष्टी असलेला

**डंखा** (क्रि.वि.ना.)- डंका, दंश करणे, बडेजाव

**डग** (भा.ना.)- भीती, शंका, चालतानाचे दोन पायांतील अंतर, टांग

**डगमगय** (क्रि.)- डळमळतो, लटपटतो, घाबरतो, भितो

**डंगरा** (वि.ना.)- म्हातारा बैल, थकलेला, कमकुवत

**डग्ला, डग्लो** (वि.)- सैल, मोकळा

**डफळा** (ना.)- डफडे, डफ, एक चर्मवाद्य

**डबळा** (ना.)- रिकामे, कुचकामी लहान डबा

**डब्बी** (ना.)- लहान डबी

**डब्बा** (ना.)- डबा, जिन्नस ठेवण्याचे झाकणाचे उभट भांडे

**डर** (भा.ना.)- भीती, भय, दहशत,

**डरखे** - भीतीने, भीतीमुळे, घाबरून

**डरडरखे मरोन** (क्रि.)- घाबरून घाबरून मराल

**डरणखे** (क्रि.वि)- भ्यायला, घाबरायला

**डर दिखावय** (क्रि.)- भीती दाखवितो, घाबरवितो

**डरसे** (क्रि.वि.)- भीतीने, घाबरल्याने

**डरायी** (क्रि.)- घाबरली, भ्याली

**डरायो** (क्रि.पु.)- घाबरला, भिला, भीती दाखविली

**डरावणे** (क्रि.)- भीती दाखविणे, घाबरविणे

**डरावत** (क्रि.)- भीतात, घाबरतात

**डरावनखे** (क्रि.वि.)- भ्यायला, घाबरायला

**डरावय** (क्रि.)- घाबरतो, भीती दाखवितो, भितो

**डरावू** (क्रि.)- भीती दाखवू, घाबरवू

**डरावोन** (क्रि.)- घाबराल, भ्याल

**डरी** (क्रि.)- घाबरली, भ्याली

**डरीती** (क्रि.)- घाबरली होती, भ्याली होती

**डरीन** (क्रि.)- घाबरले, भ्याले

**डरो** (क्रि.)- घाबरा, त्याला तुम्ही घाबरा, मी नाही

**डरोन** (क्रि.)- घाबराल

**डर्‍यो** (क्रि.)- घाबरला

**डल** (वि.)- मंद बुद्धी, थंड, जड

**डल्ला** (ना.)- वधूची सासरी पाठवणी करताना विशिष्ट टोपलीत सोबत दिले जाणारे गोड पदार्थ

**डाखोरा** (वि.)- डावखोरा, डावरा

**डाखोरी** - डावखोरी, डावरी

**डाखोरो** (वि.)- डावरा, डावखुरा

**डांग** (ना.)- शाखा, फांदी, झाडाची फांदी

**डांगट** (वि.)- कठीण, अवघड

**डागडुगी** (ना.)- डागडुजी, दुरुस्ती

**डाफरनखे** (क्रि.वि.)- जोरात ओरडायला, आक्रोशायला

**डाफरय** (क्रि.)- ओरडतो, आक्रोश करतो

**डाफरी** (क्रि.)- ओरडली, आक्रोशली, कर्कश बोलली

**डाबकडुबक** (क्रि.वि.)- खालीवर शरीर हलवत चालणे. उदा. उंटाचे चालणे डाबकडुबक असते.

**डाबडुबली** (ना.)- एक खेळ, सर्वजण झाडावरून एकमेकांना चेंडू मारण्याचा/फेकण्याचा खेळ

**डाबर** (ना.वि.)- खोलगट भाग

**डावो** (वि.)- डावा, डावा हात

**डावो** (वि.)- हलका, कमी प्रतीचा, कमी दर्जाचा, हीन

**डावो जेवनो** (वि.)- डावा उजवा, उणा अधिक, कमी-जास्त

**डिकायखे** (क्रि.वि.)- चिपकवून, लागून

**डिकायी** (क्रि.)- चिपकविली, डिकवली

**डिकायो** (क्रि.)- चिपकविला, डिकविला

**डिकाव** (क्रि.)- चिपकव, डिकव

**डिकावने** (क्रि.)- डिकवणे, डिंकवणे

**डिकावनखे** (क्रि.वि.)- चिपकविण्यासाठी, डिकविण्यासाठी

**डिकावय** (क्रि.)- चिपकवितो, डिंकवितो

**डिग** (ना.)- गोंद, डिंक चिकट पदार्थ

**डिंग** (ना.)- मिरविणे

**डिंगर** (वि.)- वयाने वाढलेली अविवाहित मुलगी

**डिंगरू** - लहानसा

**डिग्गर** (ना.)- कौलाचा तुकडा, मुली लंगडीचा खेळ खेळताना घटात वापरतात

**डुबतो** (वि.) **बखत** (ना.)- बुडता काळ, वाईट काळ

**डुबनखे** (क्रि.वि.)- बुडण्यासाठी

**डुबने** (क्रि.)- बुडणे, तोटा येणे

**डुबय** (क्रि.)- बुडतो, तोट्यात येतो

**डुबी** (क्रि.)- बुडाली, तोट्यात आली, बँक बुडाली

**डुबीन** (क्रि.)- बुडालेत, बुडाल्यात, तोट्यात आलेत

**डुबोन** (क्रि.)- बुडाल

**डुब्यो** (क्रि.)- बुडाला, फसला, आर्थिक विवंचनेत फसला

**डुमडुम** - नगाऱ्याचा आवाज, वाद्याचा आवाज

**डुहारतात** (क्रि.)– लाटतात, लुटतात, घाईने नेतात

**डुहारणे** (क्रि.)– लुटणे, लंपास करणे

**डुहारय** (क्रि.)– लाटतो, लुटतो, लंपास करतो

**डूल** (ना.)– मुलींच्या कानातील एक दागिना

**डेग** (ना.)– समुदायाच्या स्वयंपाकात भात शिजविण्याचा हंडा

**डेबरा** (वि.)– ढेरी, मोठे पोट

**डेबरी** (वि.)– मोठ्या पोटाची

**डेबऱ्या** (वि.)– मोठ्या पोटाचा

**डोक्सा** (ना.)– डोके, कपाळ, मेंदू, मुंडके

**डोक्साने** – डोक्यात

**डोक्सासे** –डोक्याने, बुद्धी वापरून

**डोलय** (क्रि.)– डुलतो, डोलतो, हलतो, दोलायमान होतो

**डोस्का** (ना.)– डोके, मुंडके, मेंदू, बुद्धी

**डौरा** (ना.)– डवरा, लहान वखर, पिकांना डौऱ्याने कोळपणे, पिकांच्या दोन सरांमधील मोकळ्या जमिनीतील गवत काढून भुसभुशीत करण्याचे एक साधन

**डौरादुंडा** (ना.)– शेतीची औजारे, डवऱ्यापेक्षा दुंड्याचा आकार किंचित मोठा असतो

***

## ढ

**ढ** (वि.)– मूर्ख, मंद बुद्धी असलेला

**ढकल** (क्रि.)– लोट, पुढे लोट, धक्का दे

**ढकलणे** (क्रि.)– लोटणे, धक्का देणे, सरकविणे

**ढकली** (क्रि.)– लोटली, धक्का दिला, सरकविली

**ढकलेश्वर** (वि.)– अगडबंब, कुचकामी, खूप लठ्ठ माणूस

**ढंग** (भाववाचक नाम)– वर्तन, चाळ, चेष्टा

**ढंगरेल** (वि.)– नखरेल, चेष्टेखोर, लबाड, खोटा

**ढंगऱ्या** (वि.)– नखरे, नखरेल, खोटे, खोटेपणा

**ढमकन** (वि.)– जोराचा आवाज, गुदद्वारातून अपानवायू वेगाने सुटल्याने होणारा आवाज

**ढमकी** (वि.)– अमकी, कोणी स्त्री या अर्थी

**ढमको** (वि.)- अमका, कोणी माणूस या अर्थी

**ढगाळ** (वि.)- ढगाळलेले आभाळ

**ढणढण** (वि.)- रिकामे, रिते, रिक्त, दारिद्र्य

**ढब** (भाववाचक नाम)- पद्धत, रीत, ऐट

**ढबक** - एक बेसूर आवाज

**ढबढब** (वि.)- जोराचा आवाज, धबधब आवाज

**ढबढब** (वि.)- अव्यवस्था, अस्ताव्यस्त

**ढब्बू** (ना.)- एक तांब्याचे जुने नाणे

**ढब्बू** (वि.)- मूर्ख, अक्कलशून्य

**ढमक्या** (वि.)- तृतीयपंथी, नपुंसक, षंढ, हिजडा

**ढरकन** - जोराचा आवाज, गुदद्वारातून होणारा आवाज

**ढराढर** - मोठ्याने आवाज काढणे

**ढसाढसा** (क्रि.वि.)- जोरजोरात, ओक्साबोक्शी, ढसाढसा रडणे

**ढसाळ** (वि.)- ढिसाळ, लवकर मोडणारा, लवकर पडणारा, तकलादू

**ढळय** (क्रि.)- ढळतो, जागा सोडतो

**ढळीत** (क्रि.)- ढळ्यो, ढळली, सरकली, गेली

**ढांग** (क्रि.वि.)- शेवटी, अखेरीस, सर्वांत मागे

**ढाय** (ना.)- उतार, उतरण, ऱ्हास, वळण, सवय, वृत्ती

**ढास** (ना.)- कोरड्या खोकल्याची उबळ

**ढासळय** (क्रि.)- कोसळतो, कोलमडतो, पडतो

**ढासळ्यो** (क्रि.)- कोसळला, आदळला, आपटला, पडला, कोलमडला

**ढिग** (ना.)- गंज, रास, थप्पी

**ढिगपर** - ढिगावर, गंजावर

**ढिगावने** (क्रि.)- विशिष्ट आकाराने सारवणे, विशेषत: खेड्यात मातीचे घर विशिष्ट आकाराच्या, रेषांनी सारवतात. त्यात कलात्मकता दिसून येते.

**ढिगी** (ना.)- कोर, सारवताना कडेच्या रेषा

**ढिगोला** (ना.)- ढग, मेघ

**ढिंडा** (ना.)- तुकडा, गोळा

**ढिंडोरा, ढिंढोरा** (भा.ना.)- बदनामी, दुष्कीर्ती, गाजावाजा

**ढिंढोरा** - गाजावाजा

**ढिंढोरा मचावय** (क्रि.)-

गाजावाजाने मिरवितो

**ढिम्म** (वि/क्रि.)– अति शांत, सुस्त, निपचित

**ढिल** (वि.)– मोकळे, मोकळीक, सैल, स्वैर

**ढिल्लमढाल्लम** (वि.)– असातसा, सैल, मोकळा

**ढिला** (ना.वि.)– सैल, कुचकामी, नामर्द माणूस

**ढिलाई** (भा.ना.)– मोकळीक, परवानगी, सैल

**ढिली** (वि.)– बेजबाबदार, सैल, मोकळी, कुचकामी, निरुपयोगी

**ढिलो** (वि.)– षंढ, नपुंसक, नामर्द माणूस, पराक्रमहीन, कुचकामी सैल

**ढिसाळ** (वि.)– लवकर मोडणारा, कच्चा, तकलादू, टिकाऊ नसलेला

**ढील** (वि.)– सैल, मोकळीक, स्वैर

**ढुकणे** (क्रि.)– चोरून डोकावणे

**ढुकय** (क्रि.)– चोरून डोकावून पाहणे, ढुंकतो, डोकावतो

**ढुंगण** (ना.)– ढुंगाण, गुदद्वार

**ढुंडो** (क्रि.)– शोधा, पाहा, शोधाशोध करा

**ढुमढुम** (वि.)– वाजंत्रीचा आवाज, टिमकी, ढुमकं

**ढुसकी** (क्रि.वि.)– तडाखा, रट्टा, जोराने लोटणे

**ढुस** (वि.)– आडदांड, अविचारी, अतिशय

**ढुसा** (ना.)– चादर, गरम चादर, धक्का, गुद्दा, ठोसा, मुठीचा प्रहार

**ढुसी** (क्रि.)– लोटली, मुठीचा प्रहार, प्राशिली, खाऊन टाकली

**ढूक** (क्रि.)– वाक, डोकाव, चोरून पहा

**ढुक्के** (क्रि.वि.)– डोकावून, हळूच चोरून डोकावून

**ढेकर** – पोटातून हवा वर येवून तोंडातून होणारा आवाज

**ढेकला/ढेकूळ** (ना.)– ढेक, ढेकूळ, गोळा, मातीचा गोळा

**ढेप्या** (वि.)– मंद बुद्धी, एका जागी स्थिरावलेला, निरुपयोगी

**ढेबर** (वि.)– मोठा, मोठ्या पोटाचा, पोट सुटलेला

**ढेमसा** (ना.)– एक भाजीचे फळ

**ढेमसी** (ना.)– आखीव रेखीव नसलेली, अनिर्बंध शरीर असलेली, एक शिवी

**ढेमस्या** (वि.)– विद्रूप, आखीव रेखीव नसलेला, एक शिवी

**ढेर** (ना.)– रास, ढीग, ढिगारा, मरून पडणे

**ढेरी** (ना.)– मोठे पोट, सुटलेले पोट, अवाढव्य पोट

**ढोंगधतुरा** (वि.)– खोटेपणा, लबाडी, बनवाबनवी

**ढोबर** (ना.)– विष्ठा उचलण्याचा टिनाचा लहान पत्रा

**ढोमा** (वि.)– वयाने वाढलेला, पण निर्बुद्ध, अक्कलशून्य

**ढोमा कांदा** – वयाने वाढलेला पण बुद्धिशून्य

**ढोसय** – यथेच्छ खातो, बेसुमार खातो

**ढोर** – पशू, जनावर

**ढोरकी** – गुरे राखणारा, गुराखी

**ढोल** – मोठे ढोलके, एक वाद्य

**ढोलगा** – ढोल, नगारा, मोठा ढोल, एक वाद्य

**ढोल्या** – मोठ्या पोटाचा, लठ्ठ, जाड, अक्कलशून्य, अगडबंब शरीराचा

**ढोस** – पोट फुगेपर्यंत खा, बिनधास्त खा

**ढोसकय** (क्रि.)– खात सुटतो, गटगट खातो, पितो

**ढोसकाढोसकी** (क्रि.वि.)– खुपसाखुपशी, खुपसतो, जीवघेणा शारीरिक संघर्ष

**ढोसणे** (क्रि.)– यथेच्छ खाणे

**ढोसणे** – खुपसणे, पोटात चाकू खुसणे

**ढोसय** (क्रि.)– अति खात सुटतो

**ढोसा** (ना.)– ठोसा, गुद्दा

**ढोसी** (क्रि.)– अति खाल्ले, त्याने अति खाल्ले

**ढोसो** (क्रि.)– यथेच्छ खा

***

# त

**त – तर** (उभयान्वयी अव्यय)

**तक** (क्रि.वि)– संयम, दम, टिकाव, तग, पर्यंत

**तकतक** (क्रि.वि.)– चकाचक, एकसारखा चिंताग्रस्त होऊन पाहतो

**तकतक करय** (क्रि.)– अस्वस्थ होतो, चिंताग्रस्त होतो

**तकदीर** (ना.)– नशीब, दैव, प्रारब्ध, प्राक्तन

**तक्या** (ना.)– मोठी उशी, तकिया

**तकरार** (ना.)– तक्रार, फिर्याद, वाद

**तकलादू** (वि.)– नकली, कच्चा, हलका, तात्पुरता, टिकाऊ नसलेला

**तखत** (ना.)– तख्त, सिंहासन

**तगमग** (क्रि.वि.)- घाबरणे, अस्वस्थता

**तंगळी** (ना.)- तंगडी, टांग, पायाचा निंदाव्यंजक शब्द

**तगळो** (वि.)- तगडा, लठ्ठ, धिप्पाड, बलवान

**तज** (क्रि.)- त्याग कर, सोड

**तजत** (क्रि.)- सोडतात, त्याग करतात

**तजने** (क्रि.)- त्यजणे, त्याग करणे, सोडणे

**तजय** (क्रि.)- त्याग करतो, सोडतो, त्यजतो

**तजी** (क्रि.)- त्याग केला, सोडले

**तजीन** (क्रि.)(अ.व.)- त्याग केला, सोडले

**तज्यो** (क्रि.)- सोडले, त्याग केला

**तठ** (वि.)- ताठ, ताठर, टणक, सरळ, उर्मट, न वाकणारा

**तंडणे** (क्रि.)- भांडणे, वाद करणे, संघर्ष करणे

**तंडय** (क्रि.)- भांडतो, वाद करतो

**तंडी** (क्रि.)(स्त्री.)- भांडली, वाद घातला

**तंड्यो** (क्रि.)(पु.)- भांडला, वाद घातला

**तनतन, तनंतनं** (क्रि.वि.)- आदळ आपट, भांडण, रागाने, त्वेषाने, मग्रुरीने

**तणतण करय** (क्रि.)- संताप व्यक्त करणे

**तन** (ना.)- गवत, तृण, देह, शरीर

**तनाना** (भाववाचक नाम.)- राग, रोष, क्रोध

**तन्नावणे** (क्रि.)- अस्ताव्यस्त झोपणे, बिनधास्त झोपणे

**तप** (ना.)- रागव, ताप, तपश्चर्या

**तपन** (ना.)- ऊन, ऊन्ह, सूर्यप्रकाश

**तपनखे** (क्रि.वि.)- तापायला, गरम व्हायला

**तपनने** - उन्हात

**तपय** (क्रि.)- तापतो, गरम होतो, क्रोधिष्ट होतो

**तपातपी** - गरमागरमी, एकमेकांवर रागावणे

**तपी** (क्रि.)- तापली, गरम झाली, रागावली

**तप्यो** (क्रि.)- तापला, रागावला

**तबकळी** (ना.)- लहान तबक, ताटली

**तबलग** (क्रि.वि.)- तोपर्यंत

**तभे** (क्रि.वि.)- तेव्हा, त्या वेळी, त्या काळी

**तभेकी** (क्रि.वि.)- तेव्हाची, त्या वेळची, त्या काळची

**तभेके** (क्रि.वि.)- तेव्हाचे, त्या वेळचे, त्या काळचे

**तय** - तळ, तळपाय

**तयतय** (क्रि.वि.)- तडतड, रागाने तडतडत गेला

**तयतयाट** (भा.ना.)- संतापाचा अतिरेक, तडतडाट, चळफळाट, शाप

**तयनात** - तैनात

**तरकन** (क्रि.वि.)- पटकन, त्वरित, अगदी लवकर, झटपट, तडकाफडकी

**तरंगणे** (क्रि.)- वर राहणे, पाण्यावर राहणे, पोहणे, तरणे

**तरंगय** (क्रि.)- तरंगतो, वर राहतो, पोहतो

**तरंगी** (क्रि.)- तरंगली, वर राहिली

**तरंगोन** (क्रि.)- तरंगाल, वर राहाला, पोहाल,

**तरतर** (क्रि.वि.)- भरभर, वेगाने, रागाने तरातरा निघून गेला

**तरतरणे** (क्रि.)- फुगणे, रागात येणे, रागाने जाणे, उत्साहित होणे

**तरतरय** (क्रि.वि.)- वेगाने चालतो, चपळाईने हालचाली करतो

**तरनखे** (क्रि.वि.)- तरायला, तरंगायला, पोहायला, वर राहायला

**तरने** (क्रि.)- तरंगणे, वर राहणे, वाचणे, मरता मरता वाचला

**तरबूज** (ना.)- टरबूज, कलिंगड, आकाराने मोठे असे फळ

**तरबोन** (क्रि.)- तरणार, तरूया

**तरय** (क्रि.)- तरतो, तरंगतो, वाचतो, सहीसलामत सुटतो

**तरसय** (क्रि.)- तरसतो, त्रासतो, जीव तुटतो, थकतो, झुरतो, आतुर होतो, प्रतीक्षा करतो

**तरा** - तऱ्हा, रीत, पद्धत

**तरातरा** (क्रि.वि.)- वेगाने, चपळाईने, रागाने, तरतरा

**तरायी** (क्रि.)- तरली, वाचविली

**तरावय** (क्रि.)- तारतो, वाचवितो, मरू देत नाही, बुडू देत नाही

**तरी** (उ.अ.) - तथापि

**तरी** (क्रि.)(उ.अ.)- तरंगली, तरली, तथापि

**तर्री** (ना.)- भाजीतील तेलाचा तवंग, भाजीतील तेलाचा पातळ थर

**तरोटा** (ना.)– टाकळा, तरवटा, एक वनस्पती

**तरोन** (क्रि.)– तराल, तरंगाल, वाचाल, जिवंत राहणार

**तऱ्यो** (क्रि.)– तरला, जिवंत राहिला

**तलखी** (ना.)– उष्मा, गरमी, उष्मतेची तीव्रता, उकाडा

**तल्लफ** (ना.)– हुक्की, चटक, प्रबळेच्छा, सवय, व्यसन

**तवली** (ना.)– तपेली, एक भांडे

**तळस** (ना.)– तरस, एक वन्य पशू

**तळश्या** (ना.)– तरस, एक मांसभक्षक वन्य पशू

**तळो** (ना.)– तडव, अंथरण्याचे विस्तारशील सुती जाड कापड

**तागळा** (ना.)– तराजू, तागडी, काटा, वजन करण्याचे एक साधन

**ताजी** – जाड, लठ्ठ, जाडजूड, स्थूल

**ताजातुजो** – टवटवीत, नवीन, प्रफुल्ल, ताजातवाना

**ताटी** (ना.)– झडप, कामट्यांच्या चौकटीचे आच्छादन

**ताटीने** – ताटात

**ताठ** – टणक, उर्मट, अहंकारी

**ताठने** (क्रि.)– फुगणे, गाई–म्हशी इ. दोहल्या नाहीत तर त्यांचे आचळ ताठतात.

**ताठय** (क्रि.)– फुगतो, गर्वाने फुगतो, उन्मत्त होतो

**ताठर** (वि.)– उर्मट, अहंकारी

**ताठा** (वि.)– उर्मटपणा, अहंकार, गर्व

**तान** (ना.)– ओझे, ताण, भार, गाण्यातील आलाप, तहान, तृष्णा

**तानय** (क्रि.)– तानतो, ओढतो, ताणून धरतो, अतिरेक करतो

**तानी** (वि.)– तान्ही, लहान बाळ, ताणूली, ओढून धरली

**तानो** (वि.)– तान्हा, लहान बाळ, लहानगा, ताणा, ओढा, ताणून धरा

**तान्यो** (क्रि.)– ताणले, ओढून धरले

**तांबळो** (वि.)– तांबडा, लाल

**ताबाने** – ताब्यात, नियंत्रणात, अमलात, अधिपत्यात

**तांबेको** (नामसाधित विशेषण)– तांब्याचे, तांबे या विशिष्ट धातूचे

**तांबो** (ना.)– तांबे, ताम्र, एक धातू

**तायनी** (क्रि.)– तहानली, तहान

लागली, तृषार्त

**तायन्यो** (क्रि.)– तहानला, तहान लागली, तृषार्त, लहानगा (वि.) बाळ

**तारखे** – तारून, उद्धार करून, ताराला, ताराला बांध

**तारेतारे** (क्रि.वि.)– हळूहळू, सावकाश, यथावकाश, सवडीनुसार, वेळ मिळेल तेव्हा

**ताल** – लक्षण, वागणूक

**तालगी** (ना.)– लहान बाळाची वाकळ, लहान गोधडी

**तालतंबोरा** – वागणूक, स्वभाव, मानसिकता

**तालपर आयो** (क्रि.)– सरळ झाला, सरळ वागतो, सुधारला, व्यवस्थित गातो

**तावतावसे** (क्रि.वि.)– रागारागाने, संतापाने, क्रोधाने

**तावनी** (ना.)– लहान मडके, मोठे तोंड असलेले दूध तापविण्याचे मातीचे गोलाकार भांडे

**तावा** (ना.)– तवा, पोळ्या किंवा भाकरी भाजण्याचे मातीचे / लोखंडाचे पसरट भांडे

**तास** (ना.)– शेतातल्या पिकाची ओळ, रांग, अडीच घटिकांचा किंवा साठ मिनिटांचा कालावधी

**ताहान** (ना.)– तहान, तृष्णा

**तिखाळणे** (क्रि.)– विचारणे

**तिखाळी** (क्रि.)– विचारले, महत्त्व दिले

**तिखाळ्यो** (क्रि.)– विचारले

**तितंबा** (क्रि.वि.)– फजिती, ओढाताण, अधिकउणे, बिघडणे

**तितरबितर, तितरभितर** (क्रि.वि)– इकडे तिकडे विखुरणे, अस्ताव्यस्त

**तितुर** (ना.)– तितर, कवडा नावाचा पक्षी, एक कबऱ्या रंगाचा पक्षी

**तिफण** (ना.)– एक पेरणीचे साधन

**तिफण्या** (वि.)– शेतात पेरणीची तिफण हाकणारा

**तिरगीमिरगी** (ना.)– तिरीमिरी, भांडण, बाचाबाची, मारपीट

**तिरपय** (क्रि.)– दिवस उजाडतो, प्रकाशतो

**तिरपी** (वि.)– वाकडी, तिरकस

**तिरपो** (वि.)– तिरपा, वाकडा

**तिरपोतारपो** (वि.)– तिरपातारपा, वाकडातिकडा

**तिरप्यो** (क्रि.)– दिवस उजाडला, उजाडले, सूर्योदय झाला

**तिरसट** (वि.)– वाकड्या

स्वभावाचा, तुसडा, चिडका
**तिरीमिरी** - वाद, बाचाबाची,
**तिर्सट** - तिर्कस, विक्षिप्त, तुसडा, वाकड्या स्वभावाचा
**तिलमिलायी** (क्रि.)- तळमळली, व्याकुळली, दु:खाने व्यथित झाली
**तिल्ली** (ना.)- तीळ, एक गळिताचे धान्य, शरीरावरील लहान डाग
**तिवा** (ना.)- तिपाई, तिवई, खळ्यावर उफणण्यासाठी वापरली जाणारी तिपाई
**तिसअक्रात** (ना.)- तीळसंक्रांत, मकरसंक्रांत, हिंदूंचा एक सण, वाईट अर्थाने एक आपत्ती
**तिसरपानी** (वि.)- तिसऱ्या वेळी लग्न केलेली
**तिसरपान्या** (वि.)- तिसऱ्या वेळी लग्न केलेला
**तिसरे** (वि.)- अनुक्रमे तिसरे, दूरचे, लांबचे, परके
**तिसरेसे** (वि.)- तिसऱ्यांदा, तिसऱ्या वेळी, दुसऱ्याच्या हाताने, परक्याच्या हाताने
**तिसरो** (वि.)- तिसरा, परका, दूरचा, परका
**तीथ** (ना.)- तिथी, मुहूर्त, दिवस
**तीनइसा** (वि.)- साठ, मोजण्याची प्राचीन पद्धत
**तीनतेरा** (वि.)- वाटोळे, सत्यानाश, काम नासणे (क्रि.)
**तीन तेरा बजीन** (क्रि.)- सत्यानाश झाला, धिंगाणा झाला, वाटोळे झाले
**तुटक तुटक** (क्रि.वि.)- अडखडत, खंडित, कमी, कधी तुटक तुटक पाऊस येतो
**तुटय** (क्रि.)- तुटतो, मोडतो, दूर जातो, दुरावा निर्माण होतो, खंडित होतो
**तुट्टी** (ना.)- तुरटी, एक क्षारयुक्त पदार्थ
**तुट्यो** (क्रि.)- तुटला, मोडला, खंड पडला, दुरावा झाला
**तूत** - तू तर, तू तर असा मुलगा आहेस...
**तुत्या** (ना.)- पिकात डवरणी सुरू असताना डवऱ्याच्या पात्याची माती काढण्याचे काठीला जोडलेले लोखंडाचे लहान यंत्र
**तुने** (स.)- तू
**तुफान** (ना.)- बेसुमार, जोराने, वादळ, भयंकर
**तुम** (स.)- तुम्ही
**तुमखे** (स.)- तुम्हाला, आपणास
**तुमततुम** (स.)- तुम्ही तर तुम्ही

**तुमने** (स.)- तुम्ही, आपण
**तुमपर** (स.)- तुमच्यावर, आपल्यावर, तुमच्यासारखा
**तुमाखे** (स.)- तुम्हाला, आपणास
**तुमारी** (स.)- तुमची, जवळची
**तुमारे** (स.)- तुमचे, जवळचे, निकटवर्ती
**तुम्हारी** (स.)- तुमची, निकटवर्ती
**तुम्हारे** (स.)- तुमचे, जवळचे, निकटवर्ती
**तुम्हारेवाली** (स.)- तुमचा, जवळचा
**तुम्हारेवालो** (स.)- तुमचा, जवळचा
**तुयशी** (ना.)- तुळस, तुळशीचे झाड
**तुरा** (ना.)- टोपीला लावलेला अलंकार
**तुऱ्हाटी** (ना.)- तुरीचे वाळलेले झाड
**तुरी** (ना.)- तूर, एक धान्य
**तेरस** (ना.)- त्रयोदशी, हिंदू महिन्यांतील कृष्ण/शुक्ल पक्षातील तेरावा दिवस
**तेल चढावणे** (ना.)- तेल चढविणे, अर्थात लग्नातला एक विधी
**तोखे** (स.)- तुला
**तोंडपर** (ना.शब्दयोगी)- तोंडावर, चेहऱ्यावर
**तोंडभर** (वि.)- मनापासून, आनंदाने, भरपूर, तोंडात बसेल तेवढा, तोंडात बसेल तेवढाच घास घे
**तोतरो** - चाचरा, अडखळत बोलणारा
**तोबळा** (ना.)- वाईट अर्थाने, तोंड, थोबाड
**तोरा** (भा.ना.)- डौल, रुबाब, दिमाख, ऐट
**तोरी** (स.)- तुझी
**तोरीमरी** (स.)- तुझी माझी, तुझी माझी गोष्ट आपल्यातच ठेव
**तोरे** (स.)- तुझे, तुझ्या
**तोरेखे** (स.)- तुला
**तोरेपर** (स.)- तुझ्यावर
**तोरे पर गयो** (स.श.क्रि.)- तुझ्यावर गेला, तुझ्यासारखा झाला
**तोरेसंग** - तुझ्यासोबत
**तोरेसे** (स.)- तुझ्याकडून, तुझ्याने
**तोरो** (स.)- तुझा
**तोरोच** (स.)- तुझेच
**तोरोच तोरो** (स.)- तुझेच तुझे, सर्व तुझे
**तोरो तू** (स.)- तुझे तू

**तोरो तोरे संग** (स.)- तुझे तुझ्यासोबत

**तोरोमरो** (वि.)- तुझे माझे, वादावादी

**तोलय** (क्रि.)- मोजतो, पेलते, सांभाळतो

**तोळ** (क्रि.)- तोड, तोडून टाक, मोडून टाक

**तीळ** (क्रि.वि.)- बरोबरी, तुलना

**तोळली** (ना.)- तोरडी, स्त्रियांच्या पायातील चांदीचा दागिना

**तोळा** (ना.)- स्त्रियांच्या पायातील चांदीचा दागिना, तोडा, एक वजन, १२ मासे किंवा १६ गुंजा

**तोळातोळी** (क्रि.वि.)- तोडातोडी, मोडमाड, उद्ध्वस्तता

**तोळामासा** - अधिक उणे, अतिशय नाजूक, प्रकृती तोळामासा होणे

**तोळी** (वि.)- तोडली, मोडली, नष्ट केली, मोडीत काढली

**तोळे** (ना.)- स्त्रियांच्या पायातील चांदीचे दागिने

**तोळो** (क्रि.)- तोडा, मोडा, नष्ट करा

**तोळोन** (क्रि.)- तोडाल, मोडोला, नष्ट कराल

**तोळोनखे** (क्रि.)- तोडायला, मोडायला, नष्ट करायला

**तोळ्यो** (क्रि.)- तोडले, मोडले

**त्यजी, त्येज्यो** (क्रि.)- सोडले, त्याग केला, अन्नपाणी सोडले

***

# थ

**थकतो पायरा** - वृद्धापकाळ, म्हातारपण, थकता काळ

**थकय** (क्रि.)- थकतो, दमतो

**थकी** - थकली, दमली

**थकोन** (क्रि.)- थकाल, दमाल

**थकोभागो** (वि.)- थकलाभागला, दमलेला, शक्तिक्षीण झालेला

**थक्यभाग्यो** (वि.)- थकलेला, खूप दमलेला

**थट्ट** (क्रि.वि.)- एकसारखा, एकाच जागी, एकटक, एकटक पाहतो

**थंडायी** (क्रि.)- थंडावली, थंड झाली, दमली, थकली, भागली

**थंडायो** (क्रि.)- थंडावला, थकला, विरला, दमला

**थंडी** (ना. क्रि.)- थंड, थकली, विरली, जिरली

**थंडीसे** - थंडीने, थंडीमुळे
**थंडो** (वि.)- थंड, गार, कुचकामी माणूस, मंद, सुस्त
**थयथय** (क्रि.वि.)- मौजेने ओरडणे, संतापाचे एक चिन्ह, जल्लोष करणे
**थर** (ना.)- स्तर, पापुद्रा, पडदा
**थरथरय** (क्रि.)- कंप सुटतो, घाबरतो, भितो, भीतीने थरकाप होतो
**थरथरी** (क्रि.)- कंप सुटला, घाबरली, भीतीने थरथर कापू लागली, सुचेनाशी झालेली
**थरथऱ्यो** (क्रि.)- थरथरला, घाबरला, कंप सुटला, भीतीने थरथर कापू लागला
**थर्र** (ना.)- एकदम शहारे येणे, एक विशिष्ट आवाज
**थर्रकापय** (क्रि.)- थरकापतो, खूप घाबरतो, कंप सुटतो, भीतीने डळमळतो, कापरे भरते
**थर्रर** (क्रि.)- भीती, घाबरणे
**थर्रायी** (क्रि.)- घाबरली, भीती वाटली
**थर्रायो** (क्रि.)- घाबरला, भीतीने कंप सुटला, डळमळला
**थर्रावय** (क्रि.)- घाबरतो, घाबरगुंडी उडते, भीतीने कंप सुटतो
**थळकस** (क्रि.)- येऊन पोचतो, दाखल होतो, धडकतो
**थळकी** (क्रि.)- येऊन पोचली
**थळक्यो** (क्रि.)- येऊन पोचला, येऊन थडकला
**थाट** (ना.)- दिखाऊपणा, डौल, ऐश्वर्य, ऐश्वर्या, बडेजाव
**थान** (ना.)- स्तन, वक्ष, उरोज
**थान** (ना.)- ठाण, कापडाचा गठ्ठा
**थाटमाट** - डामडौल, दिखाऊपणा
**थाटी** - थाटली, मिरवली
**थाप** - कर, हाताने थापणे, गाई-म्हशीच्या शेणाची हाताने थापून गोवरी करणे
**थाप** - तळहाताचा प्रहार, चापटी, थापड
**थाप** - खोटे, लबाडी, बनवाबनवी
**थापटणे** - थोपटणे, बाळाला झोप येण्यासाठी थोपटणे
**थापळ** - चापट, थापड, रट्टा
**थापाळ्या** (वि.)- थापाड्या, लबाड, खोटे बोलणारा
**थांबत** (क्रि.)- थांबतात, थबकतात
**थांबनखे** (क्रि.वि.)- थांबायला
**थांबी** (क्रि.)- थांबली, बंद

झाली, विसावली, विश्रांती घेतली

**थांबीती** (क्रि.)- थांबली होती, विसावली होती

**थांबीन** (क्रि.)- थांबले, विश्रांती घेतली

**थांबो** (क्रि.)- थांबा, विश्रांती घ्या

**थांबोन** (क्रि.)- थांबाल, विश्रांती घ्याल

**थांबोनत** (क्रि.वि.)- थांबाल तर

**थांब्यो** (क्रि.)- थांबला

**थांब्योतो** (क्रि.)- थांबला होता

**थारणे** (क्रि.)- स्थिरावणे, थांबणे

**थारय** (क्रि.)- स्थिरावते, थांबतो

**थारा** (क्रि.वि.)- आधार, आश्रय

**थाळी** (क्रि.वि.)- उभी, थांबलेली

**थाळी** (वि.)- कच्ची, न शिजलेली, भाजी कच्ची राहिली

**थाळी की थाळी** - उभीची उभी

**थाळे** - कच्चे, न शिजलेले

**थाळे** (वि.)- उभे

**थाळे के थाळे** - उभेचे उभे

**थाळेसे** - उभ्याने

**थाळेथाळे** - उभ्या उभ्या, उभ्या उभ्या येऊन जा

**थाळो** (वि.)- कच्चा

**थाळो** (वि.)- उभा

**थाळोपीक** (ना.)- उभे पीक, उभ्या पिकाची निगा राखतात

**थिर** (क्रि.वि.)- स्थिर, निश्चल, स्तब्ध, एका जागी असलेला

**थिरकय** (क्रि.)- डौलात चालतो, थाटाने चालतो

**थीर** - निश्चल

**थुटूक** - लहान तुकडा, विडीचा तुकडा

**थुत्तर** - तोंड, चेहरा, थोबाड, वाईट अर्थाने वापरतात

**थेगळ** - ठिगळ, जोड, जोडलेला तुकडा

**थेट** - सरळ, न थांबता, एका दमात

**थेटरा** - खाण्याचे गोड पदार्थ, गुळाच्या पाण्यात भिजवलेल्या गव्हाच्या पिठाचे नागमोडी आकाराचे तेलातून तळलेले लांबट गोळे, कलालांच्या लग्नातील एक गोड पदार्थ

**थेर** - नखरे, चाळे

**थेराथेरी** (वि.)- नखरेलपणा, दिखाऊपणा, खोटेपणा

**थोटा** (वि.)- हात तुटलेला

**थोटी** (वि.)- छोटी, लहान, आखूड

**थोटी** (वि.)- हात तुटलेली

**थोटो** (वि.)– थोटा, लहान
**थोटो** (वि.)– हात तुटलेला
**थोबाळ** (क्रि.)– मार, झोड, पिटाई कर
**थोबाळ** (ना.)– तोंड, चेहरा, गाल, थोबाड, एक शिवीचा भाग
**थोळी** (वि.)– थोडी, जराशी, अल्पशी
**थोळे** (वि.)– थोडे
**थोळेसे** (वि.)– थोड्याने, जराशाने
**थोळो** (वि.)– थोडा, जरा, अल्प
**थोळोसो** (वि.)– थोडासा, जरासा, अल्पसा
**थोळोसोक** (वि.)– थोडासा, जरासा, कमीत कमी

***

# द

**दई** (ना.)– दही, विरजलेले दूध
**दईत** (ना.)– दैत्य, राक्षस
**दगळती** (ना.)चिनी मातीचे लहान भांडे
**दगळी** (ना.)– दगडाचा, पाषाणाचा
**दगळी खलबत्ता** (ना.)– दगडी खलबत्ता, दगडापासून बनविलेला खलबत्ता
**दगूळ** (ना.)– दगड, धोंडा, पाषाण
**दचळआपट** (क्रि.वि)– फेकझोक, रागात आदळआपट करणे, क्रोधाने केलेली फेकाफेकी
**दटखे** (वि.)– खूप, अति, भरपूर, यथेच्छ, मनसोक्त, मन मानेल तसे
**दटावय** (क्रि.)– रागावतो, दरडावतो
**दडप्यो** (क्रि.)– दाबून धरणे
**दडप्यो** (क्रि.)– खाऊन फस्त करणे
**दंडुका** (क्रि.)– दंडा
**दणायो** (क्रि.)– दणके दिले, मारले
**दंदी** (वि.)– ऐतखाऊ, आळशी
**दनका** (ना.)– प्रहार, ठोसा

**दबकत दबकत** (क्रि.वि.)- भीत भीत, हळूहळू

**दबकय** (क्रि.)- दबतो, भितो, घाबरतो

**दबकाव** (क्रि.)- धमकाव, धाक दाखव, दटकाव

**दबावणे** (क्रि.)- दाबणे

**दबायो** (क्रि.)- दाबला

**दबीन** (क्रि.)- दबलेत, घाबरलेत

**दबो** (वि.)- दबा, लहानपण घ्या

**दबोन** (क्रि.)- दबाल, खचाल, घाबराल

**दभारणे** (क्रि.)- फुगणे, पोट फुगणे

**दभारा** (ना.)- फुगावा, उदा. जास्त जेवल्याने पोटाला दभारा आला

**दब्यो** (क्रि.)- दबला, खचला, हरला

**दम** (ना.)- श्वास, थकवा, भाग

**दमसे** (ना.)- दमाने, शांततेने, विचारपूर्वक

**दमकोंडय** (क्रि.)- दम कोंडतो, गर्दीत दम कोंडतो

**दमछाक** (ना.)- दमछाट, थकवा

**दमनिकरय** (क्रि.)- दम निघतो, खूप थकवा येतो

**दमी** (क्रि.)- थकली, भागली

**दम्यो** (क्रि.)- दमला, थकला

**दर** (क्रि.)- दळ, दळण

**दरखे** (क्रि.वि.)- दळून, दळून बघ

**दरजा** (क्रि.)- बांधकाम करताना दोन विटांच्या मध्ये सिमेंट भरणे

**दरजो** (क्रि.)- दळशील

**दरदर** (क्रि.वि.)- दारदार, दारदार भटकतो

**दरदर** (क्रि.वि.)- एकसारखा

**दरदर** (क्रि.वि.)- सपाटून, जोराचा

**दरदी** (वि.)- आवड असलेला, दर्दी, खाण्याचा दर्दी

**दरन** (ना.)- दळण

**दरनखे** (क्रि.वि.)- दळायला

**दरय** (क्रि.)- दळतो

**दरी** (ना.)- दोन टेकड्यांमधला खोल भाग

**दरी** (क्रि.) (स्त्री) - दळली

**दरूजा** (ना.)- दरवाजा, दार

**दरो** (क्रि.)- दळा, दळण दळा

**दरोजा** (ना.)- दरवाजा, कवाड, दार, द्वार

**दऱ्यो** (क्रि.)- दळले, दळून झाले

**दलिंदर** (वि.)- दरिद्री

**दवना** (ना.)- डवना, द्रोण, पातळ भाजी ठेवण्यासाठी पळसाच्या पानाचे वाटीसारख्या

आकाराचे केलेले पात्र

**दवाई** (ना.)– औषध, दवा, आजार घालविण्यासाठी वापरला जाणारा पदार्थ, आजारावरील एक उपाय

**दस** (वि.)– दहा, एक संख्या, १०

**दसवा** (वि.)– दहावा दिवस, दशक्रियेचा दिवस, मृत्यूनंतरचा दहावा दिवस

**दह्यांडी** (ना.)– दहीहंडी, गोकूळ अष्टमीच्या दिवशी उंचीवरील दह्याची हंडी फोडण्याचा हिंदू धर्मातील उत्साहाचा सण

**दळपणे** (क्रि.)– पचविणे, चोरून नेणे, आपलेसे करणे, गिळणे

**दळपन** (ना.)– दडपण, भीती, दहशत, भार, ओझे

**दळपय** (क्रि.)– दाबतो, जुलूम करतो

**दळप्यो** (क्रि.)– दाबले, फस्त केले, जुलूम केला

**दांगळो** (ना.)– गोंधळ, अंदाधुंदी, अव्यवस्था

**दाटन** (ना.)– गर्दी, अडचण

**दाटनने** – दाटीत, गर्दीच्या ठिकाणी

**दाटने** (क्रि.)– रागावून बोलणे, खरडपट्टी काढणे

**दाटय** (क्रि.)– फिट्ट होतो

**दाटी** (क्रि.)– रागावली, कठोर शब्दांत ओरडली

**दाटी** (क्रि.)– दाटली, तंग झाली, अति फिट झाली

**दाट्यो** (क्रि.)– रागावला

**दाट्यो** (क्रि.)– तंग झाला, दाटला, शर्ट अंगात दाटला

**दांडगी** (वि.) – राकट, धीट स्त्री

**दांडी मारय** (क्रि.)– अनुपस्थित राहतो, येत नाही

**दांडी मारय** (क्रि.)– खोटे वजन करतो, खोटे मोजतो

**दातकुळी** (ना.क्रि.) दातखिडी, दातखिडी बसणे, तोंड उघडणे, अशक्य होणे

**दातरकुटी** (वि.)– अकारण सतत हसणारी, दातरी

**दातरकुट्या** (वि.)– अकारण सतत हसणारा, अर्थशून्य हसणारा

**दातरा** (वि.)– अनावश्यक हसणारा, नेहमी अकारण हसणारा

**दातऱ्या** (वि.)– नेहमीच हसणारा, विनाकारण हसणारा

**दादला** (ना.)– नवरा, पती

**दादलाके घरे** (ना.)– नवऱ्याच्या

घरी
**दाबन** (ना.)- दाभण, मोठी सुई
**दाबी** (क्रि.)- दाबली, दडपली, गट्ट केली
**दाबोन** (क्रि.)- दाबाल, गडप कराल, गुप्त ठेवाल
**दाब्यो** (क्रि.)- दाबला, गडप केला, नष्ट केला
**दाय** (ना.)- डाळ, द्विदल धान्याचे भरडल्यानंतर होणारे दोन भाग
**दाय ओर** (क्रि.)- डाळ शिजायला ठेव
**दायजो** (ना.)- लग्नात वधुवरांचे पाय धुऊन पूजा करण्याचा विधी
**दार** (क्रि.)- टाक, सोड, त्याग कर, त्याचा त्याग कर
**दार** (ना.)- डाळ, दाय, वरण
**दारखे** (क्रि.वि.)- टाकून, सोडून, सोडून गेला
**दाय गरय** (क्रि.)- डाळ शिजते, काम होते
**दार नही गरय** (क्रि.)- डाळ शिजत नाही, काम होत नाही
**दारजो** (क्रि.)- टाकशील, सोडशील, त्याग करशील
**दारय** (क्रि.)- टाकतो, फेकून देतो, सोडतो
**दारी** (ना.)- स्त्रीवाचक शब्द
**दारी** (वि.)- बिचारी, गरीब स्त्री, सामान्य स्त्री
**दारी** - स्त्रीला उद्देशून अल्प शिवी, शिवीच्या जवळ जाणारा शब्द (वि. ना.)
**दारी** (क्रि.)- टाकली, सोडली, फेकली, त्याग केला
**दारू** (ना.)- मद्य, मदिरा, मादक पेय, आसव
**दारोन** (क्रि.)- टाकाल, सोडाल, फेकाल, त्याग कराल
**दाऱ्यो** (क्रि.)- टाकला, सोडला, फेकला, परित्याग केला
**दिखय** (क्रि.)- दिसते, नजरेत पडते, लक्षात येते
**दिखनको** (क्रि.)- दिसायचे, लक्षात यायचा
**दिखनखे** (क्रि.वि.)- दिसायला, लक्षात यायला
**दिखय** (क्रि.)- दिसते, लक्षात येते, कळते, समजते, जाणीव होते
**दिखाऊ** (क्रि.)- दाखवितो, लक्षार्थ, लक्षात आणून देतो, सांगतो
**दिखाऊ** (वि.)- बेगडी, कृत्रिम,

नकील, लबाड, खोटा

**दिखाऊपणा** (वि.)- बेगडी, खोटी, खोटे, बाह्यता तेवढे सुरेख

**दिखायी** (क्रि.)- दाखविली, लक्षात आणून दिली

**दिखायो** (क्रि.)- दाखविला, सांगितला, लक्षात आणून दिला, प्रत्ययास आणून दिला

**दिखाव** (क्रि.)- दाखव, सांग, लक्षात आणून दे

**दिखावय** (क्रि.)- दाखवितो, लक्षात आणून देतो, समजावून देतो

**दिखावू** (वि.)- दाखवू, दाखवू का? मारू का?

**दिखावू** (वि.)- फसवा, लबाड, बेगडी, खोटा, दिशाभूल करणारा

**दिखी** (क्रि.)- दिसली, लक्षात आली, कळली, समजली

**दिखीती** (क्रि.)- दिसली होती, कळली होती, लक्षात आली होती

**दिखो** (क्रि.)- दिसा, डोळाभर दिसा

**दिखोन** (क्रि.)- दिसाल, लक्षात याल, सापडाल

**दिखोना** (क्रि.)- दिसाना, सापडाना

**दिख्यो** (क्रि.)- दिसला, सापडला

**दिख्योतो** (क्रि.)- दिसला होता, लक्षात आला होता, सापडला होता

**दिठ** (ना.)- नजर, वाईट नजर, दृष्ट, दृष्टी

**दिठ निकार** (क्रि.)- दृष्ट काढ, नजर काढ

**दिठ लगी** (क्रि.)- नजर लागली, दृष्ट लागली

**दिठाई** (क्रि.)- दृष्ट लागली

**दिन** (ना.)- दिवस

**दिनकी** (ना.)- दिवसाची, दिवसाची गोष्ट आहे.

**दिनको** - दिवसाचा, दिवसाचा लख्ख प्रकाश होता

**दिनखे** (ना.)- दिवसा

**दिनगईन** (क्रि.)- दिवस गेलेत, गरोदर आहे.

**दिनगईन** (क्रि.)- दिवस गेले, दुःखाचे दिवस गेलेत

**दिन गयो** (क्रि.)- दिवस गेला, सूर्यास्त झाला

**दिन ढकलनो** (क्रि.)- कसेतरी दिवस काढणे, दुःखात दिवस काढणे

**दिनने** (क्रि.वि.)- दिवसा, भरदिवसा

**दिनभर** (क्रि.वि.)- दिवसभर, सकाळपासून संध्याकाळपर्यंत

**दिनभरनखे** (क्रि.वि.)- दिवस भरायला, दिवस भरायला लागले

**दिनभरसे** (क्रि.वि.)- दिवसभर, दिवसभरापासून

**दिनभरीन** (क्रि.)- दिवस भरलेत

**दिनभरीन** (क्रि.)- आयुष्य संपले, अंत काळ जवळ आला

**दिनसे** (क्रि.वि.)- दिवसापासून

**दिनहत** (क्रि.)- दिवस आहेत, गरोदर आहे

**दिन हय** (क्रि.)- दिवस आहे

**दिपय** (क्रि.)- दिपतो, डोळे दिपतो

**दिलेर** (वि.)- मोठ्या मनाचा, दिलदार

**दिवरा** (ना.)- देव्हारा, देवघर

**दिवलानी** (ना.)- दिवालगिरी, पणती (ना), दिवलाणी (ना.)

**दिवशा** (क्रि.वि.)- दिवशी, दिवसे, गव्हाच्या किंवा ज्वारीच्या पिठाचे (ना.) दिव्याच्या आकाराचे केलेले पदार्थ

**दिवानो** (वि.)- आसक्त, फिदा, वेडा, मूर्ख

**दिवानो भयो** (क्रि.)- वेडा झाला, फिदा झाला

**दिवारी** (ना.)- दिवाळी, दीपावली, हिंदूंचा सर्वांत महत्त्वाचा आनंदाचा सण

**दिळकी** (ना.)- दिडकी, दीड पैसा, एक जुने नाणे

**दुखने** (क्रि.वि.)- दुःखात, दुःखद प्रसंगी

**दुखय** (क्रि.)- दुखते, वेदना होते

**दुखावय** (क्रि.वि.)- दुखवितो, वेदना देतो, व्यथित करतो

**दुखी** (क्रि.वि.)- दुःखी, वेदनाग्रस्त, व्यथित

**दुखीदंदी** - दुःखादिनी ग्रस्त

**दुख्यो** (क्रि.)- दुखला, दुखावला, व्यथित झाला

**दुंडा** (वि.)- हात नसलेला, अपंग, पंगू

**दुद** (ना.)- दूध, दुग्ध

**दुदकी** (वि.)- दुधाची, दुधाची कमी नाही

**दुब्ती** (वि.)- दुधाळ, दूध देणारी गाय

**दुदू** (ना.)- स्तन, वक्ष, आचल

**दुपाई** (क्रि.ना.)- गर्भपात झाला,

गर्भ गळून पडला

**दुफ्फर** (ना.)- दुपार, मध्यान्ह काळ

**दुप्फरकी** (क्रि.वि.)- दुपारची, मध्यान्ह काळची

**दुफ्फरको** (क्रि.वि.)- दुपारचा, मध्यान्ह काळचा

**दुफ्फरसे** (क्रि.वि.)- दुपारपासून, मध्यान्हापासून

**दुबळो** (वि.)- अशक्त, दुबळा, शक्तिहीन, रोड

**दुभारा** (वि.)- दुबारा, दुसऱ्यांदा, दोन वेळा

**दूरको** (वि.)- दूरचा, अंतर असलेला

**दूरसे** - दुरून, अंतरावरून, लांबून

**दुराओन** (क्रि.)- दूर जाल, दुरावाल, वंचित राहाल

**दुरायी** (क्रि.)- दूर गेली, दुरावली, वंचित राहिली

**दुरायो** (क्रि.)- दूर गेला

**दुरावय** (क्रि.)- दूर जातो, अंतर पडते

**दुस्मन** (ना.)- दुश्मन, शत्रू, वैरी, अरि

**दुसरपन्या** (वि.)- दुसऱ्यांदा लग्न करणारा, दुसऱ्यांदा बोहल्यावर चढणारा

**दुसरिको** (वि.)- दुसरीचा, परकीचा

**दुसरिको** (वि.)-दुसरीचा, दुसऱ्या वर्गातील विद्यार्थी

**दुसरी** - परकी, दूरची

**दुसरेने** (वि.)- दुसऱ्याने

**दुसरेसे** (वि.)- दुसऱ्याकडून, दुसऱ्यांदा

**दुसरो** (वि.)- दुसरा, परका, अन्य

**दुळूदुळू** (क्रि.वि.)- हळूहळू, हळूहळू धावतो, कमी वेगाने

**दूरकी** (वि.)- दूरची, परकी

**दूरके** (वि.)- दूरचे, परके

**दूरको** (वि.)- दूरचा, परका

**दूरबठी** (वि.)- मासिक पाळी आलेली, ऋतुमती, रजस्वला, विटाळशी

**दूरसे** (क्रि.)- दुरून, लांबून, जास्त अंतरावरून, दुरून डोंगर साजिरे

**देई** (क्रि.)- दिली, दिले

**देईन** (क्रि.)- दिलेत

**देऊर** (ना.)- दीर, नवऱ्याचा लहान भाऊ

**देऊर** (ना.)- देऊळ, मंदिर, देवालय

**देख** (क्रि.)- पाहा, बघ

**देखजो** (क्रि.)- पाहशील,

बघशील

**देखत** – पाहतात

**देखत** – समोर, समक्ष, डोळ्यांसमोर

**देखनकी** (धातूसाधित विशेषण)– पाहण्याची, बघण्याची

**देखनको** (क्रि.वि.)– पाहायचे, बघायचे

**देखनखे** (क्रि.वि.)– पाहायला, दिसायला, बघायला

**देखनलगय** (क्रि.)– पाहावे लागते, बघावे लागते

**देखनलगी** (क्रि.)– पाहायला लागली, पाहू लागली

**देखने** (क्रि.)– पाहणे, अवलोकने

**देखनो** (वि.)– देखना, सुंदर दिसायला छान

**देखनो** (क्रि.)– पाहावे, पहावे लागते, अवलोकन

**देखय** (क्रि.)– पाहतो, बघतो, अवलोकन करतो

**देखयका** (क्रि.)– पाहतोस का? अवलोकन करतोस का? लक्ष देतोस का?

**देखले** (क्रि.)– पाहून घे, बघून घे

**देखादेखी** (क्रि.वि.)– नुसतेच पाहून, डोळ्यांनी पाहून, नजरानजर

**देखी** (क्रि.)– पाहिली

**देखू** (क्रि.)– पाहतो, मी पाहतो

**देखू** (क्रि.)– पाहू, बघू

**देखून** (क्रि.भ.)– पाहील, पाहीन, बघेन

**देखो** – पाहा

**देखोन** (क्रि.भ.)– पाहाल

**देखोना** (क्रि.)– पाहा, पाहाना

**देख्यो** (क्रि.)– पाहिला

**देज** (ना.)– हुंडा, वधू पक्षाने वर पक्षास द्यावयाचा हुंडा

**देजो** (क्रि.)– देशील

**देटगन** (वि.)– ठेंगू, उंचीने कमी असलेला माणूस

**देठा** (ना.)– देठ, आधार, पानाफुलांचा आधारभूत दांडा

**देडगन** (वि.)– लहान, ठेंगू, बुटका, खुजा, ठेंगणा

**देंडोय** (ना.)– तोंडले, तोंडलीचे फळ

**देंडोयी** (ना.)– तोंडलीची वेल, एक फळवेल

**देनखे** (क्रि.वि.)– द्यायला, द्यायला काय आहे?

**देनो** – देणे, देणे लागते (धा.सा.ना.)

**देनो** (ना.)– द्यायचे, परत करायचे (धा.सा.ना.)

**देय** (क्रि.)- देतो, देते, दुसऱ्याच्या स्वाधीन करतो

**देयखे** (क्रि.वि.)- देऊन, देऊन पाहा

**देयगयी** (क्रि.)- देऊन गेली

**देयगयो** (क्रि.)- देऊन गेला

**देयदेयखे** (क्रि.वि.)- देऊन देऊन किती द्यायचे?

**देयी** (क्रि.)- दिले, तिने दिले

**देयो** (क्रि.)- दिले, त्याने दिले

**देयोल** (क्रि.वि.)- पूर्वीच दिलेले, मागेच दिलेले

**देरानी** (ना.)- नवऱ्याच्या लहान भावाची पत्नी

**देवकी** - देवाची (स्त्रीवाचक नाम) देव-नाम, देवकी विशेषण

**देवको** - देवाचे, देवाचा (नामसाधित विशेषण)

**देवखे** - देवाला

**देवगाय** (ना.)- मखमली लाल किडा

**देवगाय** (ना.)- देवाला सोडलेली गाय

**देवघरे** (वि.)- देवाच्या घरी, देवाघरी गेला, अंत झाला

**देवनखे** (क्रि.वि.)- द्यायला, द्यायला हवे

**देवने** (ना.)- देवाने, ईश्वराने

**देव पुंजय** (क्रि.)- देवाची पूजा करतो, देवाची आराधना करतो

**देवरा** (ना.)- देवघर, देव्हारा

**देवूर** (ना.)- दीर, नवऱ्याचा लहान भाऊ

**देवोन** (क्रि.)- द्याल, स्वाधीन कराल, चांगल्या कामाचे फळ द्याल

**देवोनखे** (क्रि.वि.)- द्यायला, परत करायला, द्यायला काय जाते

**देवोना** (क्रि.)- द्याना, परत कराना

**देस** (क्रि.)- देतोस, परत करतोस

**देस** (ना.)- देश, मुलूख

**देळ** - दीड, एक अधिक अर्धा

**देळशायनो** (वि.)- दीड शहाणा, मूर्ख

**दोन इसा** (वि.)- चाळीस

**दोय** (वि.)- दोन, एकनंतरची संख्या, २ ही संख्या

**दोयने** (क्रि.)- दोहने, दूध काढणे

**दोयसौ** (वि.)- दोनशे

**दोयाना** - दोन (वि.) आणे, एक जुने नाणे

**दोयी** (क्रि.)- दोहिली, दूध काढले, धार काढली

**दोयो** (क्रि.)- दोहिली, दूध

काढले, धार काढली

**दोरखंड** (ना.)– दोराचा तुकडा

**दोव** (क्रि.)– धार काढ, गायीची धार काढ

**दोवने** (क्रि.)– धार काढणे, दूध काढणे

**दोवय** (क्रि.)– दोहतो, धार काढतो, दूध काढतो

**दोस** (ना.)– दोष, गुन्हा

**दोहय** (क्रि.)– दोहतो

**दोहनखे** – दोहायला (क्रि.वि.)

**दोहीकनांग** – दोन्ही (वि.) बाजूंनी (ना), दोन्हीकडे

**दोहिसे** – दोघांकडून, दोघांनी मिळून

**दोहिसे** – दोन्ही बाजूंनी

**दोही** (क्रि.)– दोहिली, धार काढली, तिने गाईची धार काढली

**दोळा** (ना.)– वेलदोडा, विलायची, वेलची

**दौत** (ना.)– दऊत, शाई ठेवण्याचे काच किंवा धातूचे पात्र

***

# ध

**धक** (क्रि.)– निघ, निघून जा, चालता हो

**धग** (ना.)– आच, शेक, ताप, दाह, गरमी

**धगधग** (ना.)– आगीचा भडका, जळते निखारे

**धगधग** (क्रि.)– धडधड, भीतीने थरकापणे, घाबरणे

**धगधगय** (क्रि.वि.)– धडधड करते, भीतीने थरकापते

**धगधगय** (क्रि.)– जळत आहे, पेटत आहे

**धगधगी** (वि.)– शरीराची किंचित हालचाल, मरणोन्मुख अवस्थेतला

**धगळीन** (वि.)– रखेल, जार कर्म करणारी स्त्री

**धगळ्या** (वि.)– यार, जार, जार कर्म करणारा पुरुष

**धज** (ना.)– हिंमत, धैर्य

**धज** (ना.)– पताका, ध्वज, निशाण, झेंडा

**धजबाज** (वि.)– चांगला, ऐटीत, हिंमतवान

**धजबाज** (वि.)– टवटवीत, ठसठशीत, पिके टवटवीत आहेत

**धजावय** (क्रि.)– हिंमत करतो, धैर्य बाळगतो

**धजावय** (क्रि.)– धजावतो, सरसावतो

**धट** (वि.)– धीट, मजबूत, पक्का, न भिणारा, धैर्यवान

**धट्टोकट्टो** (वि.)– अंगाने मजबूत असलेला, शक्तिमान

**धंडोरा** (ना.)– दवंडी, दौंडी, डांगोरा, बदनामी

**धतुरा** (ना.क्रि.वि.)– फसवणूक, नागवणूक

**धतुरा दिखायो** (क्रि.)– फसविले, बनविले, लुबाडले

**धनवालो** (वि.)– धनवान, श्रीमंत

**धपाटा** (क्रि.)– रट्टा मारणे (ना.क्रि.)

**धरजो** (क्रि.)– धरशील, पकडून ठेवशील

**धरत** (क्रि.)– धरतात, पकडतात, आवळतात

**धरनखे** (क्रि.वि.)– धरायला, पकडायला, आवळायला,

**धरणे** (क्रि.)– धरून ठेवणे, पकडणे

**धरबोन** (क्रि.)– धरुयात, पकडूयात

**धरम** (ना.)– धर्म, चांगले काम, पुण्य, दान, सत्कार्य

**धरय** (क्रि.)– धरतो, पकडतो, आवळतो

**धरसोळ** (ना.वि.)– धरसोड, डळमळीत, कमी अधिक, अनियमित, बेजबाबदारपणे, कामचुकारपणा

**धरी** (क्रि.)– धरली, पकडली

**धरीती** (क्रि.)– धरली होती, पकडली होती

**धरो** (क्रि.)– धरा, पकडा

**धऱ्यो** (क्रि.)– धरला, पकडला

**धऱ्योतो** – धरला होता, पडताना धरला होता

**धवस** – धमकी, दबकावणी

**धवसेल** (वि.)– निर्भय, हिमती, धाडसी

**धवस्या** (वि.)– बेधडक वागणारा, धाडसी, मागचा पुढचा विचार न करता वागणारा

**धस** (क्रि.)– चढ, प्रवेश कर

**धस** (ना.)– भीती, धक्का

**धसकट** (ना.)– ज्वारीचे खुंट

**धसकट्या** (वि.)– धसमुसळा, आडदांड, आडधूड, अविचारी माणूस

**धसकन** (क्रि.वि.)– एकाएकी, अकस्मात, जोराने, भीतीचा

धक्का
**धसका** (ना.)- दहशत, धास्ती, धडकी, धाक
**धसधस** (क्रि.)- निर्भयपणे वेगाने
**धसने** (क्रि.)- चढणे, झाडावर चढणे
**धसनो** (क्रि.)- चढणे, झाडावर चढणे
**धसमुस** (वि.)- आडदांड
**धसमुसळो** (वि.)- बेधडक वागणारा, आडधूड
**धसय** (क्रि.)- चढतो, वर जातो
**धसळवसळ** (वि.)- आडधूड, बिनधास्त, अविचारी
**धसाधस** (क्रि.)- एकसारखे जोरजोराने, धडाधडा
**धसाळा** (ना.)- जोराचा धक्का
**धसी** (क्रि.)- चढली, झाडावर चढली
**धसोन** (क्रि.)- चढाल, झाडावर चढाल
**धस्कट** (ना.)- ज्वारीच्या झाडाचे खुंट
**धस्कट** - अडथळा, व्यत्यय, आगंतुक
**धस्का** - भीती, धास्ती, दहशत
**धस्यो** - चढला, वर गेला
**धळ** - धड, तोंडाव्यतिरिक्त शरीराचा भाग
**धळ** - चांगला धडधाकट, व्यवस्थित, नीटनेटका
**धळक** (ना.)- धडकी, भीती, धास्ती, दहशत
**धळक** (ना.)- धडक, टक्कर, जोराचा धक्का
**धळकी** (ना.)- भीती दहशत, धडकी
**धळकी** - थडकली, येऊन पोचली
**धळक्यो** (क्रि.)- धडकला, लागला, भिंतीवर धडकला, एकाएकी आला, अचानक आला
**धळक्यो** (क्रि.)- एकदम आला, येऊन धडकला, येऊन थडकला
**धळपळ्या** (वि.)- धडपड्या, धडपड करणारा, धावपळ करणारा
**धळा** (ना.)- धडा, पाठ
**धळा** (वि.ना.)- दोन किलो
**धळाका** - धडाका, तडाका (भा.वा.ना.)
**धळा ले** (क्रि.)- धडा घे, शीक काहीतरी
**धळा लेयो** (क्रि.)- धडा घेतला, शिकलो
**धळी** (वि.)- चांगली व्यवस्थित,

नीटनेटकी, दिसायला धडी आहे
**धळो** (वि.)– चांगला, व्यवस्थित, नीटनेटका
**धाकधूक** (ना.)– भीती, काळजी, धाकधुकी
**धाककी** – धाकातली, मुठीतली, भीतीने वावरणारी, नवऱ्याच्या धाकात असलेली
**धाकने** (क्रि.वि.)– धाकात, भीतीने वागणारा
**धाककेमारे** – भीतीने, भीतीमुळे, दहशतीने, धाकाने
**धांगळ** (वि.)– धांगड, ओबडधोबड, बिनधास्त, वय वाढलेली अविवाहिता
**धांडा** (ना.)– ज्वारीचे झाड
**धाडी** (वि.)– गरोदर स्त्री, गर्भार स्त्री
**धाय** (क्रि.)– मोठ्याने रडणे, टाहो, आरोळी, आकांत
**धायखे** (क्रि.वि.)– धावून, पळून
**धायखे आयो** (क्रि.)– धावून आला, मदतीला आला, पळून आला
**धायी** (क्रि.)– धावली, पळाली
**धायो** (क्रि.)– धावला, पळाला
**धाव** (क्रि.)– पळ, पळ काढ
**धाव** (क्रि.)– पोच, मजल
**धावत** (क्रि.वि.)– पळत, धावत
**धावनो** (क्रि.)– धावणे, पळणे
**धावय** (क्रि.)– धावतो, धावते
**धावा** (ना.)– भक्ती
**धाळ** (ना.)– धाड, टोळधाड, दरोडा, अकस्मात
**धाळधीळ** (वि.)– धाडधीड, मजबूत
**धिटाई** (ना.)– धैर्य, निर्भयता
**धुकधुकी** (ना.)– छातीतील आवाज, किंचित आशा, मरणासन्न अवस्था, हळूहळू नाडी उडणे, धुरासारखे दिसणारे जलबिंदूचे पटल
**धुका** (ना.)– धुके, मुऱ्हे, धुकाटे, धुरासारखे दिसणारे जलबिंदूचे पटल
**धुकाने** – धुक्यात
**धुकासे** – धुक्याने, धुक्यामुळे
**धुंड** (क्रि.)– शोध, तपास कर
**धुंड** (ना.)– झुंड, गर्दी, वानराची झुंड
**धुंडणे** (क्रि.)– तपास करणे, चौकशी करणे, शोध घेणे
**धुंडणखे** (क्रि.)– शोधायला, तपास करायला
**धुंडत** (क्रि.)– शोधतात, शोधाशोध करतात, तपास

करतात

**धुंडबोन** (क्रि.)– शोधणार, शोधूया

**धुंडय** (क्रि.)– शोधतो, शोधाशोध करतो, तपास करतो

**धुंडाधुंडी** (ना.)– शोधाशोध, मनापासून शोध घेण्याचा प्रयत्न

**धुंडी** (क्रि.)– शोधली

**धुंडो** (क्रि.)– शोधा, शोधून काढा

**धुंडोत** – शोध तर घ्या

**धुंडोन** (क्रि.)– शोधाल, शोधून काढाल, पाहाल

**धुंड्यो** (क्रि.)– शोधला, शोधून काढला

**धुणा** (ना.क्रि.)– धुणी, धुणी धुतो

**धुंधाट** (ना.)– पावसाचा आवाज

**धुनकय** (क्रि.)– खरडपट्टी काढतो, रागावतो, झोडतो, मारतो

**धुनकय** (क्रि.)– पिंजून काढतो

**धुनकी** (क्रि.)– खरडपट्टी काढली, रागावली, झोडून काढली

**धुनकी** (क्रि.)– पिंजून काढली

**धुनक्यो** (क्रि.)– झापला, रागावला, झोडून काढला

**धुनक्यो** (क्रि.)– पिंजली

**धुपट** (ना.)– धूर, सरपण जळताना निघणारा कोळशाचा अंश

**धुमसणे** (क्रि.)– आतल्या आत राग करणे

**धुमसने** (क्रि.)– आतल्या आत पेटणे

**धुमसय** (क्रि.)– जमीन टणक येण्यासाठी चेचतो

**धुमसय** (क्रि.)– मनातल्या मनात रागावतो, आतल्या आत पेटतो

**धुमसी** (क्रि.)– रागावली, चेचली

**धुमी** (वि.)– आतल्या गाठीची

**धुमो** (वि.)– आतल्या गाठीचा

**धुम्मस** – धुमस, उभ्या दांड्याची ठोकणी

**धुयधानी** (वि.)– नासाडी, प्रचंड नुकसान, बरबादी

**धुयमाती** (ना.)– धूलिवंदन, रंगपंचमी, फाल्गुन वद्य पंचमी, आनंदोत्सव, धुळवड खेळणे, परस्परांच्या अंगावर रंग टाकणे

**धुरकट** (वि.)– काळवंडलेला, काळेपणा, धुराने काजळी बसलेला

**धुरकर** (ना.)– बैलगाडी हाकणारा

**धुरकरी** (ना.)– बैलगाडी हाकणारा, गाडीवान

**धुरपती** (ना.)– द्रौपदी (स्त्रीनाम) पाच पांडवांची पत्नी

**धुरा** (ना.)- बांध, शेताची हद्द, शेताची सीमा

**धुरापर** - धुऱ्यावर, शेताच्या बांधावर, शेताच्या सीमेवर

**धुलला** (ना.)- धूळ

**धुळला** (ना.)- धूळ, बारीक माती

**धेळ** (ना.)- धेड, अतिशूद्र वर्णातली एक जात

**धोई** (क्रि.)- धुतली, स्वच्छ केली

**धोई** (क्रि.)- पिटाई केली, मारझोड केली

**धोत्रा** (ना.)- धोतरा, एक फूल झाड

**धोंडा** (ना.)- दगड, गोटा

**धोंडा** (वि.)- कुचकामी, निर्बुद्ध

**धोंडाको मयना** (ना.)- धोंड्याचा महिना, अधिक मास

**धोपट** (क्रि.)- मार, झोड, ठोक, पिटाई कर

**धोयखे** (क्रि.वि.)- धुऊन, स्वच्छ करून

**धोयखे निकाऱ्यो** (क्रि.)- धुऊन काढले

**धोयखे निकाऱ्यो** (क्रि.)- खूप मारले, धुलाई केली

**धोयखे भयो** (क्रि.)- धुऊन झाले, स्वच्छ झाले

**धोयधाय** (क्रि.)- धुणे धाणे, स्वच्छ करणे

**धोयी** (क्रि.)- धुतली, स्वच्छ केली, साफ केली

**धोयी** (क्रि.)- पिटाई केली, मारझोड केली

**धोयो** (क्रि.)- धुतला, धुतले, स्वच्छ केला, साफ केला

**धोयो** (क्रि.)- खूप मारले, झोडून काढले

**धोरनी** (वि.)- विचारी, दूरदृष्टी असलेला, अनुसंधानी

**धोव** (क्रि.)- धू, स्वच्छ कर, साफ करो, धुऊन काढ

**धोव** (क्रि.)- पिटाई कर, मारझोड कर, अद्दल घडव

**धोवत** (क्रि.)- धुतात, स्वच्छ करतात

**धोवनखे** (क्रि.वि.)- धुण्याला, धुण्यासाठी, धुवायला, स्वच्छ करायला

**धोवबोन** (क्रि.)- धुणार, धुवुयात

**धोवय** (क्रि.)- धुतो, स्वच्छ करतो, साफ करणे, चांगले करतो

**धोवो** (क्रि.)- धुवा, स्वच्छ करा, साफ करा

**धोवोन** (क्रि.)- धुवाल, स्वच्छ

कराल, साफ कराल

**ध्यास** (ना.)- चिंता, ओढ, उत्कंठा

**ध्यासने** - चिंतेने, ओढीने

***

## न

**नई** (वि.)- नवीन, कोरा

**नई** (क्रि.)- नाही, नकारात्मक शब्द

**नई त नईच** (वि.)- नवीन तर नवीनच

**नई त नईच** (क्रि.)- नाही तर नाहीच

**नईन** (वि.)- नवीन

**नक** (ना.)- नख, हातापायाच्या बोटांच्या अग्रभागावरचे पातळ हाड

**नकने** - नखात

**नकसे** - नखाने

**नकोसी** (वि.)- नकोशी, ती नकोशी झाली

**नकोसो** (वि.)- नकोसा, तो नकोसा झाला

**नक्की** (क्रि.वि)- अगदी अचूक, अगदी बरोबर, तंतोतंत, खात्रीपूर्वक

**नख्खी** (ना.)- लुगड्याची किनार, काठ

**नख्खी** (ना.)- कापूस काढल्यावर रिकामे झालेले पऱ्हाटीचे फळ

**नग** (ना.)- वल्ली, नमुना, जिन्नस, वस्तू

**नगिना** (वि.)- लक्ष वेधून घेणारी, विलक्षण, सर्वोत्तम, उत्कृष्ट, डोळ्यात भरणारी

**नंगो** (वि.)- लाज शरम नसलेला, बेशरम

**नंगो** (वि.)- नग्न, निर्वस्त्र, नागडा, उघडा

**नम** (क्रि.)- नतमस्तक हो, वाक, वंदन कर, पडते घे, माघार घे

**नमगम** (ना.)- नम्रता, संयम, धरसोड, पडते घेणे

**नमय** (क्रि.)- नतमस्तक होतो, नम्र होतो, वाकतो, वंदन करतो

**नमी** (क्रि.)- नमली, नम्र झाली, नतमस्तक झाली, विरली, हरली

**नमीती** (क्रि.)- नमली होती, नतमस्तक झाली होती, झुकली होती

**नमोन** (क्रि.)- नमाल, नतमस्तक व्हाल, नम्र व्हाल, वाकाल, झुकाल

**नम्योतो** (क्रि.)- नमला होता, नतमस्तक झाला होता, झुकला होता, विनयशीलता दाखविली, विद्या विनयेन शोभते

**नयतुरनी** (वि.)- नुकतीच तारुण्यात पदार्पण केलेली तरुणी, तारुण्याच्या भरातली

**नयी** (वि.)- नवी, नवीन, नूतन, अपरिचित

**नयी नवलयी** (वि.)- नव्याचे नावीन्य

**नरी** (ना.)- नळी, बारीक नळा

**नरो** (क्रि.वि.)- परवाच्या दुसऱ्या दिवशी

**नरोके दिन** (क्रि.वि.)- नरवाच्या दिवशी, परवानंतरचा दिवस, आज, उद्या, परवा, नरवा

**नवरात** (ना.)- नवरात्र, नऊ अहोरात्र, हिंदू धर्मातील देवीचे नवरात्र

**नवरात्रा** (ना.)- नवरात्र, नऊ अहोरात्र, हिंदू धर्मातील देवीचे नवरात्र

**नववो** (वि.)- नववा, आठ आणि दहा यांच्यामधला क्रमांक

**नवाजय** - नावारूपाला येतो, प्रसिद्धी पावतो

**नवाजी** - नावारूपाला आली, प्रसिद्धी पावली

**नवाजो** (क्रि.)- नावारूपाला या, प्रसिद्धी मिळवा, मोठे व्हा

**नवाजोन** (क्रि.)- नावारूपाला याल, प्रसिद्धी मिळवाल, मोठे व्हाल

**नवाज्यो** (वि.)- नावाजला, प्रसिद्ध झाला, नावारूपाला आला

**नवी** (वि.)- नवीन, नूतन

**नवो** (वि.)- नवीन, नवा, अपरिचित

**नव्वी** (वि.)- नववी, क्रमांकाने नववी

**नव्वो** (वि.)- नववा, क्रमाकाने नववा

**नसती** - अकारण, उदा. नसती उठाठेव

**नसाई** - नासली, कुजली

**नसावणे** - नासणे, कुजणे, सडणे

**नहाय** (क्रि.)- नाही, उपस्थित नाही

**नव्हाई** (वि.)- नव्हाळी, नावीन्य, नवेपणा, नवलाई, अपूर्वता, नवाळी

**नहिना** (क्रि.)- नाहिना

**नही** (क्रि.)- नाही, नकार (अभावबोधक अव्यय)

**नहीत** - नाहीत (उभयान्वयी अव्यय)

**नहीतं** (उभयान्वयी अव्यय) **नही** (क्रि.)- नाहीतर नाही

**नळला** (ना)- नरडा, घसा, आवाज

**ना इतेको ना उतेको** (क्रि.वि.)- ना इकडचा ना तिकडचा, कुणीकडचाच नाही

**नाकपर राग हय** (क्रि.)- नाकावर राग आहे, लवकर राग येतो

**नागळी** (वि.)(स्त्री.)- नागडी, निर्वस्त्र, कपडे न परिधान केलेला

**नागळो** (वि.)(पु.)- नागडा, कपडे न परिधान केलेला, निर्वस्त्र

**नांगी दारय** (क्रि.)(पु.)(स्त्री.)- नांगी टाकतो, घाबरतो, भितो, माघार घेतो, माघार घेते

**नांगी मारय** (क्रि.)- दंश करतो, विंचू दंश करतो.

**नाचजो** (क्रि.)- नाचशील, नृत्य करशील

**नाचनखे** (क्रि.वि.)- नाचायला, नाचण्यासाठी

**नाचबोन** - नाचुयात

**नाचय** (क्रि.)- नाचतो

**नाची** (क्रि.)- नाचली, नाचणारी

**नाचो** (ना.)- नाचा

**नाचोन** (क्रि.)(भ.)- नाचाल

**नाच्या** (वि.ना)- नाचणारा, नृत्य करणारा

**नाच्यो** (क्रि.)(व.)- नाचला, नृत्य केले

**नांद** (क्रि.व.)- संसार कर

**नांद** (ना.)- सवय, व्यसन

**नांदणखे** (क्रि.वि.)- नांदायला, संसार करायला

**नांदणे** (क्रि.)- संसार करणे, संसारात रमणे

**नांदय** (क्रि.)- नांदते, सुखाने वसती करणे, पटते, संसारात रमते

**नादान** (वि.)- खूप गरीब, अज्ञानी, दुर्बल, कमकुवत

**नांदी** (क्रि.)- नांदली, मुलगी संसारी नांदली, संसार केला

**नांदोन** (क्रि.)- नांदाल, सुखात नांदाल

**नांद्या** (ना.)- नंदीबैल, शंकराचे वाहन

**नानी** (वि.)- लहान, लहानी, लहानगी, छोटी

**नान्ही** (ना.)- स्नानगृह, आंघोळीची जागा

**नानो** (वि.)- लहान, लहाना, लहानगा, छोटा, इवलासा

**नार** (ना.)- आईच्या गर्भाशयातून नुकत्याच जन्मणाऱ्या बाळाच्या नाभीस असलेला चर्मतंतू

**नार** (ना.)- स्त्री

**नारदमुनी** (ना.वि.)- भांडणे लावणारा

**नारय** (ना.)- नारळ, श्रीफळ, नारळीचे झाड, माड

**नारवाटी** (ना.)- नरोटी, खोबरे काढल्यावर उरलेले नारळाचे कवच

**नावपर** - नावावर, नावाने

**नावकी** (वि.)- नावाची, नावापुरती

**नावको** (वि.)- नावाचा, नावापुरता

**नावसे** (क्रि.)- नावाने, नावे, नावावर, शेत नावावर केले

**ना वान ना गुण** -ना रूप ना गुण

**नासय** (क्रि.)- नाश पावतो, बिघडतो, नष्ट होतो

**नासरो** - नाशिवंत

**नासरो** (वि)- नाश करणारा, चांगले काम बिघडविणारा

**नासी** (क्रि.)- नाश पावली

**नासोन** (क्रि.)- नाश पावाल

**नासोळा** (ना.)- अति नुकसान, अतिनाश

**नास्योतो** (क्रि.भू.)- नाश झाला होता, बिघडले होते

**नाहाय** (क्रि.)- न्हाते, अंघोळ करते, स्नान करते

**नाहाय** (क्रि.)- नाही

**निकर** (क्रि.)- निघ, जा, चालायला लाग

**निकरंड** (वि.)- बेजबाबदार, कामचुकार, आळशी, ऐतखाऊ

**निकरंड्या** (वि.)- बेजबाबदार, कामचुकार, आळशी, ऐतखाऊ, शिवी

**निकरय** (क्रि.)- निघतो, जातो

**निकरी** (क्रि.)- निघाली

**निकरू** (क्रि.)- निघू, निघू या

**निकरून** (क्रि.वि.)- निघणार

**निकरो** (क्रि.)- निघा, जा, बाहेर पडा

**निकरोन** (क्रि.)- निघाल, जाऊ लागाल

**निकल** - निघ, जा, दूर जा, निराळा हो, वेगळा हो

**निकऱ्यो, निकल्यो** (क्रि.)- निघाला, गेला, बाहेर पडला, वेगळा झाला

**निकार** (क्रि.)- काढ, बाहेर

काढ, घालव

**निकारय** (क्रि.)– बाहेर काढतो, घालवितो

**निकारी** (क्रि.)– काढली, घालवली, दूर केली, वेगळी केली

**निकारो** (क्रि.)– काढा, घालवा, वेगळा करा, दूर करा,

**निखारी** – पाहिले, निरीक्षण केले, तिने निरीक्षण केले

**निखारखे** (क्रि.वि.)– पाहून, निरीक्षण करून, न्याहाळून

**निखारणे** (क्रि.)– न्याहाळणे, अवलोकन करणे

**निखारय** (क्रि.)– न्याहळतो, निरीक्षण करतो, पाहतो

**निगरगट्ट** (वि.)– निर्ढावलेला, निर्ढावलेली, उन्मत्त कठोर मनाचा

**निचन** (वि.)– निश्चिंत, शांत, निष्काळजी

**निचनमन** (वि.)– शांत चित्त

**निचनमनसे** (वि.)– मन लावून, शांत चित्ताने, निश्चिंत मनाने

**निपटय** (क्रि.)– विल्हेवाट लावतो, पूर्ण करतो, शेवटास नेतो

**निपटारा** (क्रि.वि.)– विल्हेवाट, आवरासावर

**निपटी** (क्रि.)– विल्हेवाट लावली, पूर्ण केली

**निंबर** (वि.)– निबर, कडक, राठ

**निंबू** (ना.)– लिंबू, एक आंबट फळ

**निभावनखे** (क्रि.वि.)– निभवून न्यायला, निभवायला, नाते निभवायला अवघड असते.

**निभावय** (क्रि.)– निभवतो, अडचणीतून पार पाडतो

**निभावो** (क्रि.)– निभावा, सांभाळून घ्या

**निभावोन** (क्रि.वि.)– निभवाल

**निभी** (क्रि.)– निभली, अडचणीतून पार पडली, शेवटास गेली

**निमता** (क्रि.वि.)– खुशामत, विनंती, आर्जव

**निरखय** (क्रि.)– न्याहाळतो, निरखून पाहतो, निरीक्षण करतो

**निरखो** (क्रि.)– न्याहाळा, निरीक्षण करा

**निरबंध** (क्रि.वि.)– निर्बंध, मर्यादा

**निरा** (वि.)– अगदी, केवळ, दुधात केवळ पाणीच आहे

**निरा** (ना.)– ताडाच्या झाडापासून निघालेला रस

**निराच** (वि.)– फारच, निवळ, अति करणे, अगदी, केवळ

**निवता** (ना.)– जेवणाचे निमंत्रण, येण्यास सांगणे, बोलावणे, आमंत्र

**निवय** (क्रि.)– थंड होतो

**निवय** (क्रि.)– शांत होतो

**निवळ** (क्रि.वि.)– निवड

**निवळ** (क्रि.)– स्वच्छ कर

**निवळय** (क्रि.)– स्वच्छ करतो, निवडतो

**निव्वळ** (वि.)– नि:संशय, केवळ

**निशाना** (ना.)– निशाण, लक्ष्य, नेम, चिन्ह

**निसने** (क्रि.)– निवडणे, स्वच्छ करणे, साफ करणे

**निसय** (क्रि.)– निवडते, स्वच्छ करते, साफ करते

**निसारी** (वि.)– आळशी स्त्री, सुस्त स्त्री

**निसाऱ्या** (वि.पु.)– आळशी, सुस्त, कामचुकार

**निसी** (क्रि.)– निवडली, साफ केली, स्वच्छ केली, ज्वारी निवडली

**निहार** (क्रि.)– बघ, पाहा, अवलोकन कर, निरीक्षण कर

**निहारखे** (क्रि.वि.)– बघितल्यावर, पाहिल्यावर

**निहारणे** (क्रि.)– न्याहाळणे, निरीक्षण करणे

**निहारय** (क्रि.)– न्याहाळतो, निरीक्षण करतो

**निहारस** (क्रि.)– न्याहाळतोस, निरीक्षण करतोस

**नेक** (वि.)– इमानदार, खरेपणा, प्रामाणिकपणा, सत्यता, ऋजु

**नेकी** (वि.)– इमानदारी, नीतिमान, सद्वर्तन

**नेंग** (ना.)– लग्नातील पारंपरिक विविध विधी, लग्नातील पूजाअर्चा इत्यादी

**नेम** (ना.)– निशाण

**नेम** (क्रि.वि.)– नियम, शिस्त, वहिवाट, चाल, नित्य

**नेमको** (क्रि.वि.)– नेमका, अचूक, बरोबर

**नेमबाज** (वि.)– निशाण साधणारा, नियमाने वागणारा

**नेमय** (क्रि.)– नेमतो, नेमणूक करतो, नियुक्ती करतो

**नेमसे** (क्रि.वि.)– नियमाने, नियमितपणे

**नेमी** (क्रि.)– नेमली, नेमलेली, नियुक्ती केली

**नेम्यो** (क्रि.)– नेमला, नेमणूक

केली, नियुक्ती केली

**नोको** (क्रि.)– नाही (अभावबोधक अव्यय)

**नोकोच** (क्रि.)– नाहीच

**नोकोना** (क्रि.)– नाहीना

**नोकोसी** (वि.)– नको असलेली, नावडती

**नोकोसो** (वि.)– नको असलेला, नावडता

**नोती** (क्रि.)– नव्हती

**नोतो** (क्रि.)– नव्हता

**नोन** (ना.)– मीठ, क्षार, लवण

**नोहती** (क्रि.)– नव्हती

**नोहतीन** (क्रि.)– नव्हते

**नोहतो** (क्रि.)– नव्हता

**नोहोस** (क्रि.)– नाहीस

**नौका** (ना.)– नाव, होडी

**नौखी**(वि.)– दूरची, परकी, दुसरी

***

# प

**परको** (वि.)– परका, परकी, दूरचा

**पखारणे** (क्रि.)– वधुवरांची पाय धुऊन पूजा करणे

**पंगपंग भयो** (क्रि.)– उजाडले, दिवस निघाला

**पगळा** (क्रि.वि.)– छाप, प्रभाव, वर्चस्व

**पगळा, पगळी** (ना.)– पगडी, पागोटे

**पंगारा** (ना.)– मोठाधाटा, पसारा, अस्ताव्यस्त पसारा

**पंघर** (क्रि.)– पांघर, पांघरून घे, झाकून घे

**पंघरणखे** (क्रि.वि.)– पांघरायला, अंगावर घ्यायला

**पंघरणे** (क्रि.)– पांघरणे, अंगावर घेणे, आच्छादणे

**पंघरय** (क्रि.)– पांघरतो, अंगावर घेतो, झाकून घेतो

**पंघरनखे** – पांघरायला, अंगावर घ्यायला

**पंघरावय** – पांघरून घालतो

**पंघरी** – पांघरली

**पंघऱ्यो** – पांघरला, पांघरून घेतले

**पचनखे** – पचायला

**पचय** - पचते, जिरते

**पचास** - पन्नास

**पच्या** - धोतर, पुरुषाचे नेसण्याचे पारंपरिक वस्त्र

**पचीस** (वि.)- पंचवीस

**पच्यो** (क्रि.)- पचले, जिरले

**पटकणी खाणे** (क्रि.)- आजारी पडणे

**पटकन** (क्रि.वि.)- लवकर, ताबडतोब, झटपट

**पटक्यो** (क्रि.)- उचलून आपटला, आपटला

**पठावण** (ना.)- पाठवण

**पठावणे** (क्रि.)- पाठविणे, निरोप देणे, बोळवण करणे, रवाना करणे

**पतना** (ना.)- पाप

**पन** (उ.अ.)- पण, नियम, पैज, शर्यत, प्रतिज्ञा, वचन

**पतराई** (ना)- पत्रावळ, पळसादी झाडाची पाने टाचून केलेले पात्र

**पतली, पतलो** (वि.)- पातळ, विरळ, द्रवयुक्त

**पथ** (ना.)- पथ्य, पथ्यकारक

**पंधरवाळा** (वि.)- पंधरा दिवस

**पनजी** (ना.)- बापाची किंवा आईची आई

**पन्हई** (क्रि.)- पान्हावली

**पन्हावने** (क्रि.)- पान्हावणे, आचळात दूध येणे

**पन्हावय** (क्रि.)- पान्हावते, आचळात दूध येते

**पपिऱ्या** (वि.)- जाडजूड, लठ्ठ

**पयलिको** (वि.)- पहिलीचा, आधीचीचा

**पयली** (वि.)- प्रथम, पहिली, वर्गातून पहिली आली

**पयले** (वि.)- प्रथम, आधी, अगोदर

**पयलो** (वि)- पहिला, प्रथम

**पयेलवान** (ना.)- पहिलवान, मल्ल

**पर** (श.)- वर, वरती

**पर** (वि.)- परका, दुसरा, अनोळखीचा

**परकी** (वि.)- दुसरी, दूरची, अनोळखी

**परको** (वि.)- परका, दुसरा, परकी, अनोळखी

**परख** (धा.ना.)- ओळख

**परखनके** (वि.)- ओळखायला

**परखय** (क्रि.)- ओळखतो

**परखी** (क्रि.)- ओळखले

**परखो** (क्रि.)- ओळखा

**परखोन** (क्रि.)- ओळखाल

**परचिती** (क्रि.वि.)- प्रचिती,

अनुभव, प्रत्यंतर

**परजय** (क्रि.)- धार लावतो

**परदा** (ना.)- पडदा

**परदा** (क्रि.वि.)- दुरावा

**परदेस** (ना.)- परदेश, दुसरा देश

**परपंज** (क्रि.वि.)- भेदभाव, आपपरभाव, लबाडी, दुजाभाव, खोटेपणा

**परभारे** (क्रि.वि.)- परस्पर, माहीत न करता, न सांगता, न कळविता

**परमेसर** (ना.)- परमेश्वर, ईश्वर

**परवा** (क्रि.वि)- पर्वा, आस्था, चिंता, काळजी

**परस** (क्रि.)- वाढ, जेवण वाढ

**परस** (शब्दयोगी अव्यय)- पेक्षा, हून, त्याच्यापेक्षा

**परसने** (क्रि.)- वाढणे, जेवण वाढणे

**परसय** (क्रि.)- वाढते, जेवण वाढते

**परसाद** (ना.)- प्रसाद

**परसी** (क्रि.)- वाढले, जेवण वाढले, जेवणाचे ताट वाढले

**परसो** (क्रि.)- वाढा, जेवण वाढा, ताट वाढा

**परसो** (क्रि.वि.)- परवा, परवाच्या दिवशी

**पराया** (वि.)- परका, अनोळखी, अन्य, दुसरा

**पराटी** (ना.)- कपाशीचे झाड

**परायी** (वि.)- परकी

**परायी** (वि.)- दूरची, दूर, विशेषत: मुलीला उद्देशून

**परायो** (वि)- परका, दुसरा, परकी

**परी** (ना.)- पळी, मोठा चमच

**परी** (ना.)- चमचा

**परो** (क्रि.वि.)- परवा, परवाच्या दिवशी

**पलारणे** (क्रि.)- धुणे, तांदूळ धुणे

**पलारी** (क्रि.)- धुतले, पाण्याने स्वच्छ केले, तांदूळ धुतले

**पल्ला** (ना.)- बांबूच्या बारीक काड्यांनी विणलेली पसरट वस्तू

**पल्ला** (ना.)- पारडे

**पल्ल्याड** (क्रि.वि.)- पलीकडे

**पलाव** (क्रि.)- विझव, दिवा विझव, पालव, मालव

**पलावने** (क्रि.)- विझविणे, दिवा विझवणे

**पलावय** (क्रि.)- विझवितो

**पलावो** (क्रि.)- विझवा

**पस भरणे** (क्रि.)- लग्नातील एक विधी

**पसरनखे** (क्रि.वि.)-

अस्ताव्यवस्त झोपायला,
बिनधास्त झोपायला
**पसराई** (क्रि.)– अस्ताव्यस्त
ठेवली
**पसराई** (क्रि.)– पसरविली
**पसरी** (क्रि.)– पसरली, बिनधास्त
अस्ताव्यस्त झोपली
**पसरो** (क्रि.वि.)– बिनधास्त
कसेही झोपा
**पसऱ्यो** (क्रि.)– पसरला,
बिनधास्त अस्ताव्यस्त झोपला
**पसा** (ना.)– ओंजळ
**पसापसा** (वि)– ओंजळ ओंजळ
**पसाभर** (वि.)– ओंजळभर
**पसासे** (ना.)– ओंजळीने
**पहेट** (ना.)– सकाळ
**पह्यटखे** (ना.)– सकाळी
**पह्यली** (वि.)– पहिली, प्रथम
क्रमांकाने
**पह्यलो** – पहिला, प्रथम क्रमांकाने
**पहेललाळू** (वि.)– पहिल्यांदा
गरोदर असलेली
**पहिलो** (वि.)– प्रथम
**पहेट** (नि.)– सकाळ, उष:काल
**पहेटखे** (क्रि.वि.)– सकाळी
**पहेटपहेटखे** (क्रि.वि.)– अगदी
सकाळी
**पहेटपहेटखे** (क्रि.वि.)– पहाटे
पहाटे
**पह्येटपासून** (ना.)– सकाळपासून
**पह्येट** (ना.)– सकाळ
**पह्येटकी** (क्रि.वि.)– सकाळची
**पह्येटखे** (क्रि.वि.)– सकाळी
**पंघरय** (क्रि.)– पांघरतो
**पंघरी** (क्रि.)– पांघरली
**पंघरोन** – पांघराल
**पांघरून दारय** (क्रि.)– दोष
झाकतो
**पाचवो** (वि.)– पाचवा
**पाची** (वि.)– पाचही
**पाची** (ना.)– मूल जन्मल्यानंतर
त्याची नाळ सुटल्यावर पाचव्या
दिवशी करण्याचा विधी
**पाजी** (वि.)– बदमाश
**पांडरी** (वि.)– पांढरी
**पांडरी भयी** (क्रि.)– ओशाळली
**पांडरो** – पांढरा
**पांढरो** (वि.)– पांढरा
**पांढरोफटक** (वि.)– भीतीने,
आजाराने पांढरा पडलेला
**पांढुरको** (वि.)– फिकट पांढरा
**पाणीको** (नामसाधीत विशेषण)–
पाण्याचा
**पाणीगोला** (ना.)– पाणी
गोळ्याची भाजी
**पाणीदार** (वि.)– धमक असलेला

**पाणीसे** - पाण्याशी, पाण्यासोबत, पाण्याशी वैर बांधू नये

**पादरो** - भित्रा, नेभळट, दुबळा

**पादरो** - पादणारा

**पानगर** (ना.)- पानगळ, शिशिर ऋतू

**पान गरत** (क्रि.)- पाने गळतात, झाडांची पाने गळतात

**पानचट** (वि.)- बेचव, चवहीन, रूचिहीन

**पानचट** (वि.)- पाणी जास्त झालेली भाजी

**पानचट** (वि.)- निर्लज्ज, एक शिवी

**पानफेरय** (क्रि.)- पान फिरवितो, पान अधूनमधून फिरविल्याने सडत नाही

**पानफेरय** (क्रि.)- इकडचे तिकडे करतो, बतावणी करतो

**पानी** (ना.)- पाणी, उदक, जल

**पानी के पयले वयचन बांधो** - पावसाळा येण्यापूर्वी वळचण बांधा, आपत्ती निवारणार्थ आधीच सज्ज राहा

**पानीको चखना** (ना.)- सारपाण्याची भाजी

**पादरफिसकी** (वि.)- अति भेकड, अति भित्रा

**पादरफिसका** (वि.)- अति भेकड

**पानी मुरय** (क्रि.)- काहीतरी घोळ आहे

**पानी मुऱ्यो** (क्रि.)- काहीतरी घोळ झाला

**पायको** (पाय-नाम)- पायाचा, पायातला (नामसाधित विशेषण)

**पायजे** (क्रि.)- पाहिजे, हवे

**पायथर** (ना.)- पाय ठेवून उभे राहता येईल अशी पाऊस पडल्यानंतरची जमीन

**पायना** (ना.)- पाळणा, झोपाळा

**पायनाने** (ना.)- पाळण्यात

**पायपाय** (ना.)- वाहनाविना, पायाने चालणे

**पायपोसना** (ना.)- पायपोस

**पायसे** (ना.)- पायाशी, पायाजवळ, पायामुळे

**पायरा** (ना.)- पहारा, रखवाली

**पायलग** - पायापर्यंत (पाय-नाम, पर्यंत शब्दयोगी अव्यय)

**पायलग** (क्रि.)- पाया पड, पायावर डोके ठेव

**पायलगय** (क्रि.)- पाया पडतो, पायावर डोके ठेवतो

**पायलगी** (क्रि.)- पाया पडली, पायावर डोके ठेवले

**पायलग्यो** (क्रि.)- पाया पडला,

पाया पडून नमस्कार केला
**पायली** (वि.)– दोन किलो, जुने माप
**पायो** (क्रि.)– मिळविले, सापडले
**पायो** (क्रि.)– पावला, देव पावला
**पारबती** (ना.)– पार्वती
**पारोसा** (वि.)– न झाडलेले
**पारोसा** (वि.)– आंघोळ न केलेला
**पारोसी** (वि.)– आंघोळ न केलेली
**पाल** (ना.)– कांद्याची पात, कांद्याची पाने
**पाल** (ना.)– सरड्याची एक जात
**पालथो** (वि.)– पालथा, खाली तोंड असलेला
**पाल** (ना.)– दोन बाजूंनी उतार केलेला कापडाचा एक प्रकारचा लहान तंबू
**पालुखोशा** (वि.)– कुचकामी माणूस, निरुपयोगी माणूस, भित्रा
**पालू** (ना.)– फडके, कापडाचा किंवा वस्त्राचा एक लहान तुकडा
**पाव** (क्रि.)– प्रसन्न हो
**पाव** (वि.)– पावकिलो
**पाव** (ना.)– रोटी, भाजीसोबत खाण्याचा पाव
**पावना** (ना.)– पाहुणा, अतिथी, अभ्यागत, प्रसंगोपात्त आपल्या घरी येणारा, तिऱ्हाईत
**पावनीन** (वि.)– पाहुणी, स्त्री अतिथी
**पावभर** (वि.)– पाव किलो, किलोचा एक चतुर्थांश भाग, एक जुने माप
**पावय** – पावतो (शब्दयोगी), प्रसन्न (क्रियापद) होतो
**पावसेर** (वि.)– पाव किलो, किलोचा एक चतुर्थांश भाग, एक जुने माप
**पावळा** (ना.)– फावडे, माती ओढण्याचे एक यंत्र
**पासरी** (वि.)– एक जुने माप, पाच शेरांचे वजन
**पासोई** (ना.)– बरगडी, पासोळी, फासळी (ना.)
**पासोंग** (ना.)– पासंग, तराजूचा समतोल साधण्यासाठी वापरलेली वस्तू
**पाहाळ** (ना.)– पर्वत, पहाड, डोंगर
**पिऊ** (क्रि.)– पितो, प्राशन करतो
**पिकणे** (क्रि.)– परिपक्व होणे,

पक्कता येणे
**पिकय** (क्रि.)– पिकते, फळ पिकते
**पिकय** (क्रि.)– समृद्धी येते, हंगामाच्या दिवसांत शेतात समृद्धी नांदते
**पिकीन** – पिकली, पिकलेत
**पिक्यो** (क्रि.भू.)– पिकला, पक्क झाला
**पिघलय** – वितळतो
**पिघली** (भू.)– वितळली
**पिघली** (क्रि.)– भावनेच्या अधीन झालो
**पिघल्यो** (क्रि.)– वितळला, वितळला
**पिघल्यो** (क्रि.)– भावनावश झाला
**पिचय** (क्रि.)– फुटते, तडा जातो
**पिचय** (क्रि.)– पिळून काढतो
**पिची** (क्रि.)– पिचून काढली
**पिच्छा** (ना.)– पाठलाग, माग काढणे
**पितर** (ना.)– पितळ, एक धातू, पितळेचे ताट
**पित्तर** (ना.)– मृत पूर्वज
**पिदाळ** (क्रि.)– हाण, झोडून काढ
**पिदाळ्या** (वि.)– दारू ढोसणारा, खूप दारू पिणारा
**पिदाळ्यो** (क्रि.)– मारले, हाणले, पिटाई केली
**पिपर** (ना.)– पिंपळ, पिंपळाचे झाड
**पियी** (क्रि.)– पिली, प्राशन केली
**पियु** (क्रि.)– पितो, प्राशन करतो
**पिरकय** (ना.)– हगवण लागली, पातळ शौचास होते
**पिरकी** (क्रि.)– पातळ शौचास झाली
**पिरगायो** (क्रि.)– पिरगावला, पिळला
**पिरगावय** (क्रि.)– पिरगाळतो, हात पिरगाळतो
**पिरपिर** (क्रि.वि.)– रिपरिप, पावसाची रिपरिप, थेंबथेंब सारखा पाऊस येणे
**पिरपिर** (क्रि.वि.)– किरकिर, सारखा तगादा लावणे, सारखे बोलत राहणे
**पिरय** – पीळ घालतो, पिळतो, रस काढण्यासाठी लिंबू पिळतो
**पिरस** (क्रि.)– शोषण करतो
**पिरी** (क्रि.)– पिळले, पिळून काढली
**पिलांटू** (ना.)– पिलावळ
**पिलांटू** (वि.)– आंधळा चेला, होयबा

**पिवनको** (वि.)- पिण्याचे, प्राशन करण्याचे

**पिवनखे** (क्रि.वि.)- पिण्यासाठी, प्राशण करण्यासाठी

**पिवय** (क्रि.)- पितो, प्राशन करतो

**पिवरसर** (वि.)- पिवळ्या रंगासारखा

**पिवरे** (वि.)- पिवळे

**पिवरेचाऊर** (ना.)- पिवळे तांदूळ, लग्नाशी संबंधित एक विधी

**पिवरो** (वि.)- पिवळा, पिवळा रंग, पीत वर्ण

**पिवरोधम** (वि.)- अति पिवळा, पिवळा जर्द, गहरा पिवळा

**पिवसी** (ना.)- पिशवी, पूर्वी स्त्रिया कमरेला पिशवी खोवत असत

**पिवाव** (क्रि.)- पाज, प्राशन करायला दे

**पिवावय** (क्रि.)- पाजतो

**पिवोन** (क्रि.)- प्राशन कराल, प्याल

**पिशाब** (ना.क्रि.वि.)- लघवी

**पिसवा** (ना.)- एक चावणारा कृमी

**पिसा** (वि.)- वेडा, भ्रमिष्ट, खुळा, बेताल वागणारा

**पिसा** (ना.)- पंख, पक्ष, पीस

**पिसाट** (वि.)- वेडा मनुष्य/स्त्री, भ्रमिष्ट

**पिसाटय** (क्रि.)- वेडा होतो, बुद्धिभ्रम होतो

**पिसाटी** (क्रि.)- वेडी झाली, भ्रमिष्ट झाली, सैरभैर झाली, सैरावैरा चालणारी

**पिसाट्यो** (क्रि.)- वेडा झाला, डोके फिरले

**पिसाळय** (क्रि.)- वेडा होतो, सैरभैर होतो

**पिसाळी** (क्रि.)- वेडी झाली, डोक्यात फरक पडला, बेताल वागते

**पिसाळ्यो** (क्रि.)- वेडा झाला, बेताल वागतो

**पिसी** (वि.)- वेडी, भ्रमिष्ट, बृद्धिभ्रम झालेली

**पिसू** (क्रि.वि)- मागे, पश्चात, नंतर

**पिसू गिरस** (क्रि.)- मागे पडतो

**पिसूपिसू** (क्रि.वि.)- मागेमागे

**पिसो** (वि.)- वेडा, वेड लागलेला, भ्रमिष्ट, बुद्धिभ्रम झालेला

**पिळा** (ना.)- पाट, लाकडाचे तीन

चार इंची पास लावलेली बसण्याची फळी

**पीठ** (ना.)– पाठ, कंबरेपासून मानेपर्यंतचा मानवी शरीराचा मागचा भाग

**पीठ** (ना.)– धान्याचे पीठ

**पीठकी** – पिठाची, ज्वारीच्या पिठाची भाकर

**पीठपर** – पाठीवर

**पीर** (क्रि.)– पीळ, दाब, पीळ दे

**पुई** – पोळी, गव्हाची पोळी

**पुंगी लगावय** (क्रि.वि.)– एकसारखे तेच ते म्हणत राहतो, किरकिर करते

**पुंजका** (ना.)– घाणीच्या वस्तूंचा लहान ढीग

**पुजने** (ना.)– पूजा करणे

**पुंजय** (क्रि.)– पूजा करतो, करते

**पुंजा** (ना.)– कचऱ्याचा ढीग

**पुंजा** (ना.)– कचरा, खकाणा

**पुंजा** (ना.)– पूजा, पूजाविधी

**पुंजा कर** (क्रि.)– पिटाई कर, बदडून काढ

**पुंजारी** – पुजारी, मंदिरात पूजाअर्चादी कामे करणारा

**पुंजारीन** – मंदिरात पूजाअर्चादी कामे करणारी

**पुंजी** – स्त्रीवाचक नाम

**पुंजी** (क्रि.)– पुजिली

**पुदाळा** (क्रि.वि.)– अथक परिश्रम, मरणाचे काम, अति काबाडकष्ट

**पुनव** (ना.)– पुनीव, पौर्णिमा

**पुरके उरी** (क्रि.)– पुरून उरली

**पुरके उऱ्यो** (क्रि.)– पुरून उरला

**पुरको** (क्रि.)– पुराचे, पुराचे पाणी (पूर–नाम, नामसाधित विशेषण)

**पुरणके बुल्ल्या** (ना.)– पुरणाचे भज्यांच्या आकाराचे गोळे, पातळ भिजवलेल्या गव्हाच्या पिठात बुडवून तापलेल्या तेलातून काढणे

**पुरखणे** (क्रि.)– पुरायला, मातीत गाडायला

**पुरणे** (क्रि.)– गाडणे

**पुरय** (क्रि.)– पुरतो, शेवटपर्यंत पुरतो

**पुरय** (क्रि.)– गाडतो, जमिनीत गाडतो

**पुरी** (क्रि.)– पुरली, जमिनीत गाडली

**पुरी** (ना.)– तुपातून किंवा तेलातून तळलेला एक पदार्थ

**पुरी** (वि.)– पूर्ण, संपूर्ण

**पुरीन** (क्रि.)– पुरलेत

**पुरो** (वि.)– पूर्ण, परिपूर्ण, यच्चयावत्, संपूर्ण

**पुरो** (क्रि.)– जमिनीत गाडा

**पुरो कऱ्यो** (क्रि.)– पूर्ण केले, शेवटास नेले

**पुरोकोपुरो** (वि.)– पूर्णचे पूर्ण, संपूर्ण

**पुऱ्यो** (क्रि.)– जमिनीत गाडला

**पुऱ्यो** (क्रि.)– पुरला, शेवटपर्यंत पुरला, कमी पडला नाही

**पूस** (क्रि.)– विचार

**पुसत** (क्रि.)– विचारतात, चौकशी करतात

**पुसने** (क्रि.)– विचारणे, चौकशी करणे

**पुसय** (क्रि.)– विचारतो, चौकशी करतो, विचारपूस करतो

**पुसापुसी** (ना.)– चौकशी, विचारपूस (धातूसाधित नाम)

**पुसी** (क्रि.)– विचारले, तिने विचारले

**पुसो** (क्रि.)– विचारा

**पूक** (बळो)– पुनर्वसू, आठवे नक्षत्र

**पूक** (सायनो)– पुष्य नक्षत्र, सातवे नक्षत्र

**पूजनखे** (क्रि.वि.)– पुजायला

**पूजय** (क्रि.)– पूजा करतो,

**पूजी** (क्रि.)– पूजली, पूजा केली

**पूजोन** – पूजा कराल

**पूरी** (वि.)– पूर्ण

**पूरमगज** (क्रि.वि.)– पुरेपूर, भरपूर, यथेच्छ

**पूस** (क्रि.)– विचार (श्रीचक्रधरकालीन शब्द)

**पूस** (ना.)– विचार

**पूस** (ना.)– पौष, हिंदू वर्षाचा दहावा महिना

**पेंगय** (क्रि.)– बसल्या बसल्या झोपतो

**पेज** (ना.)– गरम पाण्यात पीठ घालून उकळी येईपर्यंत शिजविणे, गरिबांचे अन्न

**पेटीफुटी** (क्रि.)– पोट सुटले, पोट मोठे झाले

**पेंड खाय** (क्रि.)– गळाठतो, मागे राहतो, अडखडतो, प्रगती खुंटते

**पेर** (ना.)– झाडाचा बुंधा, लाकडाचा मोठा तुकडा

**पेरकुंड** (ना.)– परेकांडे, उसाच्या किंवा ज्वारीच्या धांड्याचा तुकडा

**पेरय** (क्रि.)– पेरतो, पेरणी करतो, बीजारोपण करतो

**पेरी** (क्रि.)– पेरले, बीजारोपण केले

**पेरो** (क्रि.)– पेरा, पेरणी करा, बीजारोपण करा

**पेलांटी** (ना.क्रि.वि.)– दंड, शिक्षा, त्रास

**पेहरनखे** (क्रि.)– नेसायला, परिधान करायला

**पेहरत** (क्रि.)– नेसतात, परिधान करतात

**पेहरय** (क्रि.)– नेसतो, परिधान करतो

**पेहराव** (ना.)– वस्त्र परिधान करण्याची पद्धत, नेसूचे वस्त्र

**पेहरी** (क्रि.)– नेसली, परिधान केली

**पेहरो** (क्रि.)– नेसा, परिधान करा

**पेहऱ्यो** (क्रि.)– नेसला, परिधान केले

**पैदास** (क्रि.वि.)– निर्मिती, उत्पन्न, उत्पत्ती, जन्म, प्राप्ती

**पैसा** (ना.)– पैसे, रक्कम, द्रव्य

**पैसाको** (ना.)– पैशाचा, संपत्तीचा, संपत्तीचा अहंकार नको

**पोई** (ना.)– चपाती, पोळी

**पोईपाट** (ना.)– पोळपाट, गव्हाच्या कणिकेची पोळी लाटण्याची फळी

**पोकर** (वि.)– पोकळ

**पोकर** (वि.)– कुचकामी, गोष्टीवेल्हाळ, बिनकामाचा

**पोकर हस** (क्रि.)– पोकळ आहेस

**पोकरी** (वि.)– पोकळी, उथळ, शक्तिहीन, पोखरलेली

**पोंगरी** – फुंकणी, विस्तव फुलविण्याकरिता वापरली जाणारी लोखंड, बांबू इ. ची फुंकण्याची नळी

**पोचट** (वि.)– रसहीन, कोरडा, बेचव, शक्तिहीन

**पोचट** (वि.)– पोकळ, कुचकामाचा, निरुपयोगी, शक्तिहीन

**पोचणे** (क्रि.)– पोहचणे

**पोटकी** (वि.) (नामसाधित विशेषण)– पोटाची, पोटाची भूक

**पोटको** (ना.सा.वि.)– पोटचा

**पोटको गड्डा** (ना.सा.वि.)– पोटात खड्डा

**पोटखे तजणे** (क्रि.)– उपाशी राहणे, भूक मारणे

**पोटगी** (ना.)– खावटी, पोटखर्चाकरिता, उदरनिर्वाहाकरिता द्यावे लागणारे पैसे

**पोटजन** (ना.)– स्वत:ची अपत्ये,

आपली अपत्ये, पोटातून जन्माला आलेली

**पोटरकी** (ना.)– पोटरी, पाऊल व गुडघा यांच्यामधील नळीच्या मागचा मांसल भाग

**पोत** (ना.)– पोथ, माळ, गळ्यातील माळ, विवाहित स्त्रीच्या गळ्यातील सौभाग्याचे एक लेणे

**पोता** (ना.)– पोते, गोण, कोथळा, मोठी पिशवी

**पोतिरा** (ना.)– पोतेरे, सारवण्याचा फडका

**पोतेरा फिरायो** (क्रि.)– पुसून काढले, नष्ट केले

**पोतेरा फिरायो** (क्रि.)– सारविले, घर सारविले

**पोपटपंची** (क्रि.वि.)– केवळ शब्द उच्चारणे, अर्थ ज्ञानावाचून शब्दोच्चार, शाब्दिक वटवट

**पोपळा** (ना.)– पापुद्रा, भिंतीचा पापुद्रा

**पोपळा** (ना.)– भाकरीचा पापुद्रा

**पोरा** (ना.)– पोळा, हिंदू धर्मातील एक सण, बैलांचा सण

**पोवचय** (क्रि.)– पोचतो

**पोवची** (क्रि.)– पोचली, पोहचली, अपेक्षित स्थळी गेली

**पोवचो** (क्रि.)– पोहचाल

**पोवच्या** (ना.)– घोटा, तळपायाचा वरचा भाग, पायाचा डोळा, पाऊल आणि त्याच्यावरील हाड यांचा सांधा

**पोवच्यो** (क्रि.)– पोहचला, इच्छित स्थळी गेला

**पोवटा** (ना.)– शेणाचा लहान ढीग, विष्ठेचा लहान ढीग

**पोवणो** (क्रि.)– पोहणे, तरणे

**पोवय** (क्रि.)– पोहतो, तरतो, तरंगतो

**पोसणे** (क्रि.)– स्वच्छ करणे, पुसणे, पोसणे, उदरनिर्वाह चालविणे, पालनपोषण करणे

**पोसनखे** (क्रि.)– पालनपोषण करण्यासाठी

**पोसय** (क्रि.वि.)– उदरनिर्वाह करतो, अन्नपाणी पुरवितो, पालनपोषण करतो

**पोसय** – पुसतो, स्वच्छ करतो

**पोहनखे** (क्रि.वि.)– पोहायला

**पोहय** (क्रि.)– पोहतो, तरंगतो

**पोही** (क्रि.)– पोहली

**पोहोत** (क्रि.)– पोहतात

**पोहोन** (क्रि.)– पोहाल

**पोह्यो** (क्रि.)– पोहला

**पौस** (ना.)– पौष, हिंदू वर्षाचा दहावा महिना

***

# फ

**फटनखे** (क्रि.वि.)– फाटायला, वस्त्र फाटायला आले

**फटय** (क्रि.)– फाटतो, फाटते, टरकते, विदीर्ण होते

**फटय** (क्रि.)– घाबरतो

**फटय** (क्रि.)– दुरावा निर्माण होतो

**फटी** (क्रि.)– फाटली, टरकली, विदीर्ण झाली

**फटी** (क्रि.)– घाबरली

**फटू** (ना.)– फोटो, छायाचित्र

**फटेन** (क्रि.)– फाटेल, टरकेल

**फट्यो** (क्रि.)– फाटला, भिन्न झाले, दुरावा निर्माण झाला

**फपुळला** (ना.)– धूळ, बारीक माती

**फर्मायी** (क्रि.)– आदेशली, आज्ञा केली, हुकूम केला

**फर्मायो** (क्रि.)– आदेशला, आज्ञा केला, हुकूम केला

**फरकन** (क्रि.वि.)– जोरात, एकदम जोरात

**फरकांड** (ना.)– फरकंड, फरपटत नेल्याचे चिन्ह, सापाची फरकंड

**फरफर** (क्रि.वि.)– जोरात, फरफर असा आवाज

**फरदळी** (ना.)– पऱ्हाटी किंवा ज्वारीच्या धांड्याला नवीन फांद्या फुटणे

**फरसी** (ना.)– फारशी, इराणमधला रहिवासी

**फरसी** (ना.)– फर्शी, फरशी, दगडी चीप

**फरारा** (ना.)– विस्कटलेले डाग, अस्ताव्यस्त डाग

**फर्राट** (वि.)– बदमाश, बदचलन, कुकर्म करणारा/करणारी

**फलाणी** (वि.)– अमूक, दुसरी

**फलाणेको/फलाणेखे** (वि.)– दुसऱ्याला/दुसऱ्याचा

**फलाणो** (वि.)– अमूक, दुसरा, परका, अपरिचित

**फस** (क्रि.)– अडकून पड, रुतून पड

**फसनखे** (क्रि.वि.)– फसायला, अडकून पडायला

**फसय** (क्रि.)– फसतो, अडकून पडतो

**फसावनखे** (क्रि.)– फसवायला, अडकून पाडायला, बर्बाद करायला

**फसावय** (क्रि.)– फसवितो, अडकवितो, बुडवितो, गोत्यात आणतो/आणते

**फसी** (क्रि.)– रुतून बसली,

फसली, गाडी चिखलात फसली
**फसी** (क्रि.)- फसली, अडकली, गोत्यात आली, मुलगी प्रेमात
**फसीती** (क्रि.)- फसली होती
**फसीन** (क्रि.)- फसलेत, अडकून पडलेत, गोत्यात आले
**फसीनतीन** (क्रि.)- फसले होते, अडकून पडले होते
**फसोन** (क्रि.)- फसाल, गुंतून पडाल, जाळ्यात सापडाल
**फस्यो** (क्रि.)- फसला, अडकला
**फस्योतो** (क्रि.)- फसला होता, अडकला होता, जाळ्यात सापडला होता
**फळफळ** (क्रि.वि.)- फडफड, पंखांची फडफड
**फळा** (ना.)- झाडू, केरसुणी, शिंदीच्या झाडाच्या पानांचा झाडू, खडूने लिहिण्याची शाळेतील मोठी लाकडी फळी
**फाक** (ना.)- फोड, फळाचा लांबट तुकडा
**फाकणे** (क्रि.)- परागंदा होणे, नाहिसे होणे, आभाळ फाकले
**फाकणे** (क्रि.)- अंतर पडणे, एखादे फळ ताणल्याने फाकते अर्थात त्यात अंतर पडते
**फाकय** (क्रि.)- नाहीसा होतो
**फाग** (ना.)- फाल्गुन, हिंदू वर्षाचा बारावा महिना
**फारकती** (क्रि.वि)- घटस्फोट, सोडचिठ्ठी, ताटातूट
**फावळा** (वि.)- वाकडा, वाकडे पाय
**फावळा** (ना.)- पावडे, फावडे, शेत किंवा माती ओढण्याचे खोरणे
**फावळेपायकी** (वि.)- चालताना सरळ पाय पडत नसलेली, वाकड्या पायाची
**फासय** (क्रि.)- फसवितो, ठगवितो, अडकवितो
**फाळ** (ना.)- नांगराचे लोखंडी पाते
**फाळ** (ना.)- फाड, तुकडे कर, कागद फाडून टाक
**फाळनखे** (क्रि.वि.)- फाडण्यासाठी, तुकडे करण्यासाठी
**फाळय** (क्रि.)- फाडतो
**फाळी** (क्रि.)- फाडली
**फाळोन** (क्रि.)- फाडाल
**फाळ्यो** (क्रि.)- फाडला, टरकावला
**फिक्कट** (वि.)- फिका, रंग उडालेला

**फिक्की** (वि.)- फिकी, निस्तेज
**फिक्को** (वि.)- फिका, निस्तेज
**फिकर** (भाववाचक नाम, क्रि. वि.)- फिकीर, काळजी, चिंता, कळकळ, विचार
**फिक्की** (वि.)- तिखट आणि गोड कमी असणे, नीरस
**फिटनखे** (क्रि.वि.)- फेडायला, ऋण फेडायला मन मोठे असावे लागते
**फिटय** (क्रि.)- फिटते, सुटते, निरसन होते, फेड होते
**फिट्टमफाट** (क्रि.)- देणे घेणे, बरोबर, सगळे व्यवस्थित
**फिटायी** (क्रि.)- फिटविली, देणेघेणे बरोबर केले, फेड केली
**फिटायी** (क्रि.)- नरमवली, सरळ केली
**फिटायो** - फिटविला, देणेघेणे बरोबर केले
**फिटावय** (क्रि.वि.)- देणेघेणे बरोबर करतो
**फिटावय** (क्रि.)- बदला घेतो
**फिटी** (क्रि.)- फिटली, रक्कम फिटली
**फिट्यो** (क्रि.)- फिटला, कर्ज फिटले
**फिदा** (क्रि.वि.)- आसक्त, आशक
**फिदीफिदी** (क्रि.वि.)- वेड्यासारखे हसणे, कुत्सित हसणे
**फिदीफिदी** (क्रि.वि.)- खिदीखिदी, खिदीखिदी हसला
**फिरकखे** (क्रि.वि.)- फिरून, फिरून तर पहा
**फिरकय** (क्रि.)- फिरतो, भटकतो, येतो, येऊन जातो
**फिरकी** - येऊन गेली
**फिरकी** - मजा घेणे
**फिरकीती** - फिरकली होती, येऊन गेली होती
**फिरकोन** - फिरकाल, याल, एखादा चक्कर टाकाल
**फिरक्यो** - फिरकला, येऊन गेला
**फिरक्योतो** - फिरकला होता, येऊन गेला होता
**फिरखे** - फिरून, इकडे फिरून पहा
**फिरखके** - फिरून, इकडे फिरून पहा
**फिरय** - फिरतो, घुटमळतो, हिंडतो
**फिरय** - बदलतो, रंग बदलतो, स्थिर नाही
**फिरस्ती** (वि.)- फिरणारा,

अस्थिर
**फिरस्तीपर** (क्रि.वि.)– फिरायला
**फिरस्तीबुवा** (वि.)– एक फिरणारा संत, भटकणारा माणूस
**फिरायी** (क्रि.)– फिरविली, तव्यावर भाकर फिरविली
**फिरायी** (क्रि.)– बदलली, जबान बदलली
**फिरायो** (क्रि.)– फिरविला, शब्द फिरविला
**फिराव** (क्रि.)– फिरव, इकडे तिकडे फिरव
**फिरावजो** (क्रि.)– फिरवशील, बनवशील
**फिरावजो** (क्रि.)– बदलवशील, तव्यावर भाकर फिरव
**फिरावनखे** (क्रि.वि.)– फिरविण्यासाठी, फिरवायला
**फिरावय** (क्रि.)– फिरवितो, बदलवितो, शब्द बदलतो, बदलवितो
**फिरावोन** (क्रि.)– फिरवाल, बनवाल, फसवाल
**फिरेम** (ना.)– फ्रेम, चौकट
**फिसकटणे** (क्रि.)– तुटणे, मोडणे
**फिसकय** (क्रि.)– फसणे, अपयश होणे, फिसकटणे
**फिसकी** (वि.)– घाबरट, भित्री, भयभीत होणारी
**फिसको** (वि.)– भित्रा, डरपोक, भयभीत होणारा
**फिसक्यो** (क्रि.)– तुटला, फिसकटला, सौदा फिसकटला
**फुकटको** (वि.)– फुकटचा, विनामूल्य, विनामोबदला प्राप्त होणारे, मोफतचे
**फुकटचंद** (वि.)– फुकटचे खाणारा, ऐतखाऊ
**फुकणी** (ना.)– दुष्काळ, उणीव
**फुकणी गिरी** (क्रि.)– दुष्काळ पडला, अति उणीव
**फुकणे** (क्रि.)– फुंकणे, तोंडाने वारा घालणे
**फुकय** (क्रि.)– फुंकतो, तोंडाने वारा घालतो
**फुकी** (क्रि.)– फुंकली, पेटवली, आग लावली
**फुको** (वि.)– फुकटचे, विनामूल्य, मोबदल्याशिवाय
**फुको** (क्रि.)– फुंका, तोंडाने वारा घाला
**फुको** (क्रि.)– पेटवा, भांडणे लावा, आग लावा
**फुगनखे** (क्रि.वि.)– फुगायला, रागवायला, रुसायला
**फुगय** (क्रि.)– रागावतो, रुसतो,

रुसून बसतो

**फुगाफुगी** (ना.)– रुसवा, रुसवी

**फुगी** (क्रि.)– रुसली, रागाने फुगटली

**फुगोन** (क्रि.)– रुसाल, रुसून बसाल

**फुग्यो** (क्रि.)– रुसला, रागाने फुगटला

**फुटकी** (वि.)– फुटलेली, तुटलेली, फुटकी बशी

**फुटकी** (वि.)– आंधळी, दृष्टी नसलेली

**फुटको** (वि.)– आंधळा, दृष्टी नसलेला

**फुटको** (वि.)– फुटका, तुटका, फुटका कप

**फुटी** (क्रि.)– फुटली, तडा गेला, तुकडे झालेत

**फुटी** (क्रि.)– दूर गेली, दूर झाली, दुरावली

**फुटीती** (क्रि.)– फुटली होती, बाटली फुटली होती

**फुटीती** (क्रि.)– दुरावली होती, दूर गेली होती

**फुटीन** (क्रि.)– फुटलेत, दुरावले, दूर गेलेत, नाते तोडून दूर गेले

**फुटीनतीन** (क्रि.)– फुटले होते, डोळे फुटले होते

**फुटीनतीन** (क्रि.)– दूर गेले होते, दुरावलेत, दगाबाजी केली, पक्ष सोडून दूर गेले

**फुटोन** (क्रि.)– फुटाल, दूर व्हाल, दुरावाल

**फुट्यो** (क्रि.)– फुटला, दूर गेला, दुरावला, नाते विसरून दूर गेले

**फुपा** (ना.)– बापाच्या बहिणीचा नवरा, आत्याचा नवरा, मामा

**फुपू** (ना.)– बापाची बहीण, आत्या, बुवा

**फुपेसासू** – बायकोची आत्या

**फुपेसुसरो** – बायकोच्या आतेचा भाऊ

**फुरका** (ना.)– भुरका, जेवताना पातळ पदार्थ हाताने भुरका मारून खाणे

**फुरसांड** (ना.)– पुरासोबत सुरुवातीला वाहत आलेला कचरा, लाकूडफाटा, काट्या वगैरे

**फुलनखे** (क्रि.वि.)– फुलायला, फुले फुलायला सुरुवात झाली

**फुलने** (क्रि.)– उमलणे, विकसणे

**फुलय** (क्रि.)– फुलतो, विकसित होतो, मोगरा फुलतो

**फुलय** (क्रि.)– आनंदी झाला, मुलगा आनंदाने फुलला

**फुलयफळय** - फुलते फळते, संसार फुलतो

**फुली** (क्रि.)- फुलली, आनंदाने फुलली

**फुली** (क्रि.)- फुलली, जाईची वेल फुलली

**फुसकी** (वि.)- निरर्थक, टाकाऊ

**फुसकी** (क्रि.वि.)- हळूच कानात सांगणे, सावधपणे केलेली निंदा

**फुसको** (वि.)- न फुटणारा, निरर्थक, फटाका फुसका निघाला

**फूक** (क्रि.ना.)- भांडण लाव

**फूक** (क्रि.)- फुंक, पेटव

**फुलगोबी** - फुलकोबी, एक प्रकारची भाजी

**फेकफाक** - फेकझोक, अस्ताव्यस्त करणे

**फेंड** (ना.)- ढुंगण, टिरी, कुल्ला

**फेंडा** (ना.)- ढुंगण, टिरी, कुल्ला

**फोकाटा** (ना.)- शिंदीच्या झाडाची फांदी

**फोत्रा** (ना.)- टरफल, साल, शेंगांचे टरफल

**फोळ** - नाम

**फोळ** (क्रि.)- फोड, तुकडे कर, उद्ध्वस्त कर

**फोळ** (क्रि.वि.)- दुरावा निर्माण कर, एक दुसऱ्यापासून दूर कर

**फोळनखे** (क्रि.वि.)- फोडायला, उद्ध्वस्त करायला

**फोळफाळ** (क्रि.वि.)- फोडफाड, उद्ध्वस्त, विनाश, धिंगाणा

**फोळय** (क्रि.)- फोडतो, तोडतो, दुरावा निर्माण करतो, ताटातुटी घडवून आणतो

**फोळय** (क्रि.)- फोडतो, सुपारी फोडतो

**फोळा** (ना.)- फोड, गळू

**फोळाफोळी** - फोडाफोडी, दुरावा निर्माण करण्याचे काम

**फोळी** (क्रि.)- फोडली, तुकडे केलेत, तोडली

**फोळोन** (क्रि.)- फोडाल, बेबनाव निर्माण कराल, दुरावा निर्माण कराल

**फोळ्योतो** (क्रि.)- फोडले होते, दुरावा निर्माण केला होता, एकमेकांपासून माणसे दूर केली होती.

***

# ब

**बईल** (ना.)- बैल, वृषभ, खोंड
**बकय** (क्रि.)- बडबडतो, तोंडास येईल ते बोलत सुटतो, वटवटतो, अर्थशून्य बोलतो, खोटे बोलतो
**बकरबकर** (क्रि.वि.)- अति घाईने
**बकरबकर (खाणे)** (क्रि.वि.)- लवकर लवकर खाणे, खात सुटणे, अधाशासारखे खाणे
**बकरा** (ना.)- बोकड, करडू
**बकरा** - एक शिवी, वऱ्हाडी बोलीतील शब्द
**बकी** (क्रि.)- तोंडास येईल ते बोलली, बडबडली, वटवटली, अर्थशून्य बोलली
**बक्यो** (क्रि.)- तोंडास येईल ते बडबडला, वटवटला
**बखत** (क्रि.वि.)- वेळ, काळ
**बखतपर** (क्रि.वि.)- वेळेवर, अचूक वेळेवर
**बख्खर** (ना.)- वखर, जमीन साफ करणारे कुळव
**बख्खरपरको** - मूर्ख
**बख्खरपरको गोटा** (ना.)- वखरावरचा दगड
**बख्खरपरको गोटा** (वि.)- अडाणी माणूस, मूर्ख माणूस
**बख्खल** (ना.)- गुच्छ, खूप
**बखत** (क्रि.वि.)- वेळ, काळ, प्रसंग, संधी
**बखतकी बात** (ना.)- वेळेची गोष्ट, प्रसंगाची गोष्ट
**बखतपर** - वेळेवर, अचूक वेळेवर
**बखतसाधू** (वि.)- संधिसाधू, दगाबाज, धोकेबाज, धूर्त, बदमाश
**बखरी** (क्रि.)- वखराने जमीन सपाट केली
**बखाळ** (क्रि.वि.)- बखाड, अति, अडचण, दुष्काळ, अवर्षण
**बखोटा** (ना.)- खांद्याचा सांधा
**बख्या** (ना.)- बाहू, दंड
**बगदा** (ना.)- मोठा घास
**बगर** (शब्दयोगी अव्यय)- शिवाय, वाचून
**बंगरश्या** (वि.)- अजागळ, खुळा, वेडसर
**बगाईत** (ना.)- बागाईत, ओलिताची शेती
**बगायती** (वि.)- बागायती, बागायती शेती, ओलिताची शेती

**बगार** (ना.)- वगार, म्हशीची पारडी, रेडी, म्हशीचे पिल्लू

**बगाव** (क्रि.)- वागव, सांभाळ, संगोपन कर

**बगावनखे** (क्रि.वि.)- वागवायला, सांभाळायला, संगोपन करायला

**बगावय** (क्रि.)- वागवतो, सांभाळतो, संगोपन करतो

**बगावो** (क्रि.)- वागवा, सांभाळा, संगोपन करा, योग्य संसार करा

**बघार** (क्रि.)- फोडणी दे

**बघारणी** (ना.)- तेलाची किंवा तुपाची फोडणी, भाजीची फोडणी देणे

**बचक** (क्रि.वि.)- वचक, धाव, दबदबा, दरारा, वजन, घाईने, उदा. बचकबचक जेवतो

**बचकभर** (वि.)- अगदी थोडे, मूठभर, ओंजळभर

**बचत नही** (क्रि.)- वाचू शकत नाही

**बचपना** (भाववाचक ना.)- लहानपण, बालपण

**बचय** (क्रि.)- वाचतो, जिवंत राहतो

**बचय** (क्रि.)- शिल्लक राहतो, जमा राहतो, पैसा शिल्लक राहतो

**बचरबचर** (क्रि.वि.)- विनाकारण वटवट, मध्ये मध्ये बोलणारा

**बचाई** (क्रि.)- वाचविली, बचत केली

**बच्च्या** (ना.)- लहान मूल

**बचायो** (क्रि.)- वाचला

**बचायो** (क्रि.)- वाचविले, वाचविला, वाचविली

**बचाव** (क्रि.)- जिवंत ठेव, वाचव, शिल्लक ठेव, जसाचा तसा ठेव

**बचावय** (क्रि.)- वाचवितो, जिवंत ठेवतो, शिल्लक ठेवतो

**बचावो** (क्रि.)- वाचवा, जीव वाचवा, शिल्लक ठेवा

**बची** (क्रि.)- वाचली, जिवंत राहिली, शिल्लक राहिली

**बचीन** (क्रि.)- वाचलेत, जिवंत राहिलेत

**बचो** (क्रि.)- वाचा, जिवंत रहा, जसेचे तसे रहा

**बच्यो** (क्रि.)- वाचला, वाघाच्या तावडीतून वाचला

**बजय** (क्रि.)- वाजते, बोभाटा होतो, आवाज होतो

**बजायी** (क्रि.)- वाजविली, आवाज केला

**बजायी** (क्रि.)- मारले, झोडले, पिटाई केली
**बजायो** (क्रि.)- वाजविले, वाजविली, सनई वाजविली
**बजायो** (क्रि.)- मारले, झोडली, पिटाई केली
**बजार** (ना.)- बाजार, हाट
**बजार** - गोंधळ, अव्यवस्था
**बजाव** - वाजव
**बजाव** - हाण, मार, पिटाई कर
**बजावनखे** (क्रि.वि.)- वाजवायला
**बजावय** - वाजवितो
**बजावय** (क्रि.)- मारतो, पिटाई करतो, झोडतो
**बजावो** (क्रि.)- वाजवा
**बजावो** (क्रि.)- हाणा, मारा, मारझोड करा, पिटाई करा
**बजीनतीन** (क्रि.)- वाजले होते, अमूक अमूक वेळ झाली होती.
**बट** (ना.)- लट, केसांच्या जटा, केसांची बट
**बट** (ना.)- कांस्याचे गोल आकाराचे भांडे, पूर्वी यात डाळ शिजवीत असत
**बटकी** (ना.)- दासी, प्राचीनकालीन शब्द, नोकरानी
**बटकी** (ना.)- वाटी, लहान कटोरी
**बटबट** (क्रि.वि.)- अस्ताव्यस्त, कसेतरी, खूपच
**बटलई** (ना.)- पाणी तापविण्याचे मोठ्या तोंडाचे भांडे
**बटाई** (ना.)- वाटणी, पिकाची वाटणी ठरवून दुसऱ्याला लागवडीला शेत देणे
**बट्टा** (ना.)- डाग, कलंक
**बटाना** (ना.)- वाटाणा, मटार, एक द्विदल धान्य
**बट्टी** (ना.)- वडी, कापुराची वडी
**बठ** (क्रि.)- बैस
**बठनखे** (क्रि.वि.)- बसायला
**बठनो** (क्रि.)- बसणे, खाली बूड टेकणे
**बठबो** (क्रि.)- बसुया
**बठय** (क्रि.)- बसतो
**बठी** (क्रि.)- बसली,
**बठी** (ना.)- स्त्रीची मासिक पाळी
**बठेबठे** (क्रि.वि.)- बसल्या बसल्या
**बठोन** (क्रि.)- बसाल
**बठ्यो** (क्रि.)- बसला
**बंडल** (क्रि.वि.)- खोटे, लबाडी, लुच्चेगिरी
**बंडल** (ना.)- गुंडाळू
**बंडलबाज** (वि.)- लबाड, खोटे

बोलणारा, लुच्चा
**बतायी** (क्रि.)– सांगितले, कथन केले
**बतायो** (क्रि.)– सांगितले, कथन केले
**बताव** (क्रि.)– सांग, कथन कर, ऐकव
**बतावजो** (क्रि.)– सांगशील
**बतावणी** (ना.वि.)– लबाडी, ढोंग, थाप
**बतावत** (क्रि.)– सांगतात, ऐकवितात
**बतावनखे** (क्रि.वि.)– सांगायला
**बतावनेसे** (क्रि.वि.)– सांगितल्याने, सांगून सांगून काय होते?
**बतावय** (क्रि.)– सांगतो, कथन करतो
**बदबद** (क्रि.वि.)– भरपूर, विपुल, पुष्कळ, खूप, अति, जास्त
**बंदरा** (ना.)– वानर, माकड
**बदळ** (क्रि.)– मार, झोड, हाण, पिटाई कर
**बदळय** (क्रि.)– मारतो, पिटाई करतो, झोडतो
**बदळी** (क्रि.)– मारले, पिटाई केली, झोडली
**बदळ्यो** (क्रि.)– मारले, पिटाई केली, झोडले
**बदुकला** (वि.)– लहानसा, ठेंगू, उंचीने कमी
**बनायो** – गटविला, फसविला, ठकविला
**बनावनखे** (क्रि.वि.)– बनवायला, तयार करायला
**बनावय** (क्रि.)– बनवितो, मूर्ख बनवितो, फसवितो, ठकवितो
**बनी** (ना.)– स्त्रीवाचक नाम
**बनी** (क्रि.)– बनली, तयार झाली, सिद्ध झाली
**बनी** (क्रि.)– फसली, मूर्ख ठरली, गटली
**बनेल** (वि.)– चालू, टग्या, कावेबाज
**बयकनखे** (क्रि.वि.)– बिघडायला, वाईट व्हायला, बिघडायला काही लागत नाही
**बयकय** (क्रि.)– बिघडतो, खराब होतो, खराब होते
**बयकी** (क्रि.)– बिघडली, खराब झाली, नासली
**बयक्यो** (क्रि.)– बिघडला, नासला, खराब झाला, वाया गेला
**बयखे** (क्रि.वि.)– वाहत, वाहून
**बयताळ** (वि.)– मूर्ख,

कुचकामी, निर्बुद्ध
**बयना** (ना.)- बहीण
**बयरट** (वि.)- बहिरा, बहिरी, कानाचे ऐकू न येणारे
**बयरी** (वि.)- बहिरी, कानाने ऐकू न येणारी
**बयरूप्या** - बहुरूपी, सोंग घेऊन नाचणारे
**बयरो** - बहिरा, कानाने ऐकू न येणारा
**बरकत** (क्रि.वि.)- बर्कत, लाभ, प्राप्ती, सिद्धी
**बरतन** (ना.)- भांडीकुंडी
**बरताव** (ना.)- स्वभाव, प्रकृतिगुण
**बरबटी** (ना.)- चवळी, चवळीची शेंग, एक भाजी
**बरबट्यो** - बरबटला, माखला, घाणेरडा
**बरस** (ना.)- वर्ष, साल
**बरस** (क्रि.)- कोसळ, पड, पाऊस कोसळतो
**बरसत** (क्रि.)- वर्षाव करतात, कोसळतात
**बरसकाला** (ना.)- पावसाळा, वर्षा ऋतूचा काळ
**बरसय** (क्रि.)- कोसळतो, पडतो, पाऊस पडतो
**बरसात** (ना.)- पावसाळा, वर्षा ऋतूचा काळ
**बरसात** (ना.)- वर्षाव, वृष्टी
**बरसाद** (ना.)- पावसाळा, वर्षा ऋतू
**बरसादी** (वि.)- पावसाळी
**बरसी** (क्रि.)- कोसळली, तुटून पडली
**बरसोन** (क्रि.)- कोसळाल, वर्षाव कराल, वृष्टी कराल
**बरस्यो** (क्रि.)- कोसळला, वर्षाव केला, वृष्टी केली
**बरळ** (धा.ना.)- ओरड, असंबद्ध भाषण, भलतेसलते बोलणे
**बरळय** (क्रि.)- बडबडतो, अर्थशून्य बोलतो, भलतेसलते बोलतो
**बरात** (ना.)- वरात, लग्नाची वरात
**बरात** (ना.)- धिंड, धिंड काढणे
**बरात जेवण** - वरात आल्यानंतरचे जेवण
**बराती** (ना.)- वराती, वरातीसोबतचे
**बरी** (वि.)- चांगली, ठीक, व्यवस्थित, बरी आहेस ना?
**बरे** (वि.)- चांगले, ठीक, समाधानकारक, व्यवस्थित, बरे

आहात ना?

**बरो** (क्रि.वि.)– बरा, ठीक, व्यवस्थित, समाधानकारक, बरा आहेस ना?

**बरोचबरो** (वि.)– वाईट, बरेच बरे, (वाईट या अर्थी)

**बर्रास** (वि.)– बरास, शंभर चौरस फूट, शंभर घनफूट

**बला** (क्रि.वि.)– आपत्ती, संकट, विपत्ती, दुर्दशा, अडचण

**बल्लमककळी** (ना.)– मोठी काकडी

**बल्ली** (ना.)– बारीक लांब खांब

**बव्हय** (क्रि.)– वाहतो, झरा वाहतो, नदी वाहते

**बस** – पुरे, ठीक

**बसरा** (ना.)– वासरू, गाईचे पिल्लू

**बस्तर** (वि.)– खराब, निकृष्ट दर्जाचे

**बस्तरवार** – गुरुवार

**बस्ता** – गाठोडे, गठ्ठा

**बस्तान** – जम, व्यवस्था

**बस्सर** (वि.)– आटोक्यात, कह्यात

**बहायी** (क्रि.)– वाहवली, वाहत गेली

**बहायी** (क्रि.)– वाया गेली, चारित्र्यभ्रष्ट झाली

**बहायो** (क्रि.)– वाया गेला, चारित्र्यभ्रष्ट झाला

**बहावय** (क्रि.)– वाहवत जातो, जाते

**बहावय** (क्रि.)– वाम मार्गाला लागतो/लागते

**बहीणभाई** (ना.)– बहीणभाऊ

**बहु** (ना.)– सून, मुलाची बायको

**बहु** (वि.)– पुष्कळ, खूप, अनेक, व्यापक, अतिशय

**बळ** (ना.)– वटवृक्ष, वड वृक्ष

**बळ** (ना.)– शक्ती, ताकद

**बळबळ** (क्रि.वि.)– बडबड, अनावश्यक बोलणे, वटवट

**बळती** (वि.)– वाढणारी, प्रगती, मोठी होणारी

**बळतोच** – वाढणारा, वाढ होणारा

**बळनखे** (क्रि.वि.)– वाढायला, मोठे व्हायला, रोपे वाढायला सुरुवात झाली

**बळबळ्या** (वि.)– वाष्फळ बोलणारा, वटवटणारा

**बळय** (क्रि.)– वाढतो, वाढते, पाऊस वाढतो, वय वाढते

**बळला** (क्रि.ना.)– बरडे, डोक्यातील बारीक जंतू

**बळा** (ना.)– वडा, तेलातून तळलेला खाण्याचा पदार्थ

**बळायो** (क्रि.)– मोठे केले,

झाड, मोह

**मोळ** (ना.)– मोड, कोम, अंकुर

**मोळ** (ना.)– भंगार, (वऱ्हाडी बोलीत), मोडतोड झालेले सामान

**मोळ** (क्रि.)– तोड, तुकडे कर

**मोळणखे** (क्रि.वि.)– मोडायला

**मोळणी** (क्रि.)– मोडणे

**मोळनखे का जाय?** (क्रि.)– मोडायला काय जाते?

**मोळनखे का लगय?** – मोडायला काय लागते?

**मोळय** (क्रि.)– तुटतो, मोडतो

**मोळशी** (ना.)– मोडशी, रेच, एक आजार, लहान बाळाला हगवण लागणे

**मोळामोळी** (क्रि.वि.)– मोडामोडी, मोडतोड

**मौर** (ना.)– शिंदीच्या झाडाच्या कोवळ्या पिवळ्या पानांचा वरवधूंसाठी तयार केलेला मुकुट

***

# य

**यरंडा** (ना.)– एरंड, एक औषधी झाड

**यहाँ** (क्रि.वि.)– येथे, या ठिकाणी, या स्थळी

**यहाँकी** – येथील, या ठिकाणची, या स्थळाची

**यहाँलग** (क्रि.वि.)– येथपर्यंत, या स्थळापर्यंत, या प्रसंगापर्यंत

**यहाँसा** (क्रि.वि.)– येथे, या स्थळी, या ठिकाणी

**यहाँसे** (क्रि.वि.)– येथून, या वेळेपासून, या ठिकाणापासून

**यळका** (ना.)– एडका, मेंढ्याची एक जात, एक शाकाहारी प्राणी

**यळपट** (वि.)– मूर्ख, वेडा, निर्बुद्ध

**या** (सर्वनाम)– ही, स्त्रीला उद्देशून

**या** (क्रि.)– यावे, बोलावणे या अर्थी

**याद** (ना.)– आठवण, स्मरण

**यादने** – आठवणीत, आठवणीमध्ये

**याद ले** (क्रि.)– आठवण घे, आठव, स्मरण कर

**यादसे** – आठवणीने, स्मरणाने

**यादे** (ना.)– आठवणी

**यार** (ना.वि.)- जार
**यार** (ना.)- जिवलग मित्र, दोस्त, स्नेही
**यारनी** (वि.)- जार कर्म करणाऱ्या
**यारीन** (वि.)- जार कर्म करणारी
**यित्रावणे** (क्रि.)- मटकणे, ठाकणे, मिरवणे
**यिरय** (क्रि.)- विरते, विरतो, थकतो
**यिरी** (क्रि.)- विरली, थकली, मुरली, स्वस्थ बसली
**यिरीन** (क्रि.)- थकलेत, विरलेत, मुरलेत
**ये** (सर्वनाम)- हे, हे लोक
**येक** (वि.)- एक, १ ही संख्या, संख्यावाचक शब्द
**येकी** (स.)- याची, ह्याची
**येकी** (ना.)- ऐक्य, एकोपा, एकजूट
**येकेकठे** (शब्दयोगी)- याच्याजवळ, याच्याकडे
**येकेझगा** - याच्याजवळ, याच्यापाशी, याच्याकडे
**येकेपर** - याच्यावर, याच्यावर जबाबदारी आहे
**येकेपरस** - याच्यापेक्षा, याच्याहून
**येकेपरसे** - याच्यावरून, यावरून, हे सिद्ध होते, याच्या अंगावरून
**येकेने** - याच्याकडून, याच्याने
**येकेवाली** (वि.)- याची, याची नातलग
**येकेवालो** (वि.)- याचे, याचे नातलग
**येकेसे** (स.विभक्ती प्रत्यय)- याच्याकडून, याच्याने
**येको** (स.)- याचा, ह्याचा
**येको** (स.)- याचा, ह्याचा
**येकोतो** - याचे तर
**एखांदी** (वि.स्त्री.)- एखादी, कोणीतरी
**येखांदिने** (वि.)- एखादीने
**एखांदी** (वि.स्त्री.)- एखादी, कोणीएक
**येखांदे** - एखादे
**येखांदो** (पु.)- एखादा, कोणीएक
**येखे** - याला
**येखेपर** - याच्यावर
**येखेसे** - याच्यापेक्षा
**येखेसे** - याच्याकडून
**येंगरठी** (वि.)- बावळट स्त्री, मूर्ख, अति मागासलेली
**येंगरठ्या** (वि.)- बावळट पुरुष, अति मूर्ख
**येना** (ना.)- वेणा, प्रसूतिवेदना
**येन्यांग** (क्रि.)- इकडे

**येन्यांगकी** (क्रि.वि.)- इकडची
**येन्यांगसे** (क्रि.वि.)- इकडून
**येने** - याने, हिने
**येम** (ना.)- यम, कर्दनकाळ
**येरझारा** (ना.)- अनावश्यक फिरणे, उगीच इकडून तिकडे करणे, हेलपाटा
**येरी** (क्रि.वि.)- सहजच, उगाच
**येरीच** (क्रि.वि.)- उगाच, अकारण, सहज
**येरीमेरी** (ना.)- भांडणावर, दोघांत कुरबूर
**येरू** (ना.)- वेळू, बांबू
**येऱ्यागेऱ्या** (वि.)- क्षुल्लक, बावळट, अक्कल नसलेला, गबाळा
**येलपाळी** (वि.)- खोटे वागणारी, नाटके करणारी
**येलय** (क्रि.ना.)- नखरे करतो, अकारण मिरवतो, खोटे खोटे वागतो/वागते
**येल्लाय रही** (क्रि.)- नखरे करीत आहे, ठाकत आहे
**येल्लावय** - नखरे करतो, नखरे करते
**येली** (क्रि.)- मिरवली, नखरे केलेत
**येळझवन्या** (वि.)- अति मूर्ख, वेडसर, एक शिवी
**येळूमेळू बापबेटा साळू** (क्रि.वि.)- बनवाबनवी, सर्वत्र लबाडी
**येळूमेळू बापबेटा साळू** (क्रि.वि.)- कशाचा कशाशी ताळमेळ नसणे
**येळेपिसो** (वि.)- वेडा, माथेफिरू, भ्रमिष्ट
**यो** (स.)- हा, सर्वनाम, पुल्लिंगी दर्शक सर्वनाम
**योतं** (स.उभयान्वयी अव्यय)- हा तर, हा माणूस तर

***

# र

**रई** (ना.)- रवी, दह्यात पाणी घालून घुसळण्याचे लाकडाचे किंवा स्टीलचे साधन
**रई** (क्रि.)- राहिली
**रई लगाई** (क्रि.)- दह्यात पाणी घालून घुसळण्याची क्रिया पूर्ण केली
**रईस** (वि.)- श्रीमंत, जहागीरदार
**रईस** (वि.)- रहीस, आळशी, ऐतखाऊ, कंटाळा करणारा
**रकत** (ना.)- रक्त, रुधिर

**रकतलोचय** (क्रि.)- रक्त पितो, रक्त प्राशन करतो

**रक्तलोचय** (क्रि.)- शोषण करतो, खूप काबाडकष्ट करायला भाग पाडतो

**रकतसे** - रक्ताने, रक्ताने इतिहास लिहिला

**रखरख** (वि.)- शुष्क, कोरडाठाक

**रखेल** (वि.)- ठेवलेली, रखेली, उपपत्नी

**रखोन** (क्रि.)- ठेवाल, सांभाळाल

**रग** (भाववाचक नाम)- मस्ती, ताठा, माज, गुर्मी, गोर, मगरुरी

**रंगको बेरंग** (क्रि.वि.)- रंगाचा बेरंग, विनाश, सत्यानाश, धिंगाणा

**रगत** (ना.)- रक्त, रुधिर

**रगतपिती** (ना.)- कुष्ठरोग, रक्तपिती, महारोग

**रंगय** (क्रि.)- रंगतो, रंग चढतो, मौज होते

**रंगरूट** (वि.)- छंदीफंदी, गुलहौशी

**रगळणे** (क्रि.)- रगडणे, चोळणे

**रगळय** (क्रि.)- रगडतो, चोळतो, चेपतो

**रगळी** (क्रि.)- रगडली, चोळली, चेपली

**रंगायी** (क्रि.)- रंगविली

**रंगायो** (क्रि.)- रंगविला, रंग दिला

**रंगावणे** (क्रि.)- रंग देणे

**रगाळा** (ना.)- कामाचा व्याप

**रंगायो** (क्रि.)- रंगविले, रंग दिला, रंग लावला

**रंगाव** (क्रि.)- रंगव, रंग लाव, रंग दे

**रंगावय** (क्रि.)- रंगवितो, रंग लावतो

**रंगी** (क्रि.)- रंगली, रंगाने रंगली

**रंगी** - आनंदात गढून गेली

**रंगी** - वाया गेलेली मुलगी

**रग्गायो** (क्रि.)- माजला, मत्तावला

**रग्गेल** (वि.)- माज आलेला, मस्तवाल, गर्विष्ठ

**रंग्या** (वि.)- रंगलेला, रंगाने माखलेला

**रंग्या** (ना.)- व्यक्तिवाचक नाम, पुरुषवाचक नाम

**रच** (क्रि.)- ढीग लाव, जुळव, एकावर एक ठेव

**रचणे** - मांडणे

**रचय** (क्रि.)- ढीग लावतो, जुळवतो, एकावर एक ठेवतो

**रचारची** - मांडामांडी

**रचो** (क्रि.)- ढीग लावा, मांडणी

करा, जुळवा, रचा, एकावर एक ठेवा, व्यवस्थित ठेवा

**रजई** (स्त्री., ना.)– रजाई, रुई भरून शिवलेले पांघरण्याचे साधन

**रंडवा** (स्त्री., वि.)– विधवा, वैधव्य प्राप्त झालेली

**रंडवा भयी** (क्रि.)– विधवा झाली, पतीचे निधन झाले

**रंडवी** (वि.)– विधवा, पतीविरहित

**रंडी** (ना.वि.)– वेश्या, गणिका, कसबीण

**रतन** (ना.)– रत्न, एक मौल्यवान मणी

**रतन** (ना.)– मौल्यवान पदार्थ, सौंदर्यसंपन्न

**रंदा** (ना.)– रंधा, लाकूड साफ करण्याचे साधन

**रद्दी** (ना.वि.)– कुचकामी, निरुपयोगी कागद

**रंधावन** (ना.)– स्वयंपाकघर

**रंधावनने** (ना.)– स्वयंपाक घरात

**रंधुना** (ना.)– स्वयंपाक घर

**रंधुन्या** (वि.)– स्वयंपाक घरात रमणारा, बायकी

**रंधोण्या** (वि.)– स्वयंपाक घरात रमणारा, बायकी, बायकी वृत्तीचा माणूस

**रनरन** (क्रि.वि.)– एकसारखा उन्हातान्हात, एकसारखा भटकणारा, रानोमाळ

**रप** (क्रि.वि)– जोरात, रपकन मारले, एक जोराचा आवाज

**रपकन** (क्रि.वि.)– जोराने, जोराने मारणे

**रपाटा** (ना.)– रट्टा, प्रहार, गुद्दा, झोडपा

**रब्बर** (ना.)– रबर, एका विशिष्ट झाडाच्या चिकापासून तयार होणारा पदार्थ

**रंभा** (ना.)– मिरविणारी स्त्री, गुलहौशी स्त्री

**रमणे** (क्रि.)– गुंतणे, रेंगाळणे

**रमतगमत** (क्रि.वि.)– हळूहळू, कसलाही ताण न होता, मुक्त मनाने, रमत रमत

**रमय** (क्रि.वि.)– रमते, मन लागते, रेंगाळतो, तल्लीन होतो

**रमी** (क्रि.)– रमली, गुंतली, तल्लीन झाली

**रमी** – पत्त्यांचा खेळ

**रमी** (क्रि.)– सुखावली, गुंतली, तल्लीन झाली

**रम्यो** (क्रि.)– रमला, तल्लीन झाला, गुंतला, रेंगाळला

**रम्योतो** (क्रि.)– रमला होता, तल्लीन झाला होता

**रयत** (ना.)– प्रजा, जनता

**रयरयखे** (क्रि.वि.)– राहून राहून, थांबून थांबून

**रय रही** (क्रि.)– राहून राहिली, राहते

**रय रह्यो** (क्रि.)– राहून राहिला, राहतो

**रव** (क्रि.)– राहा, वास्तव्य कर

**रवय** (क्रि.)– राहतो, वास्तव्य करतो

**रवजो** (क्रि.)– राहशील, थांबशील, वास्तव्य करशील

**रवतोस त रव** (क्रि.)– राहतोस तर राहा

**रवना** (क्रि.)– राहनं, वास्तव्य कर, थांब

**रवनेवाली** (वि.)– राहणारी, वास्तव्य करणारी

**रवनेवाले** (वि.)– राहणारे, वास्तव्य करणारे

**रवनेवालो** (वि.)– राहणारा, वास्तव्य करणारा

**रवबोन** (क्रि.)– राहुयात

**रवरव** (ना.)– कणकण, खसखस, घसात खसखस करणे

**रवोनत रहो** (क्रि.)– राहाल तर राहा

**रव्हय** (क्रि.)– राहतो, थांबतो

**रसको** (ना.वि.)– रसाचा, रस भरलेला, रसभरित

**रसखे** (वि.)– रसाला, रस चाखायला, आंब्याच्या रसाला या

**रस्तापर** (ना. शब्दयोगी)– रस्त्यावर, रस्त्याने

**रह्योतो** (क्रि.)– राहिला होता

**रह्य रह्यो** (क्रि.)– राहत आहे, राहतो

**रहिती** (क्रि.)– राहिली होती

**रही** (क्रि.)– राहिली

**रहीन** (क्रि.)– राहिलेत

**रहीसुही** (वि.क्रि.)– उरली-सुरली, थोडीशी, काहीशी

**रहून** (क्रि.वि.)– राहणार, राहील

**रहेन** (क्रि.)– राहील, राहणार

**रहो** (क्रि.)– राहा, थांबा

**रहोंदे** (क्रि.)– राहू दे, असू दे, सोड पिच्छा

**रहोन** (क्रि.)– राहाल, वास्तव्य कराल

**रहोन का** (क्रि.)– राहणार काय

**रहोनखे** (क्रि.वि.)– राहण्यासाठी, राहायला, तो रहायला आला

**रहोना** (क्रि.)– राहा ना, वास्तव्य

करा ना

**रहोय** (क्रि.)- राहतो, वास्तव्य करतो, मुक्काम करतो

**रहोयना** (क्रि.)- राहतोस ना? थांबतोस ना?

**रह्यो** (क्रि.)- राहिला, थांबला, मुक्काम केला

**रह्योत रह्यो** (क्रि.)- राहिला तर राहिला, थांबला तर थांबला

**रहोस** (क्रि.)- राहतोस, थांबतोस, मुक्काम करतोस

**रहोसका** (क्रि.)- राहतोस का? मुक्काम करतोस का?

**रळको** (वि.)-रडवा, दुःखी, खिन्न, रडवेला, दुर्मुखलेला, रडक्या चेहऱ्याचा

**रळकोनी** (वि.)- रडकोनी, रडवेला, रडवेल्या चेहऱ्याची

**रळको भद्या** (वि.)- रडका कार्टा, वैतागून निघालेले शब्द

**रक्षय** (क्रि.)- रक्षण करतो, सांभाळ करतो, प्रतिपाळ करतो

**राक्केस** (ना.वि.)- राक्षस, अमानुष रूप असलेला, असुर, दानव

**राख** (क्रि.)- ठेव, सांभाळ, प्रतिपाळ कर

**राखणे** (क्रि.)- रक्षण करणे

**राखय** (क्रि.)- रखवाली करतो, ठेवतो, बाळगतो

**राखळ** (ना.)- राख, जळल्यानंतर उरलेला अवशेष

**राखी** (क्रि.)- ठेवली, राखली

**राखी** (ना.)- रक्षाबंधनाला बहीण भावाच्या हाताला बांधते तो सालंकृत दोरा

**राखो** (क्रि.)- ठेवा, सांभाळा, प्रतिपाळ करा

**राखोंडी** (ना.)- राखुंडी, गोवरीची राख

**राखोन** (क्रि.)- ठेवाल, बाळगाल, सांभाळाल

**रांग** (ना.)- ओळ, पंक्ती, समान दर्जा

**रांगणखे** (क्रि.)- रांगायला

**रांगय** (क्रि.)- हात व गुडघे टेकून पुढे सरकते

**रांगय खे** (क्रि.वि.)- रांगायला, बाळ रांगायला लागले, हात आणि गुडघ्यांचा आधार घेऊन पुढे सरकायला लागतो

**रागायी** (क्रि.)- रागावली, संतापली

**रागायो** (क्रि.)- रागावला, क्रोधावला, संतापला

**रागावनखे** (क्रि.वि.)-

रागावायला, संतापायला
**रागावो** (क्रि.)– रागवा, संतापा
**रागावोन** (क्रि.)– रागवाल, संतापाल
**रांगी** (क्रि.)– रांगली, हात आणि गुडघ्याच्या आधाराने पुढे सरकली
**रागू** (ना.)– राघू, तोता, पोपट
**रांगोयी** (ना.)– रांगोळी, शिरगोळ्याच्या पुडीने काढलेल्या रेखाकृती किंवा चित्र
**रांग्यो** (क्रि.)– हात व गुडघे टेकून पुढे सरकला
**राज** (ना.)– खेळताना पराभव
**राज** (वि.)– गुपित, गोपनीय
**राज** (ना.)– गवंडी, दगड–सिमेंटचे बांधकाम करणारा कारागीर
**राजकी** (वि.)– आतली
**राज की बात** – आतली गोष्ट
**राजगुरा** (ना.)– राजगिरा, बारीक तृणधान्य
**राजन** (ना.)– रांजण, पाणी साठविण्याचे मोठे तोंड असलेले मातीचे भांडे
**राजशाई** (वि.)– राजेशाही, वैभवशाली, रुबाब
**राजी** (वि.)– तयार, खूश, आनंदी, मान्य
**राजोट** (वि.)– मोठेपणा, कारकीर्द
**राठ** (वि.)– टणक, दांडगा, कडक
**रांड** (वि.)– विधवा (तिरस्कारार्थी शब्द)
**रांड** (वि.)– वेश्या, गणिका, वाम मार्गाने जाणारी, कुकर्म करणारी
**रांडकथान्या** (वि.)– एक शिवी, बायकांची निंदा करणारा
**रांडकी** (वि.)– विधवा, जिचा पती निवर्तला अशी स्त्री (तिरस्कारार्थी शब्द)
**रांडवा** – विधवा, जिचा पती निधन पावला अशी स्त्री (तिरस्कारार्थी शब्द)
**रांडोन्या** (वि.)– बाईलवेडा
**रात** (ना.)– रात्र, रजनी, निशा
**रातकी** (वि.)– रात्रीची
**रातके वखत** (क्रि.वि.)– रात्रीच्या वेळी, रात्री
**रातको** (क्रि.वि.)– रात्रीचा
**रातके बखत** (क्रि.वि.)– रात्रीच्या वेळी
**रातखे** (क्रि.वि.)– रात्री
**रातदिन** (क्रि.वि.)– रात्रंदिवस, चोवीस तास
**रातबेरात** (क्रि.वि.)– अपरात्री, रात्रीअपरात्री

**रांध** (क्रि.)- शिजव, भाजी तयार कर
**रांधणे** (क्रि.)- शिजवणे
**रांधनखे** (क्रि.वि.)- शिजवायला
**रांधय** (क्रि.)- शिजवते
**रांधोन** (क्रि.)- शिजवाल
**रांधी** (क्रि.)- शिजवली, भाजी तयार केली
**रांधो** (क्रि.)- शिजवा
**रानकी** (वि.)- रानाची, रानातली
**रानको** (वि.)- रानाचा
**रानने** - रानात
**रानबिलाई** (ना.)- रानमांजर, रानावनात राहणारी मांजर, रानटी मांजर
**रानबोक्या** (ना.)- रानात राहणारा बोका
**रानबोक्या** (ना.वि.)- ऐतखाऊ माणूस, खाऊन सुस्तावलेला
**रानभाजी** (ना.)- रानातली भाजी
**रानसे** (वि.)- रानाकडून, रानातून
**राबय** (क्रि.)- राबतो, कष्ट करतो, परिश्रम करतो
**रामफय** (ना.)- रामफळ, एक वृक्ष, एक फळ
**राय** (ना.)- राळ, एक ज्वालाग्राही पदार्थ, बंगाल व उत्तर भारतात असलेल्या शाल वृक्षाचा चीक
**राय** (भाववाचक नाम)- विचार, मत, सल्ला, मनोगत, अभिप्राय
**रायता** (ना.)- लोणचे, तिखट, मीठ, हळद, हिंग, मोहरी इत्यादी पदार्थ घालून खारवलेल्या आंब्याच्या किंवा लिंबाच्या फोडी
**रिकरिकायखे** (क्रि.वि.)- खूप क्रोधाने, आक्रमक होऊन, अतिशय क्रोधाने अंगावर चालून जाणे
**रिचोव** (क्रि.)- रिचव, ओत, टाक, सोड
**रितो** (वि.)- रिकामा, रिक्त
**रितोपण** (भाववाचक नाम)- रिकामपण
**रिवाज** (ना.)- प्रथा, परंपरा, पद्धत
**रुई** (ना.)- पिंजलेला कापूस
**रुई** (ना.)- रुईचे झाड
**रूकरूक** (भाववाचक नाम)- रुखरुख, चिंता, काळजी, टोचणी
**रूखो** (क्रि.)- थांबा, तेथेच थांबा, राहा
**रूखणे** (क्रि.)- थांबणे, रेंगाळणे
**रूखो** (वि.)- वाळलेला, कोरडा,

ठणठणीत

**रूखो तुकडा** (ना.)- वाळलेल्या भाकरीचा तुकडा

**रूखोसुको** - वाळलेला, शिळा

**रूंगायरांगाय** (क्रि.)- घुटमळणे, तेथून तेवढ्यात फिरणे, मागपुढे, मांजर घुटमळते

**रूंगायरांगाय करय** (क्रि.)- तेथल्या तेथे घुटमळतो

**रंगिलो** (वि.)- रंगरूट, छंदीफंदी

**रंगीन** (वि.)- रंगीत, रंग लावलेला

**रूंघावणखे** (क्रि.वि.)- घुटमळायला, मागेपुढे करायला

**रूंघावय** (क्रि.)- रेंगाळतो, घुटमळतो

**रूंघावय** (क्रि.)- मागेपुढे करतो, तेथून तेथेच घुटमळतो

**रूजणे** (क्रि.)- उगवणे, लागणे, कोंब येणे

**रूजय** (क्रि.)- रुजते, लागते, उगवते

**रूणझुणय** (क्रि.वि.)- रूणझुण आवाज करतो

**रूतणे** (क्रि.)- बोचणे, टोचणे, घुसणे

**रूतय** (क्रि.)- रुततो, बोचतो, टोचतो, खुपतो, घुसतो

**रूती** (क्रि.)- रुतली, बोचली, खुपली, टोचली

**रुतु** (ना.)- ऋतू, एक वर्षातील दोन महिन्यांचा कालखंड, एकूण सहा ऋतू-वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत, शिशिर

**रूत्यो** (क्रि.)- रुतला, टोचला, बोचला

**रूंदो** (वि.)- रुंद, आडवा

**रूप्या** (ना.)- रुपया, एक रुपया

**रूसत** (क्रि.)- रुसतात, अबोला धरतात

**रूसय** (क्रि.)- रुसतो, अबोला धरतो

**रूसणो** - अबोला धरणे, रुसणे

**रूसणोफुगणो** (क्रि.)- रुसणेफुगणे

**रूसी** (क्रि.)- रुसली

**रूसोन** (क्रि.वि.)- रागाने अबोला धराल

**रूस्यो** (क्रि.)- रुसला, रागाने अबोला धरला

**रूस्योतो** (क्रि.)- रुसला होता, नाराज झाला होता

**रेंगाळय** (क्रि.)- रेंगाळतो, घुटमळतो, रेंगाळते, मागे राहतो

**रेंगी** (ना.)- उंची, लांबी, रुंदी व वजनाने कमी असलेली बैलगाडी

**रेघ** (ना.)- ओळ, रेषा
**रेघा** (ना.)- रेषा, ओळी
**रेंदा** (ना.)- मळ, घाण, गढूळ पाणी
**रेंदा** (वि.)- कुचकामी, निरर्थक
**रैपट** (ना.)- चापट, थापट, थापडी
**रोई** (क्रि.)- रडली, शोक केला, रुदन केले
**रोईन** (क्रि.)- रडलेत, शोक केला
**रोचक** (वि.)- रुचकर, चवदार, स्वादिष्ट
**रोजकी** (वि.)- रोजची, नित्याची
**रोजकीच** (वि.)- रोजचीच, नित्याचीच
**रोजके रोज** (क्रि.वि.)- रोजच्या रोज, नियमित
**रोजकेच** (वि.)- रोजचेच, नित्याचेच
**रोजकोच** (वि.)- रोजचाच, नित्याचाच
**रोजकोच हय** (क्रि.वि.)- रोजचेच आहे
**रोजसे** (वि.)- रोजंदारीने
**रोटी** (ना.)- भाकर
**रोठ** (ना.)- जाड
**रोठ्या** (वि.)- मद्दड, मठ्ठ, ठोंब्या, मूर्ख
**रोडगा** (ना.)- बाटी
**रोयनी** (वि.)- रडकी
**रोयनी** (ना.)- रोहिणी नक्षत्र
**रोयो** (क्रि.)- रडला
**रोव** (क्रि.)- रड, शोक कर
**रोव** (क्रि.)- गाड, जमिनीत गाड, पूर, जमिनीत पूर
**रोवत** (क्रि.)- रडतात, शोक व्यक्त करतात
**रोवतो** (क्रि.वि.)- रडताना, त्याला रडताना पाहिले
**रोवनखे** (क्रि.वि.)- रडायला, शोक व्यक्त करायला
**रोवने** (क्रि.)- गाडणे, खुपसणे, खोचणे
**रोवनो** (क्रि.)- रडणे, शोक करणे
**रोवनो** (क्रि.)- जमिनीत गाडणे, खुपसणे, खोचणे
**रोवय** (क्रि.)- रडतो, रडते, शोक व्यक्त करतो/करते
**रोवय** (क्रि.)- गाडतो, पुरतो, खोचतो, खुपसतो
**रोवारोवी** (भाववाचक नाम, क्रि.) - एकाच वेळी अनेकांचे रडणे, रडारड, दु:खद प्रसंगाशी संबंधित रडणे
**रोवो** (क्रि.)- रडा, शोक व्यक्त करा

**रोवो** (क्रि.)- खुपसा, पुरा, खोचा
**रोवोन** (क्रि.)- रडाल
**रोवोन** (क्रि.)- खुपसाल, पुराल, खोचाल
**रोवोनखे** (क्रि.वि.)- पुरायला, गाडायला, जमिनीत गाडायला
**रोवोनखे** (क्रि.वि.)- रडायला, शोक व्यक्त करायला
**रोही** (ना.)- नीलगाय, शरीराने मोठी असलेली, हरिणाची एक जात, रानात, जंगलात वावरणारा एक प्राणी

***

# ल

**लईन** (ना.)- रांग, गर्दी
**लईन** (ना.)- रेषा, लाईन
**लईन** (ना.)- स्वभाव, वागणे, आचार
**लईनपर** (वि.)- चांगला, सरळ, व्यवस्थित, योग्य मार्गाने
**लत्तर** (ना.)- फाटलेले वस्त्र, जीर्ण वस्त्र
**लकळा** (ना.)- लाकूड, सरपण, काष्ठ
**लकळा** (वि.)- टणक, ताठ, शरीर लाकडासारखे ताठ झाले
**लखलखय** (क्रि.)- चमकते, लकलकते, लकाकते, उजेड पडतो
**लखवा** (ना.)- अर्धांगवायू, वातरोग, पक्षघात
**लग** - पर्यंत
**लगत** (क्रि.)- येतात
**लगत** (क्रि.)- लागतात, मार बसतो, त्रास होतो, झोंबतात, दगड लागतात
**लगनखे** (क्रि.वि.)- लागायला, झाडांना फळे लागायला सुरुवात झाली
**लगनखे** (क्रि.वि)- लागायला
**लगय** (क्रि.)- लागते, स्पर्श होतो
**लगय** - लागते, त्रास होतो
**लगलगा** (क्रि.वि.)- खूप घाईने, गडबडीने, खूप त्वरेने
**लगय** (क्रि.)- रुजते
**लगळा** (क्रि.वि.)- रगडा, कुचंबणा, दाटी
**लग्यो** (क्रि.)- लागले, रुजले
**लग्यो** (क्रि.)- लागले, काठीचे प्रहार लागले, बोललेला शब्द लागला
**लगलग** (क्रि.वि.)- खूप घाई, धांदल
**लगलगा** (क्रि.वि.)- खूप घाईने,

खूप त्वरेने, गडबडीने

**लगळ** (क्रि.)– रगड, चोळ, मालिश कर

**लंगळय** (क्रि.)– लंगडतो, वेडावाकडा चालतो

**लगळा** (वि.)– रगडा, गळचेपी, नाश, चुराडा,

**लंगळा** (वि.)– कमकुवत, मागे, अशक्त

**लंगळा** (वि.)– लंगडा, अपंग, पायाने अपंग, एका पायावर भार देऊन चालणारा

**लंगळी** (वि.)– लंगडी, पायाने अपंग असलेली

**लंगळी** (ना.)– लंगडी, एक खेळ विशेषत: मुली खेळतात

**लंगळी** (वि.)– कमकुवत, मागे, त्या कामात ती कमकुवत आहे

**लंगळो** (वि.)– लंगडा, पायाने अधू, अपंग

**लगाईन** (क्रि.)– लावले, झाड लावले

**लगाईन** (क्रि.)– हाणले, मारले, पिटाई केली

**लगायी** (क्रि.)– लावली, वेल लावली

**लगायी** (क्रि.)– हाणली, मारली, छडी मारली

**लगायो** (क्रि.)– लावले, चित्र लावले

**लगाव** (क्रि.)– सुरू कर, टी.व्ही. सुरू कर

**लगाव** (क्रि.)– बंद कर, लाव, दार बंद कर

**लगाव** (क्रि.)– हाण, मार

**लगाव** (क्रि.)– लाव, झाडाचे रोप लाव

**लगावने** (क्रि.)– मारणे, पिटाई करणे

**लगावय** (क्रि.)– लावालावी करतो, करते

**लगी** (क्रि.)– लागली, स्पर्शून गेली

**लगी** (क्रि.)– रुजली, मूळ धरले

**लगी** (क्रि.)– सुरुवात केली, चालायला लागली, कामाला लागली

**लगीन** – लागल्यात, रुजल्यात

**लगेच** (क्रि.वि.)– लवकरच, ताबडतोब

**लगेन** (क्रि.)– लागेल, चेंडू लागेल

**लगो** (क्रि.)– लागा, कामाला लागा

**लगोलग** (क्रि.वि.)– ताबडतोब, तडकाफडकी

**लगोलग** (क्रि.वि.)– लागोपाठ
**लग्यो** (क्रि.)– लागला, कामाला लागला
**लग्यो** – लागला, मार लागला
**लग्यो** (क्रि.)– लागले, रुजले, रोप रुजले
**लग्योतो** – लागलले होते
**लग्योतो** – रुजले होते
**लटपट** (क्रि.वि.)– लदबद
**लटकय** (क्रि.)– लटकतो, लोंबतो
**लटकनखे** (क्रि.वि.)– लटकायला
**लटकी** (क्रि.)– लटकली, लोंबली, झाडाला लटकली
**लटकी**– अपयशी ठरली, परीक्षेत अपयशी ठरली
**लटलट** (क्रि.वि.)– थरथर, झोके खाणे, जलद हालचालीचे दर्शक
**लटलट** (क्रि.वि.)– एकसारखे हालणे
**लटलटी** (क्रि.वि.)– थरथरी, घाबरण्याची स्थिती, एका आजारातील अवस्था
**लटलट्यो** (क्रि.वि.)– थरथरलो, घाबरलो, थरथरला, घाबरला
**लटांबर** (ना.)– मोठा खटला, मोठा परिवार, सामानसुमानादि
**लट्टायी** (क्रि.)– घाबरली, घाबरगुंडी उडाली
**लट्टायो** (क्रि.)– घाबरला, थरकाप झाला
**लट्टावय** (क्रि.)– घाबरतो, भितो
**लट्टावनखे** (क्रि.)– घाबरायला, घाबरायला काय झाले?
**लट्टावोन** (क्रि.)– घाबराल, घाबरगुंडी उडेल
**लट्टू** (क्रि.वि.)– फिदा, आकर्षित, अनुरक्त, आसक्त, आशक
**लठ्ठी** (वि.)– जाड, लठ्ठ, पुष्ट, स्थूल स्त्री
**लठ्ठो** (वि.)– जाड, लठ्ठ, पुष्ट, स्थूल पुरुष
**लंडावणे** (क्रि.)– बनविणे, फसविणे, फितविणे, अनुकूल करून घेणे
**लंडुऱ्या** (वि.)– एक शिवी, मध्येमध्ये करणारा
**लड्डू** (ना.)– लाडू, एक पक्वान्न
**लढ्ढा** (वि.)– जाडजूड, लठ्ठ, बेढब, स्थूल
**लत** (क्रि.वि.)– व्यसन, सवय (वाईट अर्थाने)
**लदबद** (वि.)– खूप, भरपूर, अतिशय
**लपकय** (क्रि.)– वाकतो, घाबरतो, भितो, झुकतो, लवतो
**लपक्यो** (क्रि.)– वाकला,

घाबरला, झुकला
**लपटणे** (क्रि.)- चिकटणे, अति जवळ येऊन भिडणे
**लपटी** (क्रि.)- चिपकली, अति जवळ येऊन भिडली
**लपट्यो** (क्रि.)- चिपकला, अति जवळ येऊन लगट केली
**लपना चिपणी** (ना.)- एक खेळ, लपंडाव
**लफळा** (भाववाचक ना.)- लफडे, भानगड, कुलंगडे
**लंबनखे** (क्रि.वि.)- लांबायला, उन्हाळा लांबायला लागला
**लंबय** (क्रि.)- लांबतो, लांब होतो
**लंबय** (क्रि.)- प्रमाणाबाहेर वाढतो
**लंबयच लंबय** (क्रि.)- लांबतोच लांबतो
**लबरलबर** (क्रि.वि.)- खूप घाईघाईने, अति वेगाने, चुकीच्या पद्धतीने
**लंबायो** (क्रि.)- लांबविले, लांबी वाढविली
**लंबायो** (क्रि.)- पळविले, चोरले, गिळंकृत केले
**लंबायो** (क्रि.)- नष्ट केले, नाहिसे केले, जीव घेतला
**लंबावणे** (क्रि.)- चोरणे, लंपास करणे
**लंबावू** (क्रि.)- लांब करू
**लंबावू** (क्रि.)- चोरून नेऊ, आपलासा करू
**लबाळ** (वि.)- लबाड, खोटा, ठक, लुच्चा
**लंबी** (ना.)- लांबी, समुद्राची लांबी कोणी मोजावी
**लंबी** - नाहीशी, कायमची संपली
**लंबीचलंबी** (वि.)- लांबच लांब, प्रदीर्घ, लांबच लांब झाडे लावा
**लंबीच लंबी** (वि.)- अति उंच असलेली
**लंबू** (वि.)- लफाट्या, लबाड, खोटारडा
**लंबू** (वि.)- उंचीने जास्त, खूप लांब
**लंबूनोको** (क्रि.)- लांबू नको, हातपाय जास्त पसरू नको
**लंबो** (वि.)- लांब, दूर
**लंबो** (वि.)- लबाड, खोटारडा, गोष्टी वेल्हाळ
**लंबोच लंबो** (वि.)- लांबच लांब, खूप दूर
**लंबोच लंबो** - अति उंच
**लंबोचौळो** (वि.)- पसरट, लांब रुंद, ऐसपैस
**लंबोन** (क्रि.)- लांबाल, पुढे जाल
**लंबोलचक** (वि.)- खूप लांब,

लांबलचक
**लंबोसळांग** (वि.)- लांबच लांब, खूप लांब
**लंबोसाट** (वि.)- अति लांब
**लमकय** (क्रि.)- लोंबकळतो, लटकतो
**लमकी** (क्रि.)- लटकली, लोंबकळली
**लमक्यो** (क्रि.)- लोंबकळला, लटकला
**लय** (वि.)- खूप, पुष्कळ, अमाप, विपुल
**लयंगा** (ना.)- परकर, परकोर
**लयरी** (वि.)- लहरी, चंचल, छंदिष्ट
**लायनोपण** (ना.वि.)- लहानपण, लहानपण देगा देवा, मुंगी साखरेचा रवा - तुकाराम
**ललचावय** (क्रि.)- लालूच वाटते, लालसा धरते, तोंडाला पाणी सोडतो
**लल्लावय** (क्रि.)- लालूच निर्माण होते, हाव निर्माण होते
**लवय** (क्रि.)- वाकतो, झुकतो, नम्र होतो, नमतो
**लसन्या** (वि.)- कुचकामी, निरर्थक, कमकुवत
**लसलस** (क्रि.वि.)- भरात येणे, ओथंबून येणे, रसरसणे
**लसलस** (क्रि.वि.)- वळवळ, उत्कंठा
**लळ** (ना.)- लड, माळ, फटाक्यांची लळ
**लळकावाली** (वि.)- मुलगा असलेली आई, मुलाची आई
**लळकावली** (वि.)- लेकुरवाळी, मूलबाळ असलेली
**लळकालळकी** (ना.)- मुलेमुली
**लळका** (ना.)- लेकरू, लहान बाळ
**लक्षमी** (ना.)- लक्ष्मी, धनसंपत्ती
**लक्षमी** (ना.)- स्त्रीवाचक नाम
**लईन** (ना.)- जगण्याची तऱ्हा, चारित्र्य
**लाईन** (क्रि.)- आणले, आणलेत
**लाग** (ना.)- मैथुन, मिलाफ, संभोग
**लागोन** (ना.क्रि.)- भाडेपट्टी, शेत भाडेपट्टीवर वाहायला देणे
**लागोन** - लागवड
**लाटना** (क्रि.)- लाटणे, पोळपाटावर पोळी पातळ करण्याचा लाकडी रूळ
**लाटय** (क्रि.)- लाटण्याचे काम करतो, पोळी लाटतो
**लाटय** (क्रि.)- उपटतो, लाटतो,

धूर्तपणे हस्तगत करतो

**लाटी** (क्रि.)- लाटली, विशिष्ट गोलाकार येण्यासाठी पोळी फिरविली

**लाटी** (क्रि.)- लाटली, उपटली, धूर्तपणे हस्तगत केली

**लांडग्या** (ना.)- लांडगा, जंगलातला चतुष्पाद क्रूर पशू

**लांडी** (वि.)- आखूड, थोटी, अपुरी, कमी

**लांडे** (ना.)- आखूड, थोटे, अपुरे, कमी, सीमित

**लाताळ** (ना.क्रि.)- लाथाड, लाथांनी मार

**लाताळ्यो** (क्रि.)- लाथा मारल्यात, लाथांनी तुडविले

**लादय** (क्रि.)- ठेवणे, ओझे ठेवतो, जबरदस्ती करतो

**लादय** (क्रि.)- एकावर एक ठेवतो, ढीग लावतो

**लांबलचक** (वि.)- लांबच लांब, खूप लांब

**लाय** (ना.)- लाळ, मुखरस

**लाय गारणे** (क्रि.)- गोंडा घोळणे

**लायगारय** (क्रि.)- लाळ गाळतो, गोंडा घोळतो, तोंडाला पाणी सुटते, मागेपुढे करतो

**लायजो** (क्रि.)- आणशील, येताना वस्तू आणशील

**लायनी** (वि.)- लहान, धाकटी, लहानगी

**लायनीने** (वि.)- लहानीने, धाकटीने

**लायनेने** (वि.)- लहान्याने, धाकट्याने

**लायनो** (वि.)- लहान, धाकटा, धाकला

**लायनोपण** (ना.वि.)- लहानपण, नम्रता

**लायनो बळो** (वि.)- लहानमोठा, लहानमोठा हा भेद

**लाय रह्यो** (क्रि.)- आणून राहिला, आणीत आहे

**लायो** (क्रि.)- आणले

**लालची** (वि.)- हावरट, लोभाविष्टता, स्वार्थी

**लालचुटूक** (वि.)- अति लाल, गर्द लाल

**लालजरद** (वि.)- अति लाल, गर्द लाल

**लालतंबोर** (वि.)- लालतांबडी, खूप लाल, डोळ्यात भरण्यासारखा/भरण्यासारखी लाल

**लालनपालन** (ना.)- कोडकौतुकासह संगोपन, पूर्ण

सांभाळ, पालनपोषण
**लालसावय** (वि.)– लोभाविष्ट होतो, मनात लालसा निर्माण होते, उत्कट इच्छा निर्माण होते
**लालूच** (ना.वि.)– लालसा, अभिलाष, उत्कट इच्छा
**लाव** (क्रि.)– आण, घेऊन ये
**लाव** (ना.वि.)– हडळी, हडळ, राक्षसी, चुडेल
**लावणखे** (क्रि.वि.)– आणायला, आणण्यासाठी
**लावणखे गयो** (क्रि.)– आणायला गेला
**लावनलगय** (क्रि.)– आणावे लागते
**लावने** (क्रि.)– आणणे, घेऊन येणे
**लावलगाई** (ना.)– चुगली, लावालावी, चहाडी, इकडची गोष्ट तिकडे सांगणे
**लावारस** (वि.)– बेवारशी, ज्याला कोणी नाही असा, जिला कोणी नाही अशी
**लावोन** (क्रि.)– आणाल, येताना मुलाला आणाल
**लाळ** (ना.)– लाड, कौतुक
**लाळकी** (वि.)– लाडाची
**लाळको** (वि.)– लाडाचा
**लाळणे** (क्रि.)– लाडात
**लाळसे** (वि.)– लाडाने, लाडामुळे
**लाळा** (ना.)– नवरा, पती, जीवनसाथी
**लाळाके घर** (वि.)– नवऱ्याच्या घरी, पतीगृही
**लाळाघर** (ना.)– नवऱ्याचे घर, पतीगृह
**लाळाने** (ना.)– नवऱ्याने, पतीने
**लाळालाळी** (ना.)– नवरदेव नवरी
**लाळा लुगाईन** (ना.)– नवराबायको, पती पत्नी
**लाळायी** (क्रि.)– लाडात आली
**लाळावय** (क्रि.)– लाडात येते
**लाळासे** (क्रि.)– नवऱ्याला
**लाळी** (ना.)– नवरी, वधू, नवरी मुलगी
**लाळेलाळे** (क्रि.वि.)– प्रेमाने, लाडेलाडे, लाडाने
**लिख** (क्रि.)– लिही, लेखन कर, रचना कर
**लिखनखे** (क्रि.वि.)– लिहिण्यासाठी, लिहिण्याकरिता
**लिखने** (क्रि.)– लिहिणे, लेखन करणे, रचना करणे
**लिखय** (क्रि.)– लिहितो, लेखन

करतो, निर्मिती करतो
**लिखाई** (क्रि.)– लिहून घेतले
**लिखी** (क्रि.)– लिहिली, लेखन केले, रचना केली
**लिखीनतीन** (क्रि.)– लिहिले होते
**लिखो** (क्रि.)– लिहा, लेखन करा
**लिखोन** (क्रि.भ.)– लिहाल, लेखन कराल
**लिचोंडा** (ना.)– चिकटी, चिमटा
**लिमलेट** (ना.)– लिंबू सरबत
**लिजाय** (क्रि.)– नेतो, घेऊन जातो, आपलेसे करतो, स्वीकारतो
**लिजायी** (क्रि.)– नेली, घेऊन गेली, स्वीकारतो
**लिजायो** (क्रि.)– नेला, घेऊन गेला
**लिजावत** (क्रि.)– नेतात, घेऊन जातात
**लिजावनखे** (क्रि.वि.)– न्यायला, नेण्यासाठी
**लिजावनखे गयो** (क्रि.)– आणायला गेला
**लिजावनो** (क्रि.)– नेणे, घेऊन जाणे
**लिजावबोन** (क्रि.)– नेऊया, घेऊन जाऊ या
**लिजावय** (क्रि.)– नेतो, घेऊन जातो
**लिजावू** (क्रि.)– नेतो, घेऊन जातो
**लुईलुई** (वि.)– कमजोर, अति मऊ, अशक्त
**लुकखे** (क्रि.)– लपून, लपून पाहणे
**लुकखे देखणे** (क्रि.)– लपून पाहणे, चोरून पाहते, कोणाला कळू न देता पाहणे
**लुकनाचिपणी** (ना.)– लपालपी, छपनछपन
**लुकनखे** (क्रि.वि.)– लपायला, दडून बसायला
**लुकने** (क्रि.)– लपणे, दडून बसणे, गुप्त राहणे
**लुकय** (क्रि.)– लपतो, दडून बसतो, गुप्त राहतो
**लुकलुकणे** (क्रि.)– चमकणे, मंद प्रकाश देणे, चकचकणे
**लुकलुकय** (क्रि.)– चमकतो, प्रकाशतो, चकाकतो, मंद प्रकाश देतो
**लुकाई** (क्रि.)– लपविली, लपविले, दडविली, गुपित ठेवली
**लुकायो** (क्रि.)– लपविला, दडविला, गुपित ठेवला

**लुकालुकी** (क्रि.)- लपालपी, लपनछपन, एक खेळ
**लुकाव** (क्रि.)- लपव, दडव, गुपित ठेव
**लुकावय** (क्रि.)- लपवितो, दडवितो, गुपित ठेवतो
**लुकी** (क्रि.)- लपली, दडली
**लुकीन** (क्रि.)- लपलेत, लपल्यात, दडल्यात
**लुकोन** (क्रि.)- लपाल, दडाल
**लुक्यो** (क्रि.)- लपला, दडला
**लुगाईन** (ना.)- बायको, पत्नी, सहचारिणी, सहधर्मिणी, सहधर्मचारिणी
**लुंगारणे** (क्रि.)- गोंडा घोळणे, मागेपुढे करणे
**लुंगारणे** (क्रि.)- फसविणे, नागविणे
**लुगळा** (ना.)- लुगडे, पातळ, स्त्रियांचे पारंपरिक वस्त्र
**लुगळाको** (वि.)- लुगड्याचा
**लुगळापर** - लुगड्यावर
**लुगळासे** - लुगड्याने
**लुंगारय** (क्रि.वि.)- मागेपुढे करतो, गोंडा घोळतो
**लुचणे** (क्रि.)- उपटणे, तोडणे, ओरबाडणे
**लुचणे** (क्रि.)- शोषण करणे
**लुचय** (क्रि.)- तोडतो, ओढतो
**लुच्ची** (वि.)- लबाड, असभ्य, बदफैली, ठक स्त्री
**लुच्यो** (क्रि.)- तोडले, तोडला
**लुच्च्या** (वि.)- लबाड, असभ्य, बदफैली, ठक पुरुष
**लुटनखे** (क्रि.वि.)- लुटायला
**लुटय** (क्रि.)- लुटतो, लुबाडतो, अपहार करतो, बळजबरीने लंपास करतो
**लुटारू** (वि.)- लुटणारा, लुबाडणारा, अपहार करणारा
**लुटी** (क्रि.)- लुटले, लुबाडले, बळजबरीने घेतले
**लुटोन** (क्रि.)- लुटाल, अपहार कराल, बळजबरीने ओरबाडून न्याल
**लुट्यो** (क्रि.)- लुटला, लुबाडला, बळजबरीने घेतला
**लुडकणे** (क्रि.)- आडवे होणे, झोपणे
**लुंडकणे** (क्रि.)- कोसळणे, वरून हळूच पडणे
**लुंडकय** (क्रि.)- कोसळतो, हळूच पडतो, हळूच निजतो
**लुंडक्यो** (क्रि.)- बसल्या बसल्या झोपला
**लुंडमुंड** (वि.)- बेशुद्ध, निश्चेष्ट

पडलेला

**लुतरा** (भाववाचक ना.)- लावालावी, चुगली, चहाडी, इकडची तिकडे सांगणे

**लुतरा लगावय** (क्रि.)- लावालावी करतो, चुगली, चहाडी करतो

**लुत्रा** (वि.)- चुगली, निंदा, चहाडी, लावालावी

**लुबरा** (वि.)- कारण नसताना मध्ये मध्ये बोलणारा, चोंबडा, अकारण लुडबूड करणारा

**लुबरो** (वि.)- अकारण मध्ये बोलणारा, अनावश्यक वटवट करणारा

**लुबाळय** (क्रि.)- लुबाडतो, लुटतो, अपहार करतो, चोरतो

**लुबाळी** (क्रि.)- लुबाडली, लुटली

**लुबाळ्यो** (क्रि.)- लुबाडले, लुटले, अपहार केला

**लुभायो** (क्रि.)- लोभ निर्माण झाला, ओढ निर्माण झाली, आकर्षित झाला

**लुभावनखे** (क्रि.वि.)- ओढ निर्माण करायला, आकर्षित करायला

**लुभावय** (क्रि.)- लोभ निर्माण होतो, ओढ लावतो, आकर्षित करतो

**लुला** (वि.)- लुळा, अपंग, पंगू, हातापायात जोर नसलेला, अशक्त, यथास्थित न वावरणारा

**लुली** (वि.)- लुळी, अपंग, पंगू, हातापायात जोर नसलेली

**लुलो** (वि.)- लुळा, हातापायात शक्ती नसलेला, अपंग, ताठपणा नसलेला, पंगू

**लुसलुस** (ना.वि.)- प्रबळ इच्छा, हावरट, लालसा

**लुसलुसय** (क्रि.)- झुरतो, अपेक्षा बाळगतो, लालसा बाळगतो

**लुळकणे** (क्रि.)- लोळणे, झोपणे, बसल्या बसल्या झोपी जाणे

**लुळबुळ** (क्रि.वि.)- लुडबूड, व्यवस्थित सुरू असलेल्या कामात उगाच केलेली गडबड

**लुळबुळ्या** (वि.)- लुडबुड्या, अकारण मध्ये मध्ये करणारा

**लूक** (क्रि.)- लप, गुप्त राहा

**ले** (क्रि.)- घे, स्वीकार, आपलेसे/आपलीशी कर

**लेईन** (क्रि.)- घेतले, स्वीकारले, आपलेसे केले

**लेखो** (क्रि.)- मानो, विचारात

घ्या, कमी समजू नका

**लेख्यो** (क्रि.)– मानले, विचारात घेतले, स्वीकारले, महत्त्व दिले

**लेंग** (ना.)– कलालांच्या लग्नातील विधी

**लेची** (वि.)– कमकुवत, निरुपयोगी, लुळी, हातापायात ताठा नसलेली

**लेचीपेची** (वि.)– कुचकामी, अशक्त असलेली, लुळी, कमजोर

**लेचोपेचो** (वि.)– कमकुवत असलेला, कुचकामी, लुळा, अशक्त

**लेच्या** (वि.)– कुमकुवत, कुचकाम्या, निरुपयोगाचा

**लेच्यापेच्या** (वि.)– कुचकामाचा, दुबळा, कमकुवत, असातसा

**लेजो** (क्रि.)– घेशील, स्वीकारशील

**लेंडी** (ना.)– विष्ठा, बकरीची विष्ठा

**लेनके** (क्रि.वि.)– घ्यायला, स्वीकारायला, घेण्यासाठी

**लेनखे** (क्रि.वि.)– घ्यायला, स्वीकारायला

**लेनखे देखय** (क्रि.वि.)– घ्यायला पाहतो, स्वीकारायला पाहतो

**लेन गयो** (क्रि.)– घ्यायला गेला, घेण्यासाठी गेला

**लेनदेन** (ना.)– घेणे–देणे,व्यवहार

**लेना** (क्रि.)– घे ना, घे, स्वीकार

**लेनो एक अन देनो दोय** – एक घ्यायचे अन दोन द्यायचे

**लेपन** (ना.)– लिंपण, बुजवण, ओल्या मातीने लिंपणे

**लेंबळलेंबळ** (क्रि.वि.)– पिरपिर, लेंगडलेंगड, तेच ते बोलत राहणे, मध्ये मध्ये, कंटाळवाणे बोलणे

**लेय** (क्रि.)– घेतो, स्वीकारतो, आपलेसे करतो

**लेयकेदेख** (क्रि.)– घेऊन पहा

**लेयखे** (क्रि.)– घेऊन गेला

**लेयखे गयी** (क्रि.)– घेऊन गेली

**लेयगई** (क्रि.)– घेऊन गेली

**लेय खेगयो** (क्रि.)– घेऊन गेला

**लेयखे चल** (क्रि.)– घेऊन चल

**लेयखे चली** (क्रि.)– घेऊन चालली

**लेयखे चल्यो** (क्रि.)– घेऊन चालला

**लेयखे जा** (क्रि.)– घेऊन जा

**लेयखे जाणे** (क्रि.)– घेऊन जाणे

**लेयगयो** (क्रि.)– घेऊन गेला

**लेयजा** (क्रि.)- घेऊन जा, ने
**लेय जाणे** (क्रि.)- घेऊन जाणे, नेणे
**लेय दे** (क्रि.)- घेऊन दे, मला पुस्तक घेऊन दे
**लेयदेवोन** (क्रि.)- घेऊन द्याल
**लेयले** (क्रि.)- घेऊन घे
**लेयलेव** (क्रि.)- घेऊन घ्या
**लेयी** (क्रि.)- घेतली, स्वीकारली
**लेयो** (क्रि.)- घेतला, स्वीकारला
**लेव** (क्रि.)- घ्या, स्वीकारा, आपलेसे करा
**लेवदेव** (ना.)- घेणे, देणे, व्यवहार
**लेवनखे** (क्रि.वि.)- घ्यायला, आणायला
**लेवळी** (ना.)- रेवडी, साखरेच्या अथवा गुळाच्या पाकात तीळ घालून केलेले लहान गोळे
**लेवो** (क्रि.)- घ्या, स्वीकारा, आपलेसे करा
**लेवोन** (क्रि.)- घ्याल, स्वीकाराल, आपलेसे कराल
**लेवोना** (क्रि.)- घ्या ना, स्वीकारा ना, आपलेसे करा ना
**लैंगा** (ना.)- परकर, परकोर, घागरा
**लोई** (क्रि.)- लोळली, अस्ताव्यस्त झोपली, पसरली
**लोचय** - चिमटे काढतो
**लोचय** (क्रि.)- पिळतो, शोषण करतो
**लोचा** (ना.)- त्रासदायक गोष्ट, किटकिट, डोकेदुखी
**लोची** (क्रि.)- चिमटा घेतला
**लोची** (क्रि.)- शोषण केले, पिळून काढले, तिने शोषण केले
**लोटय** (क्रि.)- लोटतो, ढकलतो
**लोंदा** (ना.)- गोळा, कुत्र्याने वासराच्या मानेचा लोंदा तुकडा
**लोंबकी** (क्रि.)- लटकली, लोंबकळली
**लोमकय** (क्रि.)- लोंबकळतो, लटकतो, ओळंबतो
**लोयी** (क्रि.)- लोळली, अव्यवस्थितपणे पडणे, पसरली
**लोयो** (क्रि.)- लोळला, अस्ताव्यस्त झोपला, पसरला
**लोरत** (क्रि.अ.व.)- लोळतात, पसरतात
**लोरय** (क्रि.)- लोळते, लोळतो, अव्यवस्थित पडतो, पसरतो
**लोरी** (क्रि.)- लोळली, अव्यवस्थित झोपली
**लोला** (वि.)- लुला, लुळा, दुबळा, हातापायात ताठा

नसलेला

**लोली** (वि.)– लुली, अपंग, मुलगी, हातापायात ताठा नसलेली

**लोल्या** (वि.)– ताठपणा नसलेला, लुला, लुळा, अशक्त असलेला

**लोवू नोको** (क्रि.)– लोळू नको

**लोळ** (ना.)– लोड, लांबट आणि वाटोळा तक्क्या

**लोळय** (क्रि.)– लोटांगण घालतो

**लोळय** (क्रि.)– पसरतो, अस्ताव्यस्त झोपतो

**लोळय** (क्रि.)– शरण येतो, शरणागती पत्करतो

**लोळा** (ना.)– वरवंटा, वरंटा, लंबगोल दगड

**लौकर** (क्रि.वि.)– लोकर, मेंढीच्या अंगावरील मऊ केस

**लौंगी** (ना.)– लवंगी, लवंगी मिरची

**लौंढी** (ना.वि.)– एक शिवी, वाह्यात कर्म करणारी, दुराचारी, कुकर्म करणारी

***

# व

**वखत** (क्रि.वि.)– वेळ, प्रसंग, कालावधी, काळ, वक्त, संधी

**वखतपर** (क्रि.वि.)– वेळेवर, प्रसंगानुरूप, कालावधीत

**वखवख** (क्रि.वि.)– क्षुधातिशय, खा खा, अतृप्त लालसा

**वखवखी** (वि.)– वखवखलेली, उतावीळ, खाण्यासाठी उतावीळ, हाव

**वगारू** (ना.)– म्हशीचे पिल्लू

**वचक** (क्रि.वि.)– भीती, दरारा, धाक, धसका

**वचकय** (क्रि.)– भितो, घाबरतो, दचकतो

**वचकवचक** (क्रि.वि.)– मध्ये मध्ये बोलणे, खेकसणे

**वचका** (ना.क्रि.वि.)– बदला, सूड

**वजेवजे** (क्रि.वि.)– सावकाश, हळूहळू, शांततेने

**वटा** (ना.)– ओटा, पार

**वटा** (ना.)– लुगडी, साडी, धोतराचा घोळ

**वटाना** (ना.)– वाटाणा, मटार, एक द्विदल धान्य

**वटारय** (क्रि.)– वटारतो, क्रोधाने

डोळे वासून पाहतो

**वटी** (ना.)– ओटी, ओटीभरण

**वटी** (ना.)– शेतात पेरणी करताना बी ठेवण्यासाठी कमरेला बांधावयाची पिशवी

**वण्यांग** (क्रि.वि.)– तिकडे

**वणवण** (क्रि.वि.)– खूप धडपड, व्यर्थ परिश्रम, अकारण सायास

**वफारा** (ना.)– वाफ घेणे, सर्दी झाल्यास गरम पाण्याची वाफ घेतात

**वन्निसो** (वि.)– डावा, हलक्या प्रतीचा, कमी, न्यून

**वयचण** (ना.)– वळचण, घराच्या पाख्याच्या खालचा भाग

**वयनी** – वळचण, घराच्या पाख्याच्या खालचा भाग

**वयनी** (क्रि.)– वाकली, लवली

**वयनी भयी** (क्रि.)– वाकती झाली

**वयने** (क्रि.)– वाकले

**वयने** (ना.)– ओळीत, तुरीच्या ओळीत

**वयने** – तारुण्यात, वयात

**वयने भयीन** (क्रि.)– वाकते झाले, वाकलेत

**वयनो** (क्रि.)– वाकला, लवला, झुकला

**वरगो** (ना.)– वर्ग, इयत्ता, तुकडी

**वरगो** (ना.)– गट

**वरचळ** (वि.)– वरचढ, श्रेष्ठ, सरस, वरच्या दर्जाचा

**वरजिकवार** (ना.)– पथ्य पाळण्याचा दिवस, अशुभ दिवस

**वरपांग्या** (वि.)– वरवरचे करणारा, कामचुकार, आळशी

**वरम्यो** (क्रि.)– वरमाला, नरमला, थकला, दमला, शांत बसला

**वरी** (क्रि.)– वरले, स्वीकारले, नवरा म्हणून आनंदाने स्वीकारले

**वरी** (क्रि.)– शिजायला ठेवली

**वरोटा** (ना.)– वरवंटा, लांबटगोल दगड, पाटावरवंटा

**वर्दान** (ना.)– वरदान, प्रसन्न होऊन दिलेली वस्तू, प्रसन्न झाल्यावर दिलेला शब्द

**वल** (ना.)– ओल, ओलावा, आर्द्रता

**वल** (क्रि.वि.)– जिव्हाळा, आपलेपण, आपुलकी

**वली** (वि.)– ओली, भिजली, भिजलेली, चिंब झालेली

**वसकने** (क्रि.)– चिडून अंगावर येणे

**वसकय** (क्रि.)– दचकतो, घाबरतो, भिऊन वागतो

**वसकी** (क्रि.)– दचकली, घाबरली

**वसकी** (क्रि.)– चिडून अंगावर आली

**वहाँ** (क्रि.वि.)– तेथे, त्या ठिकाणी, त्या स्थळी

**वहाँकी** (क्रि.वि.)– तेथील, त्या ठिकाणची, त्या जागेवरील

**वहाँके वहाँ** (क्रि.वि.)– तेथल्या तेथे

**वहाँको** (क्रि.वि.)– तेथील, त्या ठिकाणचा

**वहाँच थांबो** (क्रि.वि.)– तेथेच थांबा, जेथे आहा तेथेच थांबा

**वहाँलग** (क्रि.वि.)– तेथपर्यंत, त्या जागेपर्यंत

**वहाँसा** (क्रि.वि.)– तेथे, स्थळी, त्या ठिकाणी

**वहाँसे** (क्रि.वि.)– तेथून

**वा** (संबोधनपर) – बायकोला उद्देशून

**वाकणे** (क्रि.)– झुकणे, बाक येणे

**वाकणे** (क्रि.)– नम्र होणे, लीन होणे

**वाकय** – वाकतो, झुकतो, लवतो, बाक येतो. उदा. मांडव लवला

**वाकय** (क्रि.)– नम्र होतो, लीन होतो

**वगार** (ना.)– वयात न आलेली म्हैस

**वगारी** (वि.)– कर्कश ओरडणारी (स्त्री), एक शिवी

**वगारू** (ना.)– म्हशीचे पिल्लू

**वगारू** (ना.)– मागे मागे फिरणारा, चापलुसी करणाऱ्या

**वगाऱ्या** (वि.)– कर्कश ओरडणारा (माणूस), एक शिवी

**वाजा** (ना.)– गवारीची शेंग, गोवारी, भाजीचा शेंग

**वांजोटी** (वि.)– निपुत्रिक स्त्री, अपत्यविहीन स्त्री

**वांजोटी** (वि.)– निपुत्रिक, अपत्यविहीन पुरुष

**वांजोटो** (वि.)– निपुत्रिक, अपत्यविहीन

**वाज्या** (ना.)– गवारीच्या शेंगा, एक फळभाजी

**वांढ** (वि.)– तेढा, तिरसट, वाकड्या स्वभावाचा

**वांढाय** (वि.)– बेजबाबदार, कुमार्गाने जाणारी, अनिर्बंध (एक शिवी)

**वांढाय** – वांढाळ, तिरसट,

वाकड्या, ओढाळ स्वभावाचा/ स्वभावाची

**वातळ** (वि.)- कडक व चिवट, तोडण्यास चिवट अशी पोळी

**वातळला** (वि.)- अतिशय रोड, अतिरोड पुरुष, एक शिवी

**वातळली** (वि.)- अतिशय रोड स्त्री, एक शिवी

**वातळले वाणको** - अतिशय रोड पुरुष, एक शिवी, चेहऱ्यावर नूर नसलेला पुरुष

**वातळल्या** (वि.)- अतिशय रोड, एक शिवी

**वादंग** (क्रि.वि.)- वाद, कलह, बाचाबाची, बोलाचाली, शाब्दिक संघर्ष

**वांदा** (क्रि.वि.)- समस्या, अडचण, भानगड

**वांधा** - समस्या, दुरावा, ताटातूट

**वान** (वि.)- उणीव, कमी, मर्यादा उदा. पैशाला वान नाही

**वान** (ना.)- चेहरा, रूप, सौंदर्य

**वानको ना गुणको** (वि.)- रूप नाही ना गुण नाही असा, कुचकामी, निरुपयोगी

**वानगी** (वि.ना.)- मोठेपणा

**वानगी** (ना.)- नमुना, दुकानातून गूळ खरेदी करण्यापूर्वी नमुना म्हणून थोडा खाऊन पाहतात

**वानगी मिरावय** (क्रि.)- मोठेपण मिरवतो, ठाकतो

**वानवोय** (क्रि.)- स्तुती करतो

**वानिको हुळला** (ना.)- वाणीच्या (ज्वारीच्या) कोवळ्या कणसाचे भाजलेले दाणे

**वानी** (वि.)- ज्वारीचा एक प्रकार

**वापरखे देख** (क्रि.)- वापरून पाहा

**वापरनको** (क्रि.वि.)- वापरावयाचे, उपयोगात आणायचे

**वापरनखे** (क्रि.वि.)- वापरायला, उपयोग करायला

**वापरय** (क्रि.)- वापरतो, उपयोग करतो

**वापरी** (क्रि.)- वापरली, उपयोग केला

**वापरोन** (क्रि.)- वापराल, उपयोग कराल

**वापऱ्यो** (क्रि.)- वापरला, उपयोग केला

**वायचोदी** (वि.)- बदमाश, एक शिवी, स्त्रीला उद्देशून

**वायचोद्या** (वि.)- एक शिवी (पुरुषाला उद्देशून)

**वायटरक्या** (वि.)– एक शिवी, पुरुषाला उद्देशून

**वायबोल** (भाववाचक नाम)– बाष्कळ बोलणे, अर्थशून्य बोलणे, नुसती वटवट करणे

**वाराको भारा** (ना.)– अशक्य गोष्ट, कल्पनेतले मनसुबे

**वारापर** (क्रि.)– हवेत, कल्पनेत, वाऱ्यावर, तो हवेत वावरतो

**वावा** (केवलप्रयोगी अव्यय)– वाहवा, प्रशंसा (प्रशंसापर उद्‌गारवाचक अव्यय)

**वेन्यांगसे** (क्रि.वि.)– तिकडून

**वोंदा** (क्रि.वि.)– तुटलेला दोर गुंफत नेऊन जोडणे

**वानँग** (क्रि.वि.) – तिकडे

**वोनँग की** (क्रि.वि) – तिकडची

**वोनँग को** (क्रि.वि.)– तिकडचा

**वोनँगसे** (क्रि.वि.)– तिकडून

***

# श

**शकळा** (ना.)– छकडा, बैलगाडीपेक्षा लहान गाडी

**शकळाने** – छकड्यात

**शकळासे** – छकड्याने

**शंकू** (ना.)– शंख, समुद्रातल्या एका विशिष्ट प्राण्याच्या कवचाचे केलेले वाद्य

**शटाक** (वि.)– छटाक, पन्नास ग्रॅम

**शनवार** (ना.)– शनिवार

**शबूद** (ना.)– शब्द, श्रोत्रेंद्रियाला आकलन होणारे आवाज, ध्वनी व अर्थयुक्त वर्ण

**शंबर** (वि.)– शंभर, शत, शे

**शव** (ना.)– प्रेत, मृत शरीर

**शवई** (ना.)– शेवई, विशेषत: गव्हाच्या पिठाची केलेली बारीक व लांब वळी

**शहरकी** (वि.)– शहराची, शहरातली, महानगरातली

**शहरको** (वि.)– शहराचा, शहरातला

**शहरने** (ना.)– शहराने, शहरात

**शाकटा** (वि.)– लबाड, धूर्त, लुच्चा, अप्रामाणिक

**शाती** (ना.)– छाती, उरोभाग, वक्ष, ऊर

**शाती** (भा.वा.ना.)– धैर्य, हिंमत, धाडस

**शाबूत** (वि.)– व्यवस्थित, दुरुस्त, शाबूद, मजबूत

**शायनी** (वि.)– शहाणी, समजूतदार, समंजस, आकलक्षमता असलेली

**शायनो** (वि.)– शहाणा, समजूतदार, समंजस, आकलनक्षमता असलेला

**शार** (ना.)– क्षार, लवण, खारट पदार्थ

**शिई** (क्रि.)– सांधली, जोडली, शिवली, टाचे घातले

**शिवय** (क्रि.)– सांधते, शिवते, जोडते, टाचे घालते

**शिक** (क्रि.)– शिक्षण घे, अभ्यास कर

**शिक** (ना.)– शिंक, सर्दीमुळे नाकाद्वारे वायूचे जोरात व वेगाने सशब्द नि:सरण

**शिकत** (क्रि.)– शिकतात, विद्या ग्रहण करतात

**शिकदौळी** (ना.)– कुटुंबात मोठा मुलगा नवरदेव होऊन वधू पक्षाकडे जाण्यासाठी निघतो तेव्हा त्याच्यासोबत हळद, मीठ व इतर धान्याच्या सात टोपल्या पाठवितात. वधूसह जेव्हा तो स्वगृही परततो, तेव्हा त्यांपैकी मिठाच्या टोपलीसह चार टोपल्या सोबत घेऊन येतो, ही पारंपरिक शिकदौळी प्रथा आहे

**शिकनखे** (क्रि.वि.)– शिकायला विद्या संपादन करायला

**शिकले** (क्रि.)– शिक्षण घेणे, विद्या संपादन करणे

**शिकनो** (क्रि.)– शिकणे, शिक्षण घेणे, विद्या ग्रहण करणे

**शिकय** (क्रि.)– शिकतो, शिक्षण घेतो, विद्या ग्रहण करतो

**शिकर** (क्रि.)– स्वच्छ कर, नाक स्वच्छ कर, शेंबूड बाहेर काढ

**शिकरणे** (क्रि.)– हाताने नाक धरून जोराने हवा बाहेर सोडताना त्याबरोबर शेंबूड काढून टाकणे

**शिकरी** (क्रि.)– स्वच्छ केले, नाक स्वच्छ केले

**शिका** (ना.)– शिके, कुत्र्या-मांजरांना झेप घेता येणार नाही अशा सुरक्षित उंचीवर खाण्याच्या वस्तू असलेले जाळे दोरीने टांगून ठेवणे

**शिकाई** (ना.)– लहान भांड्याला दोरी बांधून त्याद्वारे विहिरीतून

पाणी काढणे, विशेषत: कोरडवाहू कृषी परिसरात ही पद्धत आढळते

**शिकापर** (शब्दयोगी)- शिक्यावर, विशेषत: शिक्यावर दुरडी ठेवतात

**शिक्रा** (वि.)- धूर्त, कावेबाज माणूस

**शिक्रा** (वि.)- बहिरीससाणा, हवेतून झेप घेऊन भक्ष्य पकडणारा पक्षी

**शिकावत** (क्रि.)- शिकवितात, अध्यापन करतात, ज्ञानदानाचे कार्य करतात

**शिकावनखे** (क्रि.वि.)- शिकवायला, अध्यापन करायला

**शिकावने** (क्रि.)- शिकविणे

**शिकावू** (वि.)- शिकणारा, शिक्षण घेत असलेला, विद्यार्थी

**शिकावू** (वि.)- नवीन, कच्चा, अपरिपक्व माणूस/स्त्री

**शिकी** (क्रि.)- शिक्षण घेतले, शिकली, विद्या संपादली

**शिकोन** (क्रि.)- शिकाल, शिक्षण घ्याल, विद्या संपादन कराल

**शिक्यो** (क्रि.)- शिकला, शिक्षण घेतले, ज्ञान संपादन केले

**शिखरा** (वि.)- धूर्त, कावेबाज माणूस, चलाख माणूस, दगाबाज माणूस

**शिकरा** (ना.)- शिकर, ससाणा पक्षी, बहिरी ससाणा, श्येन

**शिंगरू** (ना.)- घोडे, गाढव, खेचर यांचे बछडे

**शिंगाळा** (ना.)- शिंगाडा, खाण्याचा कंद

**शिगोर** (वि.)- तुडुंब, काठोकाठ, पूर्ण भरलेले

**शिगोशिग** (वि.)- काठोकाठ, तुडुंब

**शितणे** (क्रि.)- हात लाव, तेथपर्यंत जाणे, हातलावणीच्या खेळातला एक भाग

**शितापरसे भातकी परीक्षा** (क्रि.)- शितावरून भाताची परीक्षा, थोड्यावरून खूप कळते

**शिंदय** (क्रि.)- शिंदते, अडते, लागते

**शिदळ** (ना.)- गांडूळ, अळीसारखा क्षुद्र जीव, गांडवळ, काडू

**शिदोळ** (ना.)- गांडूळ, काडू, गांडवळ

**शिनखे** (क्रि.)- हिसकावून

**शिनणे** (क्रि.)- बळजबरीने ताब्यात घेणे

**शिनय** (क्रि.)- अडते, लागते, अडथळा येतो

**शिनाल** (वि.)- कुकर्म करणारी, व्यभिचारिणी, एक शिवी

**शिनावय** (क्रि.)- हिसकावून घेतो, हिसकावते

**शिनावय** (क्रि.)- थकवितो, कामे करवून थकवितो

**शिपळ** (क्रि.)- शिंपड, सिंचन कर, सडा शिंपड

**शिपी** (ना.)- शिंपी, कपडे शिवणारी एक जात, दर्जी

**शियो** (क्रि.)- शिवला, टाके घातले, कपडे शिवलेत

**शिरकने** (क्रि.)- नाक साफ करणे

**शिरकय** (क्रि.)- साफ करतो, नाक साफ करतो

**शिरखंड** (ना.)- श्रीखंड, चक्का

**शिरवणे** (क्रि.)- पाण्यात सोडणे, पाण्यात विसर्जन करणे

**शिरनी** (ना.)- प्रसाद, देवाचा प्रसाद

**शिरायो** (क्रि.)- विसर्जन केले

**शिरावणखे** (क्रि.वि.)- विसर्जन करायला

**शिरावणे** (क्रि.)- विसर्जन करणे

**शिरावत** (क्रि.)- विर्सजन करतात, गणपतीचे विसर्जन करतात

**शिरावय** (क्रि.)- विर्सजन करतो, सोडतो

**शिलगय** (क्रि.)- पेटते, पेट घेते

**शिलटा** (ना.)- टरफल, साल, केळीची साल, फळाच्या वरचा पापुद्रा, आवरण

**शिवनखे** (क्रि.)- शिवायला, शिवण्यासाठी, टाके घालण्यासाठी

**शिवय** (क्रि.)- शिवतो, टाके घालतो, जोडतो

**शिवो** (क्रि.)- शिवा, टाके घाला, जोडा

**शिसारी** - उबग, वीट, दुर्गंधीमुळे येणारी मळमळ

**शिसी** (ना.)- शिशी, बाटली, कुपी

**शिसी** (क्रि.वि.)- उबग, कंटाळा, नावड

**शीत** - पकड, तेथपर्यंत जा, हातलावणीच्या खेळातला एक भाग

**शीत** (ना.)- शिजलेल्या भाताचा दाणा

**शी** (ना.)- विष्ठा, घाण, मळ

**शीन** (ना.)- सीन, थकवा, आत्यंतिक परिश्रमांती येणारे

गात्रवैकल्य

**शील** (ना.)- पाटा, पुरणाची डाळ, चटणी इत्यादी वाटण्याची सपाट शिळा

**शीव** (क्रि.)- शिव, टाके घाल, जोड

**शीसी** (क्रि.वि.)- उबग, कंटाळा, घृणा

**शुक्करवार** (ना.)- शुक्रवार, गुरुवार व शनिवार यांच्यामधला वार

**शेकळा** (वि.)- शेकडा, दर शंभराचा गट

**शेणा** (ना.)- गोवरी, शेणापासून तयार करून उन्हात वाळवलेले चापट आकार असलेले जळण, जळतण

**शेद्रा** (ना.)- छिद्र, भोक

**शेद्रा** (वि.)- कपट, दोष, वाईट या अर्थी

**शेंदरो** (वि.)- शेंदरा, एक रंग, तांबडा

**शेपूट** (ना.)- शेपटी, पुच्छ

**शेफी** (ना.)- मोठेपण, बढाई, फुशारकी

**शेंबळो** (वि.)- शेंबडा, शेंबूड असलेले, चोंदलेले नाक

**शेमी** (ना.)- वालाची शेंग, एक भाजी

**शेम्यालोन** (ना.)- शेंदेमीठ, सैंधव

**शेर** (ना.वि.)- एक जुने माप, अर्धा किलो

**शेव** (वि.)- वाकलेला

**शेव** (ना.)- डोक्यावर घ्यायचा पदर

**शेव** (ना.)- एक खाण्याचा पदार्थ

**शेव** (ना.)- प्रेत, मृत शरीर, देह

**शेवटकी** (वि.)- शेवटची, अखेरची

**शेवटको** (वि.)- शेवटचा, अखेरचा

**शेवयी** - गव्हाचे पीठ भिजवून त्याची केलेली सुतासारखी बारीक व लांब वळी

**शेवळी** (ना.)- लहान विहीर

**शेवाय** (ना.)- शेवाळ, साचलेल्या पाण्यावर किंवा ओलसर जमिनीवर उगवणारी हिरवी वनस्पती

**शोभा** (ना.)- स्त्रीवाचक नाम

***

# स

**सईल** (वि.)– सैल, ढिला, शिथिल, अघळपघळ, पोकळ

**सईल सुटय** (क्रि.)– मोकळा सुटतो

**सकने** (क्रि.)– शक्य होणे

**सकय** (क्रि.)– शक्य होणे

**सकल** (क्रि.)– उचल, जमा कर, एकत्र कर

**सकलके** (क्रि.वि.)– जमा करून, संकलन करून, एकत्र करून

**सकलने** (क्रि.)– गोळा करणे, एकत्रित करणे, संकलन करणे

**सकलय** (क्रि.)– गोळा करतो, संकलन करतो, जमा करतो

**सकली** (क्रि.)– जमा केली, संकलित केली, एकत्रित केली

**सकाऊन** (क्रि.वि.)– सकाळी, पहाटे, प्रभात काळी

**सकार** (ना.क्रि.वि.)– सकाळ, सूर्योदयापासून मध्यान्हापर्यंत काळ

**सकार** (ना.क्रि.वि.)– उद्या

**सकारे** (क्रि.वि.)– पहाटे, सकाळी

**सकारे** (क्रि.वि.)– उद्या

**सकी** (ना.)– सखी, मैत्रीण, सोबतीण

**सकून** (ना.)– शकुन, शुभाशुभ पाहणे, भविष्यकथन, शुभाशुभ संकेत, कौल

**सकोन** (क्रि.)– शकाल, हे काम करू शकाल, शक्य होईल

**संग** (शब्दयोगी)– सोबत, संगत, बरोबर, सोबतीने

**संगणे** (शब्दयोगी)– सोबत, संगतीने, मिळून

**संगतीन** (वि.)– सोबतीण, नेहमी सोबत राहणारी, जवळची

**संगमंग** (शब्दयोगी)– सोबत सोबत, एकत्र, एकत्रित

**संगर** (क्रि.)– जमा कर, संग्रह कर, एकत्र कर, साठा कर

**सगरको नगर** (क्रि.)– प्रतिकूलतेवर मात करून शून्यातून विश्वनिर्मिती, दैन्यातून वैभव निर्माण होणे

**संगरनखे** (क्रि.वि.)– संग्रह करायला

**संगरणे** (क्रि.)– एकत्र करणे, संकलन करणे, गोळा करणे

**संगरय** (क्रि.)– संग्रह करतो, गोळा करतो, एकत्र करतो

**संगसंग** (शब्दयोगी)– सोबत सोबत, बरोबरीने

**सग्गी** (वि.)– सख्खी, रक्ताची, सख्खी बहीण

**सगो** (वि.)– सख्खा, सख्खा भाऊ

**सग्गो** (वि.)– सख्खा, सख्खा भाऊ

**संचरणे** (क्रि.)– अंगात येणे

**संचरय** (क्रि.)– अंगात येतो, अंगात येते

**सटकनखे** (क्रि.वि.)– निघून जायला, निसटायला

**सटकय** (क्रि.)– पळून जातो, निघून जातो, निसटतो, निसटते

**सटकी** (क्रि.)– पळून गेली, निघून गेली

**सटको** (क्रि.)– पळून जा, निघून जा, निसटा

**सटकोन** (क्रि.)– पळून जाल, निसटून जाल, निघून जाल

**सटक्यो** (क्रि.)– निसटला, पळाला

**सटरपटर** (वि.)– सटरफटर, बारीकसारीक

**संडणे** (क्रि.)– सांडणे, लवंडणे

**संडय** (क्रि.)– सांडतो, सांडते, पडतो, पडते, लवंडते

**संडायी** (क्रि.)– सांडविली, गमावली

**संडावय** (क्रि.)– सांडवितो, पाडतो, लवंडतो, गमावतो, घालवितो

**संडावोन** (क्रि.)– सांडवाल, लवंडाल, पाडाल, घालवाल

**संडी** (क्रि.)– सांडली, लवंडली, घालविली

**संड्यो** (क्रि.)– सांडला, लवंडला, घालविली

**सणवार** (ना.)– सणाचा दिवस

**सणतिवार** (ना.क्रि.वि.) – सणासारखा, सणादि, सणाचा आनंदाचा दिवस

**सत** (वि.)– चांगले, उत्तम

**सत** (वि.)– सत्य, खरे, योग्य

**सत** (वि.)– सत्त्व, बळ, तेज, सार, सद्गुण

**संतरा** (ना.)– संत्री, एक प्रसिद्ध फळ

**सताई** (क्रि.)– त्रास दिला, छळले, गांजले

**सतायो** (क्रि.)– सतावले, त्रास दिला

**सताव** (क्रि.)– त्रास दे, छळ, त्रासून सोड

**सतावने** (क्रि.)– त्रास देणे, मेटाकुटीस आणणे

**सतावय** (क्रि.)– त्रास देतो, त्रास देते, गांजते

**सत्तू** (ना.)– सातू, भाजलेले गहू आणि हरभरे यांचे मिश्र पीठ

**सुतई** (ना.)– सुतळी, बारीक दोरी

**सदसद** (क्रि.)– सडणे, खराब होणे, कुजणे

**सदसद** (क्रि.)– गहिवरणे

**सदावरत** (ना.)– सदावर्त, शिधा वाटणारी धर्मसंस्था, अन्नछत्र, अन्नदान

**संदी** (क्रि.वि.)– संधी, योग्य वेळ,

**संदी** (क्रि.वि.)– ऐक्य, तडजोड

**संदूक** (ना.)– पेटी, टिनाची पेटी
**संध्याकाय** (ना.क्रि.वि.)– संध्याकाळ, सायंकाळ, सूर्यास्ताचा समय, तिन्हीसांजा
**सनकने** (क्रि.)– राग येणे, क्रोधाधीन होणे
**सनका** (ना.क्रि.वि.)– तिडीक, लहर
**सनका** (ना.)– कळा, वेदना
**सनकाव** (क्रि.)– हाण, मार
**सनकी** (क्रि.)– रागावली
**सनकी** (क्रि.)– लहरी
**सणवार** (क्रि.वि.)– सणाचा दिवस
**सनवार** (ना.)– शनिवार, शुक्रवार व रविवार यांच्यामधला वार
**सनान** (वि.क्रि.)– जोरात, विशेष लक्षणीय, खूप छान
**सपना** (ना.)– स्वप्न, निद्रावस्थेत जागृतीतल्याप्रमाणे व्यक्तिगत, माजातील/सृष्टीतील घटनाप्रसंगांचे होणारे भास
**सपपर** (स.)– सर्वांवर, सर्वांत वर, सर्वांपेक्षा
**सपरी** (ना.)– ओसरी, पडवी, ओटी
**सपळत** (क्रि.)– सापडतात, उपलब्ध होतात
**सपळने** (क्रि.)– सापडणे
**सपळय** (क्रि.)– सापडतो, उपलब्ध होतो, गवसतो, आढळतो
**सपळा** (ना.)– सापडा, सापळा, अडकणी, डाव, पिंजरा
**सपळी** (क्रि.)– सापडली, उपलब्ध झाली, मिळाली, गवसली, हाती लागली
**सपळोन** (क्रि.)– सापडाल, मिळाल, उपलब्ध व्हाल, गवसाल, हाती पडाल
**सपळयो** (क्रि.)– सापडला, गवसला, उपलब्ध झाला
**सपाट पायको** (वि.)– सपाट पावले असलेला, अपशकुनी, अपयशी, शारीरिक व्यंग असलेला
**सप्पर** (ना.)– छत, घराचे छत
**सफाई** (वि.)– साफ, स्वच्छ, स्पष्ट
**सब** (वि.)– सर्व, सारे, सगळे, पूर्ण, अवघा
**सबकनांग** (वि.)– सगळीकडे, सर्वत्र, सर्व जागी, स्थळी
**सबक** – अद्दल
**सबकी** – सर्वांची, सगळ्यांची
**सबकेसब** (वि.)– सर्वचे सर्व, एकूण एक
**सबको** (वि.)– सर्वांचा, सगळ्यांचा
**सबकोसब** – सर्व काही सर्वांचे
**सबझन** (वि.)– सर्वजण, एकूण एक
**सबन** (वि.)– सर्व, संपूर्ण
**सबने** (वि.)– सर्वांनी

